# मराठी दफ्तर

## रुमाल दुसरा ( २ )

### ( लेखांक १ ते ४ )

हा

विनायक लक्ष्मण भावे

यांनीं

मूळ प्रतींवरून

छापवून ठाणें येथें प्रसिद्ध केला.

---

शके १८४४.

---

किंमत १॥ रुपया.

---

मुद्रक-श्रीधर विष्णु कामत, लोकसेवक प्रेस, मुं. नं. ४.
प्रकाशक-वि. ल भावे, मराठी दफ्तर कचेरी, तळेंपाळी, ठाणें.

१ मराठी दफ्तर रुमाल पहिला.

२ मराठी दफ्तर रुमाल दुसरा.

३ तुकारामाचा अस्सल गाथा.

४ अफजलखानाचा वध.

५ महाराष्ट्र सारस्वत.

आवृत्ति तिसरी छापत आहे.

पुस्तकें मिळण्याचें ठिकाणः—

भावे आणि मंडळी,

ठाकूरद्वार, मुंबई.

# मराठी दफ्तर.



शके १८३९ मध्यें मराठी दफ्तर या नांवाची एक संस्था सुरू करून, ऐतिहासिक कागदपत्र छापण्याची सोय करावी असा मी विचार केला; व थोडेच दिवसांत 'श्रीमंत महाराज भोसले यांची बखर' ही या दफ्तरांतला 'पहिला रुमाल' ह्मणून प्रसिद्ध केली. या वेळी कांहीं गृहस्थांकडून वर्गणीचे आंकडे पडले होते. परंतु कोणाकडूनही वर्गणीची रकम येण्याचा योग जमला नाहीं. तसेंच त्या नंतर दुसरे कागदपत्र प्रसिद्ध करण्याचाही योग गेले पांच वर्षांत आला नाहीं. तेव्हां आतां त्यावेळीं ठरविलेल्या नियमांप्रमाणें 'मराठी दफ्तर' ही संस्था बुडाली, असें झालें. व आतां या पुढें केव्हां आणखी रुमाल प्रसिद्ध झाल्यास त्या संस्थेचा त्याशीं संबंध उरला नाहीं.

इतक्या हौसेनें काढलेली संस्था महाराष्ट्रांत चालूं नये, किंवा ती मला चालवितां येऊं नये हें केवळ दुर्दैव आहे.

आपल्या पूर्वजांचे पराक्रम ऐकण्याची हौस महाराष्ट्राला थोडी फार आहे. पण त्या साठीं कांहीं द्रव्य खर्चावें व पदराला चट्टा लावून घ्यावा ही इच्छा महाराष्ट्राची दिसत नाहीं. 'इतिहास ऐतिहासिका'सारख्या मासिकाला पुरे दोनशें वर्गणीदारही मिळूं नयेत, 'रामदास रामदासी' तोटा खाऊन चालविणें भाग पडावें, 'ऐतिहासिक लेख संग्रहा'च्या संपादकाला माराकुटीनें तोंड मिळवणी करतां यावी, व स्वतःच्या उदरनिर्वाहासाठीं नाटकें लिहिण्याची पाळी यावी, या गोष्टी शरमेच्या आहेत. चांगला जुना ऐतिहासिक महत्वाचा लेख किंवा एखादें काव्य प्रसिद्ध करण्याचें एकही साधन महाराष्ट्रांत नसावें ही गोष्ट खचित कमीपणा आणणारी आहे. मोरोपंतासारख्या कवीचीहीं काव्यें पुरीं छापलीं जाऊं नयेत, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर, असल्या कवींची काव्येंही उपलब्ध असून छापल्या शिवाय राहावींत, याला काय ह्मणावें!! तुकारामासारख्या सर्व मान्य कवीची जुन्यांत जुनी संहिता मिळवून छापली असतां तिच्या शंभर प्रतीही संपूं नयेत, इतकेंच नव्हे तर शहाण्या ह्मणविणाऱ्या ज्ञात्यानांही तिचें महत्व कळूं नये हें काय जाणतेपणाचें लक्षण!!

आपल्या पूर्वजानीं स्वतंत्रतेसाठीं काय हाल सोसले, किती यत्न केले व कसे पराक्रम केले हे जाणण्यासाठीं जो दमडी खर्चूं इच्छित नाहीं त्या पाप्याच्या वंशजानां स्वतंत्रता कोठून मिळेल ? आपण स्वराज्य कमावलें कसें व तें हातचें गमावलें कसें याचा छेडा लावण्याची तंद्री ज्याचे मनाला लागत नाहीं, व या करतां जो तिडीक सोसीत नाहीं, त्याला आतां फिरून स्वराज्य कैचें ! ज्या राष्ट्रांशीं चढाओढ करावयाची आहे व ज्यांचे पंक्तिला जाऊन बसावयाचे आहे त्या राष्ट्रांच्या बरोबरीनें सर्व बाजूंनीं आपली संस्कृती वाढविली पाहिजे; शास्त्रें, साहित्य, इतिहास, काव्य, कला, नवीन शोध, शरीर जोपासना, सुप्रजा जनन, वगैरे झाडून सर्व बाबींत अनेक व्यवसाय चालू ठेवून, नित्यशः सुधारणा करून आपण कोणत्याही प्रकारें कमी नाहीं असें सिद्ध केलें पाहिजे. यापैकीं कोणतीही एक बाब स्वराज्य देणार नाहीं. पण या व अशा इतर लहान सहान बाबीं मेहनतीने सिद्ध केल्या ह्मणजे त्या सर्वांच्या एकवटीनें स्वराज्याची सिद्धी निःसंशय होईल; आणि या अनेक बाबींपैकींच इतिहासाचें संशोधन प्रकाशन व चिंतन हें एक होय. हिंदुस्थानांतल्या इतर कोणत्याही प्रांताला न साधणारी ही इतिहासाची बाब महाराष्ट्राला आयतीच साधली आहे. या बाबीचा—इतिहासाचा—नीट अभ्यास केला असतां पारतंत्र्याच्या खोल दरींतून स्वातंत्र्याच्या पर्वत शिखरावर जाण्याचा मार्ग डोळ्यानां नीट दिसूं लागेल. हिच्या योगानें या स्वातंत्र्य पर्वतावरील वाट चालतानां काय पाथेय बरोबर घेतले पाहिजे, या प्रवासाला किती तयारी केली पाहिजे, कोणता सरंजाम बाळगला पाहिजे, शरिराला किती कष्ट घडविले पाहिजेत हें नीट कळेल. अहंममता, जात्याभिमान, वृथा द्वेष हे धोंडे कंबरेला बांधून या वाटेवरील नदीनाले ओलांडणे अशक्य आहे, व हे सर्व दूर फेकून दिले पाहिजेत, शांततेच्या सुखाला लांचावलेल्या आयदी मनांला टोंचून टोंचून अनेक त्रास, अनेक कष्ट व अनेक संकटें सोसण्यास तयार करून मार्गक्षम केले पाहिजे, हे चांगले ध्यानांत येईल. अशी ही इतिहासाची दिव्य बाब आहे. हिच्या योगें पूर्वी ज्या चुका घडल्या असतील त्या टाळणें, जुन्या अनुभवसिद्ध ज्ञानापासून नवे मार्ग शोधून काढणें व मुलामुलींच्या मनांत स्वाभिमान, स्वदेशप्रीती, संकटपरंपरासहन करून अखेर सिद्धी मिळविण्याची उमेद, हीं जागृत करणें सोपें होईल. इतिहासाच्या योगें त्यांच्या दृष्टीला नवीन किरण दिसूं लागतील. महाराष्ट्रांतले डोंगर आणि नद्या, मैदानें आणि किल्ले त्यांच्याशीं बोलूं

लागतील आणि या अचेतन सृष्टीची भाषा त्यांच्यांत चैतन्य खेळवील, व परलोकांत गेलेले पूर्वज त्यांच्यांशीं पुन्हां पुन्हां संभाषण करूं लागतील, चित्त उदास झालें असतां त्यांचे पूर्वज तें उल्हासित करतील, मन हताश झालें तर ते त्यास धीर देतील, आणि कार्य विन्मुख होऊन चिंताग्रस्त झालेल्यानां कार्यक्षम करून त्यांन्यांत पुन्हां नवी तरतरी आणतील यांत संशय नाहीं. ही जादू, ही जागृतीची करामत, महाराष्ट्राच्या इतिहासांत पूर्णपणें भरलेली आहे. या इतिहास रसायनाचा हा चैतन्य गुण घालवून, त्याचा निःसत्व, निर्जीव, शिथिल, निर्विकार व बेचव चोथा बनवण्या करतां परकियानीं जे श्रम घेतले व जें द्रव्य खर्च केलें, त्याचे शतांश श्रम व द्रव्य आपण खर्चीं घातलें तर निःसंशय शक्तिवर्धक व स्वातंत्र्यदायक असें सुंदर ऐतिहासिक रसायन आपण निर्माण करूं शकूं. पण आपण कांहीं एक न करतां इतरांनीं बनविलेलीं औषधेंच ऐदीपणानें पोटांत कोंबूं लागलों व इतरांनीं घातलेल्या वाङ्मयाच्या पाणपोईचें मिळेल तसें गढूळ व मचुळ पाणी पिऊन मिटक्या मारीत बसलों तर आपली राष्ट्रीय जीवनयात्रा आपण लौकरच संपवूं यांत संशय नाहीं.

हें असें न व्हावें, व महाराष्ट्रीयांना त्यांची स्वतःची जाणीव नीट व्हावी याच हेतूनें मी ही "मराठी दफ्तर" नांवाची संस्था अनेक मित्रांच्या सल्ल्यानें सुरु केली, व हिला सर्वांचा हातभार लागून यांत सर्व महाराष्ट्रीयांनीं मनःपूर्वक भाग घ्यावा अशी माझे मनाची हौस होती. पण दुर्दैवानें ती पुरी झाली नाहीं, व मला ती पुरी करतां आली नाहीं. तरी आज नाहीं उद्यां पुढें केव्हांतरी महाराष्ट्रांतील जाणते पुरुष एक जुटीनें हें काम हातीं घेऊन उरकतील असा मला भरंवसा वाटतो. तूर्त आतां ही 'संस्था' बंद करून खाजगी रीतीनेंच काय थोडे फार काम होईल ते करावें इतकींच इच्छा मी धरतों.

विनायक लक्ष्मण भावे.

# मराठी दफ्तर रुमाल दुसरा यांतील लेखांची छापील प्रत अस्सल बरहुकूम असल्याचे दाखले.

(१) मराठी दप्तर रुमाल दुसरा यांत छापलेले लेखांक चार (१ सरदार गोखले यांची कैफियत, २ छत्रपतींची दिनचर्या टिपणी, ३ भट पेशवे घराण्याची हकीगत, व ४ कंपनी सरकारचा जाहिरनामा) हे सर्व छापील लेख मूळ अस्सल मोडी प्रतींशीं आम्हीं कसोशीनें तपासून पाहिले. ते सर्व अस्सल बरहुकूम बरोबर छापलेले आहेत. छत्रपतींची दिनचर्या हा लेख छत्रपतींच्या प्रसिद्ध चिटणीस घराण्यांतील पुरुषांच्या हस्ताक्षराचा आहे. तो अस्सल मोडी प्रतीवरून जशाचा तसा बालबोधींत छापला आहे.

ता. २७-४-१९२२.
मु. ठाणें.

**सखाराम गणेश मुजुमदार,**
'प्रभुरत्नमाला' व 'महाराणी जम्नाबाईसाहेब गायकवाड यांचें चरित्र' या पुस्तकांचे कर्ते.

(२) मराठी दफ्तर रुमाल २ यांतील चारी लेखांक मी त्या त्या लेखांच्या हस्त लिखीत प्रतीशीं ताडून पाहिले. ते सर्व अस्सल बरहुकूम नक्कल करून बरोबर छापले आहेत. अक्षर मात्रांचे क्षुल्लक हस्तदोष सोडले असतां या छापील प्रतींत व मूळ हस्तलिखींत प्रतींत कोणताही फरक नाहीं. ते सर्व बरोबर छापले आहेत.

**दत्तात्रय विष्णु आपटे.**
संपादक 'चित्रमय जगत' व 'श्रीरंगपट्टणची मोहीम' या ग्रंथांचे कर्ते.

# मराठी दफ्तर रुमाल दुसरा.

## प्रस्तावना.



या दुसऱ्या रुमालांत छापलेला लेखांक १ हा पाच्छापूरकरांच्या बखरीपैकीं शेवटला भाग आहे. सदर्हू बखर प्रो. पोतदार यांस भा. इ. मंडळाचे सभासद रा. त्रिं. ह. आवटे यांचेकडून मिळाली. तिचा परामर्ष निबंधद्वारा रा. द. वि. आपटे यांनीं संमेलन प्रसंगीं घेतला. व मग इष्ट तो मजकूर निवडून छापणेसाठीं ही बखर त्यांनीं माझे स्वाधीन केली. ही बखर सबंध न छापतां यांतील हा एकच भाग तेवढा या रुमालांत घेतला याचें कारण असें आहे कीं ही बखर बरीच विस्तृत आहे. पूर्तकालीं उभ्या बंदांचीं २५२ पानें यांतील मजकुरानें व्यापलीं असून पुन्हा उलटून मागचे आंगाला लिहीत लिहीत ५७ व्या पानाच्या पाठी-पर्यंत मजकुर लिहीला आहे. प्रत्येक पृष्ठावर सरासरीनें १६ ओळी आल्या आहेत. अक्षर सर्वभर वाटोळें व सुंदर आहे. ५७ वे पृष्ठावर मागचे आंगाला म्हणजे अगदीं शेवटीं ३॥ ओळी मजकूर अगदीं वाईट अक्षरानें लिहिला आहे. यांत ‘ हा मुलकी अहवाल खासगत राजेश्री जिवाजी केशव बापट याचा आहे ’ असें कोणी विठ्ठल गोविंद बापटानें लिहून ठेवलें आहे. या बखरींत—किंवा या मुलकी अहवालांत युधिष्ठिरापासून, तों तहत अव्वल इंग्रजीपर्यंतच्या राजांची यादी व हकीगत आहे. मुसलमानी पातशहा, सातारकर महाराज, प्रतिनिधी, पटवर्धन, रास्ते, बिनीवाले गोखले वगैरे अनेक कैफयत वाके यांत लिहिणारानें उतरून घेतले आहेत. बखरीच्या मागचे आंगावरील मजकूरांत तत्कालिन इतर अनेक माहिती लिहील्या आहेत. यापैकीं आम्हीं फक्त गोखले यांचीच कैफियत या रुमालांत छापीत आहों. ही हकीगत आनरबल इस्ट इंडिया कंपनीचे हुकमा-वरून लिहिली असून त्यांचेकडे धाडली होती असें दिसतें. ही हकीगत लिहिणारा इसम सरदार गोखले यांच्या विश्वासांतला व सहवासांतला असावा व तो प्रत्यक्ष डोळ्यानें पाहिलेल्या गोष्टी सांगत असून, त्या कंपनी सरकारकडे पाठविण्याच्या उद्देशानें लिहीत आहे हें लक्षांत घेण्याजोगें आहे. म्हणजे पुराव्याचा पडताळा घेऊन, स्वतःच्या माहितीची त्यांत भर घालून ही कैफियत लिहिली गेली असल्या-

मुळें हिचें अस्सलपण व हींतील मजकुराचें महत्व विशेष आहे, हें कोणाच्याही ध्यानांत येईल.

लेखांक २ हा अगदीं अस्सल आहे. हा रा. रा. कै. पांडोबा पटवर्धन यांचे-कडून मला कांहींवर्षांपूर्वी मिळाला. हा लेखांक म्हणजे चिटणीस घराण्यांतील तत्कालिन पुरुषानें यांतील गोष्टी घडल्या त्याचकाळीं लिहिलेली दिनचर्या उर्फ रोजनिशी आहे. ही सातारकर महाराजांच्या चिटणीसानें स्वहस्तें लिहिलेली असल्यामुळें पूर्णपणें विश्वसनीय आहे. ' बाळाजी आवजीच्या घराण्याचा श्री-छत्रपतींच्या घराण्याशीं चिटणविशीच्या नात्यानें पूर्वापार संबंध असल्यामुळें ही बारनिशी, बोरगांवकर चिटणीसांच्या घराण्यांत होती. तेथून ती रा. कै. पटवर्धन यांनीं श्री. रा. रा. पोतनीस उरवडेकर यांचेकडून मिळविली. ही बारनिशी दिल्या-बद्दल श्रीमंत पोतनीस व श्री. चिटणवीस या दोघांचेही महाराष्ट्रावर फार उपकार आहेत. ही फुलिस्केप बंदाच्या चतुर्थांशाच्या आकाराची असून हिचें अक्षर येथून तेथून चिटणीसी वळणाचें चांगलें घोंसदार व ठसकेदार आहे. हींत उल्लेखलेलें कारस्थान करणारांत अग्रेसर असें जें सातारकर चिटणीस घराणें त्यांपैकीं रा. बळवंतराव चिटणिसानें ही लिहिली आहे असें म्हणतात. हींत मित्तीवार हकीगत सांगितली आहे व ज्या मित्तीस कांहीं विशेष घडलें नाहीं ती मित्ती घालून व ओळ काढून खालीं दोन चार बोटें जागा सुटी ठेवली आहे. यांत दोन चार ठिकाणीं मागाहून बारिक शोध घातलेले दिसतात; पण ते फारच थोडे आहेत. ही बारनिशी बुक वजा बांधली आहे. शेवटीं बरींच पानें कोरीं आहेत. पण मध्येंच थोडासा खर्चाचा तपशिली मजकूर आहे. व पुढें आणखी कांहीं पानें सोडून इंग्रजांशीं झालेला तह इंग्रजींत उतरून ठेवला आहे. ही बारनिशी तत्कालिन असल्यामुळें पहिल्या प्रतीच्या अस्सल दर्जाच्या ऐतिहासिक लेखांत हिची गणना करणें अवश्य आहे.

लेखांक ३ तीन ह्मणजे पेशवे घराण्याची हकीगत: हा लेखांक लांब उभ्या जुन्या कागदावर लिहिलेला आहे. मूळ लेखाचीं पानें लांबीला लहान मोठीं अशी निरनिराळ्या आकारांची आहेत. व अक्षरेंही दोन तीन वळणाचीं आहेत. हा लेख मळेकर पटवर्धनांचे पूर्वज कै० माधवराव गंगाधर ऊर्फ बाबासाहेब, यांनीं सजविला असावा असें वाटतें. मजजवळील प्रतीवर लेखन काल किंवा लेखकाचें

नांव वगैरे कांहीं एक नाहीं. सदहू लेखक पेशव्यांचे घराण्याच्या पूर्ण परिचयाचा असून अनेक प्रसंग प्रत्यक्ष पाहिलेला व अनुभवलेला असा दिसतो. या लेखाच्या मजजवळील प्रतींत खोडाखोड व मागाहून लिहिलेला असा मजकूर दहा पांच ठिकाणीं आहे. पण अक्षराच्या वळणावरून व संदर्भावरून तो मूळ लेखकानेच लिहिला असला पाहिजे हें उघड दिसतें. या करतां तो निराळा दाखविला नाहीं.

लेखांक ४ चार हा श्रीमंत कैलासवासी बाजीराव रघुनाथ साहेब पेशवे हे पुणे सोडून गेल्यानंतर अनराबल ईस्ट इंडिया कंपनीनें काढलेला जाहिरनामा आहे. याच्या तीन चार प्रती मजजवळ आहेत. यापैकीं एकीवर कंपनी बहादुर तर्फे पांटिजर साहेबाची सही उजवे बाजूला असून वर मथाळयावर कंपनी सरकारचा शिक्का आहे. याची एक प्रत मला श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार यांजकडून मिळाली. जाहिरनामा उभ्या लांब खर्ची बंदांवर चांगल्या सुवाच्य अक्षरानें लिहिलेला आहे. व याचे एकंदर चार बंद आहेत. पुढें छापलेला जाहिरनामा सही शिक्याच्या प्रतीवरून नकल करून छापला आहे.

हें या रुमालांतल्या चार लेखांच्या मूळ स्वरूपासंबंधें झालें. आतां यांतील मजकुरासंबंधें थोडा विचार करूं. लेखांक ४ हा श्रीमंत बाजीराव रघुनाथ साहेब हे पुणें शहर सोडून गेल्यानंतर कुंपणी सरकारच्या मुत्सद्यांनीं आपणा महाराष्ट्रीयांपुढें कुंपणीची बाजू नीट मांडण्याकरतां, व महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट केल्यामुळें त्यास त्वेष येऊं न देतां तेथील लोकांचें सांत्वन व्हावें व श्रीमंतांबद्दलचा लोकांचा आदर नाहींसा व्हावा व आपलीं कृत्यें न्याय्य वाटावीं व आपल्यास विरोध करणाऱ्यांस धाक बसावा, या हेतूनें काढलेला जाहिरनामा होय. असे हे जाहिरनामे काढून जनतेच्या पुढाऱ्यासंबंधें जनतेच्या मनांत अनादर उत्पन्न करावा, व जिंकणाऱ्यांकडे लोकांचीं मनें वळवावी, व आपण जिंकले जाण्यांतच आपलें कल्याण आहे असें लोकांस वाटवावें हा हेतु मुख्य असतो. असे जाहिरनामें काढण्याची कला युरोपांत बरीच पसरली होती. व या अशा जाहिरनाम्यानेंच १८१४ सालीं टालिरंडनें नेपोलियनचे विरुद्ध फ्रेंचांचीं मनें बिघडवून त्यांस इंग्रजांच्या बाजूस वळविलें. टालिरंडनें १८१४ त पारिसमध्यें जो डाव टाकला तोच डाव १८१८ मध्यें कुंपिणीनें महाराष्ट्रांत आपल्यावर टाकला. या जाहिर-

नाम्यांतील अनेक गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. इतिहासज्ञ त्यांचा विचार करतील. मी फक्त या जाहिरनाम्यासंबंधें त्या वेळच्या, कंपनीसरकारच्या एक दोघा लष्करी अमलदाराचें व मुत्सद्यांचें काय म्हणणें आहे तेवढेंच देतों.

या काळचा एक इतिहासकार व लष्करी हापीसर म्हणतोः—

The object of all political manifestoes is to make out a case and this contains the British side of the question. The other side is never publicly exhibited; for the Native powers have yet to learn the practice of this diplomatic weapen. It may be easily imagined without supposing any fundamental misrepresentation on the part of the Author of the British Manifesto that it might be met by a very plausible counter statement, had the native powers an experienced and well informed Advocate. At present the epithets of "Treacherous" and "Faithless" are so commonly applied to the conduct of the Marathas that whatever foundation there is for the general imputation by no discrimination are any of their acts exempted from that character. Yet how easy would it be to draw a parallel between their conduct as on many occasions it has been thus represented and that of European powers which is not only considered with toleration but even applauded.

*Blacker's Maratha War, 1817/18 & 19, Page 254.*

या जाहिरनाम्या संबंधें मेजर आलिफंट ह्मणतातः—

When in 1817/18 the Peishwa Bajee Rav was in arm against the British Government, one of his first acts after the Battle of Poona was to secure the person of the Raja of Satara to cause him to accompany his camp, and thus to identify with himself the lawful sovereign of the empire. The representative of the British empire the Hon. Mr. Elphinstone fully sensible of the importance of this measure to the cause of Bajee Rav, resolved to counteract it; and suggested to the Governor General "to set up

the Raja of Satara" with the view of bringing the war more speedily to a close by inducing the Maratha Chiefs to quit the Peshwa's standard. The suggession was approved and the following proclamation was issued on the 11th February 1818:—

पार्लमेंटरी पेपरस, P. १३४.

या जाहिरनाम्याचा थोडासा परिणाम झालाच. पण पुष्कळ सरदार व मुत्सद्दी व शिपाई हे निमकहराम होण्यास कबूल होत नाहींत. श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं उभें केलेलें स्वराज्याचें निशाण काढून टाकून त्याचेपासून ते दूर सरत नाहीं. इतके दिवस खाल्लेल्या अन्नाची भीड त्यांना सुटत नाहीं, व स्वराज्याच्या वृक्षाला ते आपल्या हातानें तोडूं इच्छीत नाहींत. हें पाहून याला उपाय ह्मणून कंपणी सरकारनें सातारच्या छत्रपती महाराजांकडून त्याच सालीं फाल्गुन वद्य २ ला दुसरा एक जाहिरनामा काढविला, व त्यांत बाजीराव हा बंड आहे, त्याचें कोणी ऐकूं नये, व त्याच्याशीं कोणताही संबंध ठेवूं नये, किंवा पत्रव्यवहारही ठेवूं नये, त्याच्याशीं संबंध ठेवील त्याची मालमत्ता जप्त केली जाईल वगैरे अर्थाचा मजकूर महाराष्ट्रांतील प्रजेस जाहीर केला. हा जाहिरनामा प्रसिद्धच आहे. तेव्हां हा येथें न देतां हा कंपनी सरकारनें कां प्रसिद्ध करविला हें ज्यावरून स्पष्ट होईल असें सर टामस मनरोनें लिहिलेलें ता. २९ मार्च सन १८१८ चें एक पत्र मात्र येथें देतों. हें देण्याचें कारण कीं यावरून पहिल्या ह्मणजे ११ फेब्रुवारी सन १८१८ च्या जाहिरनाम्याचीही उपपत्ती नीट लागेल.

I am anxious to hear that the ceremony of placing the Rajah of Sattara on the Musnud has been performed, because it would probably hasten the termination of hostilities and the settlement of the country. The limits of his principility might be left undefined for the present. He should be required to summon Bajee Rao (the Peishwah) and his principal Chiefs to his presence, and in case of their not obeying, to proclaim Bajee Rao and all who adhered to him, rebels. Though the natives would understand perfectly well the relation between the Raja and the British Government, and the motives which dictated this proclamation, this would not prevent it

from having the desired effect. The Chiefs who have left Bajee Rao, as well as some of those who will follow him have, in their communications with us, always brought forward the disgrace they would sustain from the charge of rebellion and ingratitude, were they to abandon him, and have often called upon us to point out how their character might be saved from such a reproach. The orders of the Raja of Sattara will, I have no doubt, be received both by the Chiefs who have already deserted Bajee Rao, and by those who wish to leave him, as a full justification of their conduct, and these orders will also, I think, have a considerable effect in intimidating even those few Chiefs who are really attached to Bajee Rao, and in inducing them to forsake his standard ; and it might likewise be advisable to send them to the Killadars of all sorts, commanding them to surrender.

असे आणखीही उतारे देतां येतील. पण या जाहिरनाम्याची फोड करण्यास हे इतकेच पुरेसे आहेत.

लेखांक तीन हा पटवर्धनांपैकीं एका पुरुषानें लिहिलेला भट घराण्याचा वृत्तान्त आहे. लेखकाचा व या घराण्याचा निकट परिचय असून अनेक अस्सल कागदपत्रांच्या आधारें हा लेख लिहिला असल्यामुळें याचें महत्व फार आहे. यांत या घराण्यासंबंधीं पुष्कळ लहान सहान पण महत्वाच्या बाबी आल्या आहेत. पेशव्यांचा मूळ पुरुष बाळाजी विश्वनाथाचा आजा परशरामपंत हा शिवाजी महाराजांचे हाताखालीं दोन हजार फौजेचा सरदार होता ही बाब अगदीं नवी आहे. बाळाजीपंतनानांच्या आजाचें नांव अनंत असें त्यांच्या नाशिक येथील उपाध्यांच्या वहीवरून होतें. पण परशराम हें नांव इतरत्रही आढळतें. कोडितकर अत्रे यांचेकडे पुष्कळ महत्वाचे कागदपत्र आहेत. त्यांत पेशवे यांचा हकीगत वाका आहे.[१] या वाक्यांत " पेशवे यांचा मूळपुरुष परशरामपंतभट श्रीवर्धनकर

१ याची नक्कल रा. पुरंदरे यांनीं मजकडे पाठविली. त्यांतून हा उतारा घेतला आहे. बाळाजी विश्वनाथाच्या आजाचे मूळ नांव अंताजी असून त्यास परशराम ह्मणत असत. घरांत आजी हयात असतां नातवाचे नांव नवऱ्याचें ठेविलें असतां त्यास इतर नांवानें हाक मारण्याचा प्रघात सर्वत्र आहे.

हे प्रपंचाच्या तापत्रयामुळें शिवाजी राजे पुंडावे करीत होते त्याजवळ येऊन करवीरचे मुक्कामीं येऊन भेटले. सर्व हकीगत विदित करोन खास कोठीवर राहिले. पुढें चिरंजीव विश्वासराव हेही आले. त्यांचें कर्तृत्व पाहून राजे याणीं सरदारी सांगितली." असा उल्लेख आहे. याचप्रमाणें रा. दिवेकर यांचे मार्फत मिळालेल्या दुसऱ्या एका बखरींत या घराण्याचा पूर्वापार उल्लेख असून तींत 'संभाजी महाराजांस धरून नेलें त्यावेळीं बाजीराव (विश्वनाथ परशराम यांस बाजीराव म्हणत असावेत) हे त्यांचे मागोमाग गेले व पुढें बाजीरावांनीं दिल्लींत पुंडावे आरंभिले'[1] असें म्हटलें आहे. भट व भोंसले या घराण्यांचा श्रीशिवाजीमहाराजांच्या वेळेपासून संबंध सिद्ध करणारे हे उल्लेख ऐतिहासिकदृष्ट्या महत्वाचे आहेत. व पुढें श्रीमंत नानासाहेब (बाळाजी बाजीराव) हे 'आपण शिवाजी महाराजांचे शिष्य आहों,' असें अभिमानानें म्हणतात त्याचाही अर्थ आतां बरोबर जुळतो. नानासाहेबांचा भावार्थ, असा कीं गेल्या चार पिढ्यांपासून आपले कुटुंबास शिवाजी महाराजांचें वळण व अभिमान आहे. तसेंच बाळाजी विश्वनाथाचा भाऊ जानो विश्वनाथ हा गोणत्यांत घालून बुडविल्याची अख्यायिका माहितगार लेखक उल्लेखित नाहीं. यावरून ही अख्यायिका साफ खोटी असावी असें दिसतें. आणि हें खरें आहे. जानो विश्वनाथाचीं दोन अस्सल पत्रें मजजवळ आहेत. त्यांवरून बाळाजी विश्वनाथ पेशवा झाल्यानंतर जानो विश्वनाथाकडे 'सरसुभेदार' पणाचें पद होतें असें होतें. हा जानो विश्वनाथही आपल्या भावाप्रमाणेंच कर्तबगारीचा पुरुष होता. यापैकीं एक पत्र इसने मया व अलफमधील म्हणजे शके १६२३ मधील आहे. त्यांत जानो विश्वनाथ सरसुभेदार प्रांत पुणें असें म्हटलें असून या पत्रावर डावे बाजूला जानो विश्वनाथाचा शिक्का आहे व शेवटीं 'मोर्तबसुद' असा शिक्का आहे. जानो विश्वनाथाचा शिक्का आहे त्यांतील अक्षरें पुढीलप्रमाणें आहेतः—" श्री पार्वतीकांतभक्त स्य विश्वनाथात्मज न्मनः ॥ जनार्दनस्य मुद्रेयं भाति लक्ष्मी गजान्विता ॥

हा लेख लिहिणाऱ्यानें पूर्वीचे अस्सल कागदपत्र व दाखले पाहून, शक वगैरे देऊन फार काळजीनें हा लेख लिहिलेला दिसतो. महाराष्ट्रांतील लहान थोरांस

---

१ बाळाजी विश्वनाथ लिहितो कीं, "आपले वडे (बाप) मुदतलला परागंदा होऊन मराठे राज्यांत गेले" (भा. इ. म. पु. १८ पृ. ९०) हेंही वाक्य विचार करण्यासारखें आहे.

हा लेख फार मनापासून आवडेल व प्रत्येक घरांत दिवाणखान्यापासून स्वयंपाक घरापर्यंत—सर्वभर हा लेख वाचला आणि ऐकला जाईल अशी मला खात्री वाटते.

या लेखांपैकीं लेखांक १ हा बाजीराव रघुनाथापाशीं शेवटपर्यंत इमानानें राहणाऱ्या लेखकानें लिहीला आहे. व हा आनरेबल कुंपिणी सरकारतर्फे 'बुलटन' साहेब यांनीं केलेल्या हुकमावरून कुंपिणी सरकारपाशीं पुढील योगक्षेम चालविण्यासाठीं कांहीं साधन मिळावें या अपेक्षेनें लिहून कंपनीसरकारकडे सादर केलेला आहे. अर्थात यांत श्रीमंत बाजीराव साहेबांसंबंधें थोडासा कमीपणा घेऊन व ज्या गोष्टी सर्वमान्य आहेत—निदान कंपनीसरकारच्या अम्मलदारांना मान्य व माहीत आहेत—तेवढ्याच उल्लेखिलेल्या असणार हें उघड आहे. यांत सरदार बापु गोखले हे इंग्रज सरकारचे दोस्त व प्रारंभीं इंग्रजांनींच यांना कांहींसे पेशव्यांकडे शिफारस करून लावले होते, ही ऐकिव माहिती दिलेली आहे. पण पुढें इंग्रजी मुत्सद्यांचें त्या शूर स्वामिनिष्ठ सरदाराशीं वर्तन आणि त्यानें पाठविलेला रोकडा जबाब वाचून मात्र मन सद्गदित होतें. व मनांत तिरस्कार आणि अभिमान यांचें काहूर उठतें. महाराष्ट्राच्या ऐन आणिबाणीच्या वेळीं आपल्या सर्वस्वाची भिस्त महाराष्ट्रानें ज्याचे शौर्यावर ठेवली त्या सरदार बापु गोखल्यांना फितवण्याच्या उद्देशानें इंग्रज बहादुर यांनीं निरोप पाठविले कीं तूर्त लढाई नमुद केली आहे. या वेळीं आपली व आमची दोस्ती इकडील लक्षांत असावी इ. इ.' या निरोपास त्या थोर पुरुषानें उत्तर दिलें कीं 'आपण ज्यांचे पदरीं आम्हांस ठेविलें त्याचे इमानइतबारी चाकरीवर प्राण गेला तर चिंता नाहीं. तूर्त त्यांच्याशीं बेइमानी केल्यास तुम्ही दौलत द्याल. पण लोकांचा अपवाद आणि परलोक नाहीं. हें कर्म आमच्यानें होणार नाहीं.........स्वामिद्रोह आहे. आम्ही करून स्वप्राणानिसीं राहूं व त्या योगानें दौलत मिळवूं.........त्यापेक्षां जीवन माफक सन्मुख युद्धामध्यें सरकार कामावर आल्यास ( मरण पावल्यास ) श्रेयस्कर आहे.' हें उत्तर आमच्या लोकांनीं नित्य वाचावें, याचें नित्य मनन करावें आणि हें सोन्याच्या अक्षरांनीं लिहून देवघरांत ठेवून त्याची नित्य पूजा करावी इतक्या योग्यतेचें आहे. हा लेखांक वाचला असतां बाजीराव रघुनाथ उर्फ बाबासाहेब यांच्या एकंदर चरित्रावर व त्यांतल्या त्यांत त्यांच्या पेशवाईपदाच्या शेवटील काळांवर अगदीं नवा प्रकाश पडतो.

लेखांक २ ह्मणजे सातारकर महाराजांची दिनचर्या. या अत्यंत महत्वाच्या लेखांत अनेक गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. हा लेख लिहिणारा इसम बाजीराव रघुनाथाच्या विरुद्धपक्षाचा होता. व ही दिनचर्या तत्पक्षीय लोकांच्या सहवासांत लिहिली आहे. तसेंच श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह महाराजांच्या नेहमीं जवळ असणाऱ्या इसमानें प्रत्यक्ष पाहिलेल्या व ऐकिलेल्या गोष्टींचे हें त्याच वेळीं केलेलें टांचण असल्यामुळें हा लेख फार काळजी पूर्वक वाचणें अवश्य आहे. आठ महिन्यांची ही हकीगत नीट वाचून एलफिस्टन, ग्रांड डफ वगैरेनीं आपल्या ग्रंथांत याच दिवसांची दिलेली हकीगत तिच्याशी ताडून पाहिली असतां या इतिहासकारानीं आपले ग्रंथ काय उद्देशानें लिहिले व ते कोणत्या प्रकारें सजविले याची नीट कल्पना येते. व मराठ्यांनीं आपले इतिहास आपण स्वतःच आंग मोडून कां लिहिले पाहिजेत याचें कारण स्पष्ट होतें.

या रुमालांतले लेखांक १ व २ हे दोन्ही लेखांक वाचून झाले ह्मणजे श्रीमंत बाजीराव रघुनाथाबद्दलचे आपले विचार सहजासहजी बदलूं लागतात, व लहानपणापासून आपल्या मनावर बिंबवलेल्या कल्पना हळूहळू झडूं लागतात. बाजीराव अगदीं आयदी व पळपुटा असून, केवळ ऐषआरामाचें सुख शांततेनें भोगण्यासाठीं त्यांनीं इंग्रजाच्या हातावर मराठी राज्याचें उदक घातलें, ही कल्पना तर अगदींच साफ लयास जाते. इतकेंच नव्हे तर मराठ्यांचे राज्य राखण्यासाठीं त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें आटोकाट यत्न केले हें ह्मणणें भाग पडतें. अगदीं अखेरपर्यंत तो सारखा झगडत होता. इंग्रजांचा पाय मराठी राज्यांतून काढून टाकावा यासाठीं त्यानें अनेक कारस्थानें केलीं. लक्षावधि रुपये खर्च केले व अगदीं शेवटी खालावलेल्या स्थितींतही एक कोट रुपये त्यानें आपल्या विश्वासांतल्या सरदाराजवळ सैन्य उभारण्या करतां दिले; धुळपास सांगून आरमाराचे डागडोजीचें काम चालविलें; भोसले यांस वस्त्रें पाठविली. काळे, मेंधळे वगैरे बिनसलेल्या सरदारांना लोभ दाखवून त्यास लढाई देण्यास वळविलें. अशी त्यानें लढाईची तयारी केली व शत्रूस तोंड दिलें. प्रत्यक्ष युद्धांत लढाईचे दिवशीं त्याला कूच करून जाण्याविषयीं त्याचा मुख्य सेनापती गोखले यानें सांगितलें असतांही तो अखेरपर्यंत गेला नाहीं. इतकेंच नव्हे तर असा सल्ला वारंवार दिल्याबद्दल त्यानें आपल्या सेनापतीस दोष दिला. आपले बरोबरच्या इमानी शिपायांस व सरदारांस सोडून स्वसंरक्षणार्थ तो पळाला नाहीं. उलट त्याचे

सरदार व शिपाई मात्र त्यास सोडून ऐन प्रसंगाचे वेळीं पळून गेले. गोड घांस सुखानें मिळत होता तोंपर्यंत त्यांनीं यथेच्छ आकंठ खाल्ला. पण आपल्या अन्न-दात्यावर संकट येतांच ते मतलब साधून दूर सरले बाजू सावरून धरणेची आशा आहे तोंपर्यंत छातीचा कोट करून कोणीही शहाणा सरदार सैन्यास धीर देत उभा राहील. पण जो बाजू पूर्णपणें आंगावर येते असें दिसत असतांही शिपायांना नशिबाच्या स्वाधीन करून पाय काढणार नाहीं तोच धनी खरा. बाजीराव नुसता एकटाच सैन्यांत होता असें नाहीं, तर आपले बायकोस मर्दानी पोषाख चढवून त्यानें तीस बरोबर सैन्यांत घेतली होती. आपल्या पतीबरोबर मृदु शय्येवर आणि समरांगणांत दोहींकडे सारख्याच उल्हासानें असणाऱ्या स्त्रियांचीं उदाहरणें युरोपांतच काय पण महाराष्ट्राबाहेर इतर कोठेंही फारच क्वचित आढळतील. आतां सैन्याचा मोड होऊं लागला असतां तेथून कूच करून दुसरी-कडे जाणें व तेथें पुन्हा तोंड देणें याला कोणीही पळून जाणें म्हणत नाहीं, व म्हणणारही नाहीं. असा कोणता सरदार आहे कीं साधत असतां हें ज्यानें केलें नाहीं ? मग बाजीरावालाच पळपुटा म्हणावें हा कोठला न्याय ? ज्याचा डाव साधला तो शहाणा, व ज्याचा डाव गेला तो मूर्ख हाच एक जगांतला न्याय आहे. दुसरें काय ?

हें असो. पळाला कोण ? किंवा अमुक पळपुटा होता कीं नाहीं ? यापेक्षां मराठ्यांचें राज्य आत्मसुखाकरतां परकियांच्या हातांत कोणीं दिलें ? हा प्रश्न विशेष महत्वाचा आहे. आणि याचें उत्तर हा नं० २ चा लेखांक पूर्णपणें देतो. शेवटील झटापटीपूर्वी दोन तीन वर्षें सातारच्या छत्रपतींनीं इंग्रजांशीं गुप्त खलबत करून कांहीं संकेत ठरवला होता. व आपण होऊन इंग्रजांच्या स्वाधीन होण्या-विषयीं करार मदार केला होता. या गोष्टीचा संशय किंवा सुगावा—बाजीरावाला होता. व आपल्या खावंदाच्या या चाळ्यानें राष्ट्रावर येणारा अनर्थकारक प्रसंग टळावा म्हणून त्यानें त्याला आपल्या बरोबर नजरेखालीं घेतलें होतें. पण तितक्यांतूनही संधी काढून तो धनी इंग्रजांच्या स्वाधीन झालाच. घरचा मालक, राज्याचा खावंद, स्वतः छत्रपती महाराज, जर आपण होऊन उठून जाऊन शत्रूच्या स्वाधीन झाले तर त्याच्या मुनिमानें काय करावयाचें होतें ? फ्रान्सच्या लुई राजानें व त्याच्या राणीनें आपल्या लोकांचे नुसते बेत परकियांस कळविले, किंवा आपल्या आसेष्टांस आपल्या मदतीस म्हणून बोलविलें, तेव्हां त्यांच्या प्रजेनें

काय केलें ? पण त्यावेळीं फ्रेंच लोक वेडावून गेले होते व वेडाच्या भरांत त्यांनीं अनन्वित कृत्यें केलीं; असें कोणी म्हणेल. या करतां हा दाखला आपण सोडून देऊं. व क्षणभर अशी कल्पना करूं कीं गेल्या महायुद्धाचे वेळेस आपले बादशहा पंचमजार्ज हे जर जाऊन कैसरच्या स्वाधीन होण्याचा यत्न करते, किंवा जरमन सेनापतींशीं, आपल्या प्रधानमंडळाविरुद्ध त्यांनीं नुसता पत्रव्यवहार ठेवला असता तर आस्क्विथसाहेब किंवा लाईड जार्ज यांनीं त्यांचें काय केलें असतें ! काय केलें असतें याचें उत्तर एखादें लहान पोर देखील देईल. मग तें आणखी येथें प्रत्यक्ष लिहिणें कशाला ? ग्रीसचा राजा कान्स्टेंटाइन याचे त्याचा प्रधान व्हेनिजुलास यानें परवांचे दिवशीं काय केलें. व त्यावेळीं इंग्रजांनीं त्याबद्दल व्हेनेजुलासची किती पाठ थोपटली हें जाहीर आहे ? तेव्हां आणिबाणीच्या वेळीं व राष्ट्रांत युद्ध प्रसंग चालू असतां तेथील राजा झाला म्हणून त्यानें कसें वागावें हा सिद्धांत ठरलेला आहे. आणि या सिद्धांता विरुद्ध वागणाऱ्या राजाला कोणती बक्षिसी देणें राष्ट्रीयदृष्ट्या अवश्य आहे हेंही उघड आहे. यांत आदब राखण्याच्या, दयेच्या, धर्माच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही सबबीनें गय केली, तर त्याचा परिणाम कसा घडतो हें कोणीही सांगू शकेल. यावेळीं राष्ट्राचीं सूत्रें ज्याच्या हातांत असतील, राष्ट्रसंरक्षणाची जबाबदारी ज्याचे शिरावर असेल त्यानें असा मनुष्य देशद्रोही, व राष्ट्रद्रोही समजून ज्यांना मराठी राज्याची पोट तिडीक आहे असे जाधव, शिर्के वगैरेसारखे चार कुळवान मराठे जमवून व त्यांचे पुढें हा आरोप शाबित करून त्यांचे सल्यानें सर्वांसमक्ष त्याला झाडावर टांगून देहान्त प्रायश्चित देणें अवश्य व न्याय्य होईल आणि हें करण्याची हिंमत बाजीरावानें केली नाहीं म्हणून राज्य गमवून, राष्ट्राचा नाश करून तो फजित पावला व लोक त्याला बेहिमती, कमअकली, धोरणशून्य आणि मूर्ख म्हणू लागले.

या संबंधांत सातारकर महाराजांतर्फे असें म्हणतां येतें कीं त्यांस बाजीरावानें कैदेंत ठेवलें होतें, व त्यांची आज्ञा त्यानें शिरसावंद्य केली नाहीं म्हणून ते शत्रूस जाऊन मिळाले. पण हें म्हणणें फारसें टिकाऊ नाहीं. बाजीराव हा गादीचा एक नोकर होता. त्यास महाराजांनीं दूर करून त्याची खोड मोडावयास पाहिजे होती. त्यास काढून व काढल्याचें जाहीर करून कोणीही दुसरा इसम ते त्या जागीं नेमते किंवा स्वतःच कारभार पाहते तरी फार उत्तम झालें असतें. पण तेवढा आटोप महाराजांत नव्हता. आणि असें होतें तर त्यांनीं आपल्या गादीवर दुसरा कोणी

पराक्रमी पुरुष नेमावयाचा होता. किंवा प्रतिनिधीच्या अथवा चिटणीसांच्या हातीं कारभार द्यावयाचा होता. पण तसें न करतां ते जाऊन शत्रूच्या अंकित झाले. परक्या सैन्याच्या जोरावर जो राजा आपला अंमल बसवूं पाहतो, तो नेहमीं फसतो. शत्रूच्या मदतीनें जो राजा आपल्या राजधानींत प्रवेश करतो त्याचे हातांत ती राजधानी कधींही फार काळ टिकत नाहीं. महाराज, महाराजांचे चिटणीस, त्यांचे खानदानी सल्लागार या सगळ्यांचीच अक्कल कशी गेली याचें फार नवल वाटतें. इंग्रजांनीं राघोबादादाला व त्याचे मुलाला अडचणींत गांठून त्याजपासून राष्ट्राला परिणामीं घातक असे तह करून घेतले, व या बापलेकांनीं पेंचांत सांपडून ते करून दिले हें खरें आहे. यावेळीं हे तह पाळणें इंग्रजांच्या नीतीप्रमाणें तर मुळींच भाग नव्हतें. कारण एक तर उघड लढाईत फौजा लढवून व त्यांत लढाईत पराजय पावल्यामुळें हे तह केले नव्हते. वडगांवचे लढाईत इंग्रजी सेनापतीनें लढाईत अपयश पावून कंपनीच्या सही शिक्यानिशीं करून दिलेला तहही नीट पाळला गेला नाहीं. या तहाबद्दल पेशव्यांचे वकील सेवकराम यास वार्न हेस्टींग्सनें सांगितलें कीं ‘ पेशवे सरकारांनीं मुंबईच्या इंग्रजी फौजेच्या अधिकाऱ्यांस कैद करून घेतलेले करार मदार इंग्रजांच्या जातीच्या मोठेपणास व कंपनी सरकारच्या हक्कास कमीपणा व बाध आणणारे आहेत. व ते आमचे परवानगीशिवाय त्यांनीं अडचणींत सांपडून निरूपायानें लिहून दिलेले आहेत. आणि म्हणून ते आम्हास बिलकुल संमत नाहींत. व ते करार मदार केवळ नामंजूर व रद्द समजावेत.’ तेव्हां हे तह पाळणें महाराष्ट्राचे खाविंद सातारकर महाराज यांना भागच होतें असें नाहीं. कोणी नोकर धन्याला अपायकारक असें वचन प्रमाण धन्याच्या सल्याशिवाय देईल तर तें धन्याला बंधनकारक नाहीं हें उघड आहे त्यांतून दिलेलें वचन केवळ अडचणींत सांपडून, स्वतःच्या बचावाकरतां किंवा फायद्याकरतां एखाद्या नोकरानें दिलें तर तें मुळीं वचनच नव्हे. असें स्वतःच्या मतलबाकरतां व वैयक्तिक नफ्याकरतां वचन देणारा नोकर, तह करणारा प्रधान हा केवळ शिक्षेस पात्र होईल. व तें वचन साफ झिटकारून टाकणें न्याय्य व योग्य होईल. किंबहुना असलें वचन पाळणें हा एक तऱ्हेनें गुन्हा होईल. राष्ट्रधर्माच्या दृष्टीनें तें पाळणारा राजा राष्ट्राचा अधःपात करणारा पातकी ठरेल.

हा लेखांक वाचला म्हणजे बाजीरावानें स्वराज्याचें उदक इंग्रजांच्या हातावर घातलें हें म्हणणें तुलें पडतें. स्वराज्यावर तिलांजली देऊन महाराष्ट्राचें उदक

सातारकर महाराजांनीं आपण होऊन इंग्रजांच्या हातावर घातलें ही गोष्ट स्पष्ट होते. आणि या दानाची सामग्री करून त्याचे सर्व मंत्र महाराजांच्या चिटणिसांनीं म्हटलें असें होतें. पेशव्यांनीं पेशवाई बुडवली, बाजीरावानें राज्य घालवलें, हीं वाक्यें उच्चारण्याचें यापुढें महाराष्ट्र टाकून देईल. व सातारकर महाराजांनीं महाराष्ट्र इंग्रजांच्या स्वाधीन केला, व प्रतापसिंह महाराजांनीं स्वराज्य गमावलें असें महाराष्ट्र, हिंदुस्थान व जग म्हणूं लागेल. असें करतांना आपण राष्ट्राचें केवढें नुकसान करीत आहों हें चिटणविसांच्या यत्किंचित तरी ध्यानांत येतें, आपण किती पातकाचे धनी होत आहों हें थोडें तरी महाराजांच्या लक्षांत येतें तरी ते खास असें करतेना. नवल असें कीं हा आत्मघात तुम्हीं करूं नका, महाराष्ट्राच्या मानेवर हा घाव मारूं नका असें सांगणारा एकही इसम सातारकरांच्या प्रभावळींत उभा राहिला नाहीं हें आपलें दुर्दैव म्हणावें. दुसरें काय! यापेक्षां त्यांनीं स्वहस्तानें बाजीरावाच्या मानेवर आघात केला असता तरी पुरवता. फार काय ते स्वतःवर आघात करते तरी तेंही महाराष्ट्रानें साहिलें असतें. श्री. संभाजी महाराजांनीं मोरोपंत पिंगळ्यासारख्या पेशव्याला तुरुंगांत टाकलें, बाळाजी आवजीसारख्या चिटणीसाला हत्तीच्या पायीं दिलें, मातुश्री सईबाईला भिंतींत चिणून मारलें पण तितकेंही सगळें महाराष्ट्रानें सोसलें. व त्यांतूनही त्यानें पुढें वर डोकें काढलें. ती राक्षसी करणी महाराष्ट्रानें गिळून टाकली. पण ही प्रतापसिंह महाराजांची करणी महाराष्ट्राच्या वर्मींच लागली. व तिनें महाराष्ट्राला जमिनीवर लोळविलें. बाळाजी विश्वनाथापासून चार सहा पिढ्या पेशव्यांच्या पुरुषांनीं कमरेला तरवार बांधून उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत सतत गस्त घातली, सदैव महाराष्ट्राची कोतवाली केली, महाराष्ट्रानें स्वस्थ निजावें याकरतां जे रात्रंदिवस जागत राहिले, व अनेक संकटें भोगलीं तीं सर्व लयास गेलीं. राघोबानें व बाजीरावानें दरवाजाची दिंडी उघडून इंग्रजांस आंत घेतलें हें खरें असलें तरी आंत आलेल्याला बाहेर घालविणें आणि नोकरांना नतिजा पोंचविणें हें घरच्या घरधन्याचें काम होतें. तें त्यानें न केलें तर तो कुटुंबाच्या दोषास व परमेश्वराच्या शिक्षेस पात्र होतो. व राष्ट्राच्या घाताचें सर्व पातक त्याच्या माथ्यावर येतें. आतां अगदीं शेवटीं मालकम साहेबांनीं बाजीरावाजवळून ब्रह्मवर्तास स्वस्थ बसण्याचा करार करून घेतला व त्यांनीं तो करून दिला हा दोष कोणी बाजीरावावर लादूं पाहील. पण बाजीरावाच्या पदरीं हाहि दोष कोणा विचारवंताला बांधतां येणार नाहीं. कारण मालकम साहेबाचा

करार ता. ४ जून १८१८ रोजीं झाला. व याच्या पूर्वी बरेच दिवस म्हणजे दोन महिने बाजीरावास सातारकर महाराजांनीं पेशवाई पदावरून दूर करून बंड ठरविल्याचें ४ एप्रील १८१८ रोजीं जाहीर केलें होतें. तेव्हां हा करार केल्यावेळीं बाजीराव हा पेशवा नव्हता. राज्याची कोण्याहि प्रकारची मुखत्यारी सातारकर महाराजांनीं त्याच्याकडे ठेवली नव्हती; त्यावेळीं बाजीराव हा कोणी जबाबदार मनुष्य नसून खासगी इसम होता. व या नोकरीवरून दूर केलेल्या इसमानें आपल्या पोटाची तजवीज केली इतकेंच. ज्यांनीं शिवाजी महाराजांची आणि त्यांच्या वंशजांची पांच सात पिढ्या नोकरी बजावली व औरंगजेबानें नामशेष केलेल्या शिवाजीच्या वंशजांना हिंदुस्थानांतल्या अत्युच्च पदावर नेऊन बसविलें व त्याच्या-पुढें प्रत्यक्ष दिल्लीच्या बादशहांना लवावयास लाविलें त्या भटांच्या वंशजाला परकी-यांच्या चिथावणीनें श्री. प्रतापसिंह महाराजांनीं नोकरीवरून दूर करून बंड ठरविलें आणि त्याला व त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसांना दोन प्रहरच्या अन्नाच्या घांसाला मोताद करून टाकिलें; तेव्हां आपल्या अन्नाची सोय लावून घेणें त्याला भाग पडलें. व सातारकर महाराजांना कोणत्याहि तऱ्हेनें आड न येतां महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यतेच्या यत्नाला आपल्यापासून कोणत्याहि तऱ्हेनें विरोध न होईल अशा तऱ्हेनें, त्यानें साधली तशी ती सोय लाऊन घेतली.

( बाकी बाजीरावांत असावी तितकी कर्तबगारी नव्हती हें उघड आहे. त्याच्या नांवावर अनन्वित कृत्यें व असह्य जुलुम करून दौलतराव शिंद्यानें सर्व पुणें शहराला त्याचा वीट आणला होता. व सर्वांच्या मनाला उद्वेग वाटूं लागला होता. त्याचे बहुतेक हस्तक व सरदार शत्रूच्या जाळ्यांत गुंतले गेले होते. व आपमतलबानें ते त्याच्या मानेवर फिरवण्यासाठीं सुऱ्या पाजवीत होते. इंग्रजांनीं त्याचें घर पोखरून टाकलें होतें. सावकारांनीं त्याला गिळला होता. उठावें त्यानें लचके तोडावे अशी त्याची कुतर ओढ झाली होती. व आजाची अक्कल नातवांत मुळींच न आल्यानें त्याला इतक्या गोष्टींना पाठ देण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हतें. या आनंदवल्लीच्या तुऱ्याला आपल्या मातृवेलीचा दर्प असता तरीही पुरें होतें. आनंदीबाईचे शहाणपणाचा शतांशही याच्यांत नव्हता असें उघड दिसतें. पण याचे पलीकडे जाऊन आपण बाजीरावावर जेव्हां नसते आरोप करतों, व कांहीं त्याच्या आंगीं नसते दुर्गुण चिकटवूं पाहतों तेव्हां मात्र आपण सपशेल गोत्यांत पडतों. कोणी कोणी बाजीरावाला फार खादाड व मोठा खर्चिक म्हणतात. पण उपलब्ध

हिशेबावरून हें खरें दिसत नाहीं. शेळी शेळीचें खाणें खाईल पण वाघाला वाघाचाच खुराक पाहिजे. प्रत्यक्ष शनवार वाड्यांतला बेतही फारसा उधळपट्टीचा नव्हता असें होतें. पेशवे हे गणपतीभक्त असल्यामुळें शनवार वाड्यांतल्या गणपती उत्सवाचा बेत विशेष थाटाचा असणार हें उघड आहे. या उत्सवानिमित्य दर रोज ५०० पानांचा बेत सव्वीस दिवस उत्सव धरून तो मक्ता २६,५०० रुपयांस दिला होता. म्हणजे पात्रीं अवघे दोन रुपये झाले. तसेंच एरव्हीं नित्य थोरले वाड्यांतील नैवेद्य व थोरले पंगतीकडे दररोज पात्रें १२५ व नैमित्तिक प्रयोजनानिमित्त दरमहा १,००० पात्रें हा मक्ता सालिना २९,००० एकोणतीस हजार रुपयास दिला होता. याची ३७,००० पात्रें होतात. म्हणजे पात्रीं तेरा आणे झाले. दर माणसाचा भोजन खर्च शनवार वाड्यांत तेरा आणे असणें याला उधळपट्टी कोण म्हणेल ? ताजमहालसारख्या भिकार खाणावळींत दर माणसीं दररोज पंधरावीस रुपये पडतात. वर्षानुवर्षे गुलामगिरींत खिचपत पडलेल्या दरिद्री कपाळकरंट्यांनीं आपल्या भिकार राहणीशीं, हिंदुस्थानांतल्या सर्वांत खानदानीच्या व सात पिढ्यांच्या गर्भश्रीमंतांची राहणी तोलून पाहून त्या राहणीला व भोजनाला उधळपट्टी ह्मणावी हें सहाजीक आहे. मला तर वाटतें कीं, पेशव्यांच्या इतकी साधी राहणी त्यांच्या ऐश्वर्याच्या कुटुंबांत इतरत्र कोठेंही पाहावयास सांपडणार नाहीं. बाजीराव आपला खर्च कसोशीनें करी असें त्या वेळचे लेखक ह्मणतात.[1]

बाजीराव हा निर्दय, क्रूर किंवा पाषाणहृदयीं होता असें तर त्याचे शत्रूही ह्मणणार नाहींत व ह्मणत नाहींत. त्याचेवर गंगाधर शास्त्र्याचे खुनाचा आरोप इंग्रज ग्रंथकार करतात. पण हा आरोप सपशेल खोटा दिसतो. खुनाच्या साध्या खटल्यांत देखील आरोपाची शाबिती होण्याला प्रत्यक्ष पुरावा लागतो. व तसा खरा खोटा पुरावा पोलिसला सहज मिळूं शकतो. पण या भर दिवसा, ऐन चव्हाट्यावर झालेल्या खुनाबद्दल असा काडीभरही पुरावा पुढें येत नाहीं. सगळी मदार तर्कावर बांधलेली दिसते. गंगाधरशास्त्र्यांचे वंशजांची कैफियत बडोदें सरकारच्या हुजुर कचेरींत तयार होऊन छापली आहे. तीज वरून यांत बाजी-

---

१ पेशव्यांची रोजनिशी, पु. ५, पृष्ठ ४३. एलफिन्स्टन देखील बाजीरावाबद्दल आपल्या एका पत्रांत लिहितातः—

" He was frugal but not parsimonious in his expenses & at once courteous & dignified in his manners. L. of Elp., l. 289.

रावाचा संबंध दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांतील एकंदर हकीगतीवरून शास्त्रीबुवांचा घात करण्याची कलती पेशव्यांची खास नसून त्या घाताबद्दल ते फारसे जवाबदार गणले जाणार नाहींत असें निश्चित होतें.] ( पृष्ट ३३ वगैरे ) नारायणरावाच्या हत्येनें डागलेला, व नारायणरावाच्या काल्पनिक पिशाच्याच्या भीतीनें पूर्ण पछाडलेला, बाजीरावासारखा धर्मभोळा[1] मनुष्य पंढरपूरसारख्या पवित्र क्षेत्रांत खून करवील हें बिलकूल संभवनीय नाहीं. खूनच करणें तर पुण्यास हस्तक काय कमी होते? आडवाटेंतल्या जागा काय ओस होत्या? ज्याच्या डोळ्यांचे पातें जरा लवलें असतें, किंवा ज्यानें डोळा गिरकावून जरा वांकड्या नजरेनें पाहिलें असतें, तर शेंकडों तरवारी आपली म्यानें टाकून गंगाधरशास्त्र्याच्या शरीरांत घुसल्या असत्या त्याला असा हा नीच मारेकरी घालून खून करण्याची गरजच काय? आणि तोही पंढरपूर क्षेत्रांत! एका हत्येच्या परिमार्जनासाठीं जो पाण्यासारखा पैसा खर्चीत होता, दानधर्म व प्रायश्चित्तें घेत होता, व जो त्यासाठीं पंढरीस नित्य येरझारा घाली तो बाजीराव दुसरी हत्या—आणि ती ब्राह्मणाची—पंढरपूर क्षेत्रांत, नगर प्रदक्षणेच्या वाटेवर, शास्त्री देवळांतून येत असतां कोणा नीचा करवीं करील हें अशक्य आहे. आणि या कृत्याला त्रिंबकजी निंबगांव जावळीचा पाटील अनुकूल होईल हें तर अगदींच अशक्य. [त्र्यंबकजी हा पंढरीचा मोठा भक्त होता. व तुकारामाचे अभंग फार प्रेमानें मिळवून ते जमवून उतरून ठेवण्याचा त्याला मोठा नाद असे. तो श्री पंढरपूर क्षेत्रांत झालेल्या या कृत्यास मदतगार होईल असें कोणीही समंजस मनुष्य मानणार नाहीं.]

क्षणभर ही धार्मिक दृष्टी बाजूस ठेविली तरी नारायणरावाच्या मरणामुळें एकंदर मराठ मोळ्यांत आपणास केवढा डाग लागला होता, व त्यामुळें किती चांगले लोक आपल्या विरुद्ध गेले होते, आणि त्यामुळें आपल्या वडिलांना व आपल्याला काय काय सोसणें भाग पडलें हें बाजीरावास माहित होतें. हें नीट जाणत असून हा दुसऱ्या हत्येचा आरोप आपल्यावर येऊं देईल इतका

---

१ मराठी लेखांत तर याबद्दल अनेक दाखले आहेतच. पण एलफिन्स्टन साहेब देखील ह्मणतात कीं:—

"He is a slave to superstition; half his life is spent in fasts, prayers & pilgrimages. Life of Elphinstone.

तो वेडा नव्हता. या योगानें पुष्कळ मराठ्यांची मनें आपल्या विरुद्ध फिरतील व लोकांत आपली बदनामी होईल आणि राजकारणांत नसते बखेडे माजतील हे जाणण्या इतकी अक्कल बाजीरावांत खासच होती. व इतर सर्व कारणें सोडली तरी या कारणासाठीं तरी तो या फंदांत खास पडला नसता.

गंगाधरशास्त्री पटवर्धनाच्या खुनाशीं बाजीरावाचा दूरचाही संबंध नव्हता असें मानण्यास आणखीही एक पुरावा आहे.

गंगाधरशास्त्री पटवर्धन आणि प्रभाकरतात्या कवि हे दोघेही लहानपणापासूनचे सोबती होते. व यांचा स्नेहसंबंध आजन्म कायम होता. एकमेकांविषयीं दोघांचे प्रेम इतकें होतें कीं गंगाधरशास्त्राच्या मुलास—आबासाहेबास—प्रभाकर तात्याची मुलगी केली होती. तेव्हां गंगाधरशास्त्री पटवर्धनाच्या खुनांत बाजीरावाचा संबंध असता, तर या गोष्टीचा उल्लेख प्रभाकरानें आपल्या कवनांत निःसंशय केला असता. या खुनाचा उल्लेख प्रभाकराच्या कवनांतून आहे. पण त्याठिकाणीं प्रभाकर लिहितोः—

श्रीमंत बाजीरावसाहेब " फार दिवस जपत होते या इंग्रज राज्याला। अनायासें " झालें निमित्य पंढरपुरास कज्ज्याला ॥ संकट पडलें कांहीं सुचेना प्रधान " पूज्याला। सदी फिरली सारांश मिळाले लोक अपूज्याला ॥ परम कठिण " वाटलें आठवलें त्रिभुवन राव बाजीला। थोर थोर मध्यस्त घातले साहेबांचे " समजीला। निरुपाय जाणुनी केलें हवालीं मग त्रिंबकजीला ॥[1] इ. इ."
आणि हा पवाडा बाजीरावाचें राज्य गेल्यावर इंग्रजी अमलांत लिहिलेला असल्यामुळें या म्हणण्याला जास्तच जोर येतो. व साधारणपणें त्या वेळच्या लोकांना काय वाटत होतें याचाही खुलासा यावरून होतो.

गंगाधरशास्त्री पटवर्धनांची कन्या गं. भा. श्रीमती यमुनाबाई याही आपल्या बापाचे खुनाचा आरोप बाजीरावावर करीत नाहींत.

सारांश गंगाधरशास्त्री पटवर्धनाचे वंशज, त्यांची कन्या, त्यांचे लहानपणापासूनचे मित्र, त्यांचे व्याही, सोयरे, इतर आप्तसंबंधी, तसेंच तत्कालिन सरदार मंडळींत वागणारे कवि, हे या खुनाचा धागा बाजीरावाला लावीत नाहींत. बाजीरावाचा स्वभाव, त्याची धार्मिकबुद्धी व त्याची त्या नंतरची वागणूक याच्या

१ प्रभाकरकृत पवाडे.

विरुद्ध दिसतात. त्याचा मतलब व स्वार्थ या खुनामुळें साधला नसून तो यामुळें बिघडला होता. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां परकी ग्रंथकारांनीं केलेला हा आरोप खरा वाटत नाहीं. कुत्र्याला कां मारला तर तो पिसाळलेला होता अशांतलाच हा प्रकार दिसतो.

बाजीराव हा शास्त्रीबुवांची चाहा उत्तमपणें राखी, तो त्यांची आदब व मिजाज उत्कृष्ट ठेवी इतकेंच नव्हे तर इंग्रजांची पाठराखण असलेल्या व एलफिन्स्टन साहेबांच्या बंगल्यावर नेहमीं बसणाऱ्या या समर्थांच्या घरच्या राखणदाराचें मन होतां होईतों दुखवूं नये. या साठीं तो फार जपे. शास्त्रीबुवांचें व त्रिंबकजींचें तर रहस्य फारच विशेष होतें. व त्यांची मैत्रीही फार होती असें प्रत्यक्ष मालकमसाहेब म्हणतात.[1] तेव्हां आतां या ब्राह्मण वधाचें पाप त्रिंबकजीच्या व परंपरेनें बाजीरावाच्या पदरीं कसें बांधावें ! कदाचित् कोणी असें म्हणेल कीं हें सगळें खरें असूनही स्वार्थासाठीं बाजीरावानें हें नीच कृत्य करविलें असेल. पण यांत स्वार्थ किंवा स्वार्थाचा संभव बाजीरावास लवमात्र नव्हता. या खुनापासून कोणाचा लाभ झाला असल्यास तो इंग्रजांचा झाला. गायकवाड सरकारचा झाला. शास्त्रीबुवांच्या मृत्युपासून स्वार्थ किंवा परमार्थ बाजीरावाला मुळींच साधला नाहीं. उलट त्याचें नुकसान मात्र फार झालें. तेव्हां या खुनाचा दोष बाजीरावाला बिलकुल चिकटूं शकणार नाहीं. असें असतां त्रिंबकजीस—आपले पदरचे विश्वासू नोकरास—त्यानें इंग्रजांचे स्वाधीन एकदम केला नाहीं हा त्याच्यावर मुख्य आरोप ठेवण्यांत येतो. पण त्र्यंबकजी डेंगळ्यांवर चौकशी होऊन व त्याचें ह्मणणें ऐकून घेऊन गुन्ह्याची शाबिती झाल्याशिवाय आपला खास नोकर त्याच्या शत्रूंच्या स्वाधीन करावा असें ह्मणणें हा केवळ आग्रह होईल ? आणि शिवाय असें करणाऱ्या धन्याचें धनीपण तें काय राहील ? ज्यानें जगाचे खून केले तो केसर अझूनही सुटा ठेवण्यांत ज्यानां कांहीं हरकत वाटत नाहीं त्यांनीं बाजीरावाला त्र्यंबकजीस कैदखान्यांत जखडून टाकण्यासाठीं इंग्रजांच्या स्वाधीन केला नाहीं ह्मणून त्यास दोष काय ह्मणून द्यावा ? बरें मूग गिळून व आपली बाजू कमी जोरदार ह्मणून बलिष्ठासी झगडा करणें नीट नाहीं हें जाणून बाजीरावानें त्यास स्वाधीन केल्यावर तो कैदेंतून गोऱ्या सोजिरांचे हातावर तुरी देऊन निसटून गेला याबद्दल आणखी रागावून जाऊन अनर्थ करण्यास प्रवृत्त व्हावें ही कोणती नीती.

---

1 Malcolm's History of India (I) page 473.

ही राजनीती आहे. दुसरें काय ? राजकारणांत आणि राजनीतींत कांहींही चालतें. ज्यानें डाव जिंकला तो शहाणा, तो सज्जन, तो थोर, तो सकलगुण-संपन्न असें यांत ठरतें. लबाडया, खून, खोटे कागद, लाचलुचपत, चहाडी, विश्वासघात, कृतघ्नता हे सर्व या नीतींत अवगुण नसून गूणच ठरतात. अशी ही कुटिल नीती आहे.

आलफिन्स्टन ह्मणतो, गंगाधरशास्त्र्यास वकीलीवर आह्मीं नेमलें होतें. सबब त्याचे संरक्षणाची जबाबदारी आमचेवर येते. हें जरी खरें मानलें तरी या जबाबदारी करतां एलफिन्स्टन साहेबानीं काय केलें? त्याच्या तैनातीस त्यांनीं आपला एक तरी शिपाई ठेवला होता का ? बरें तो मारला गेल्यावर त्याची नुकसानी इंग्रजांनीं त्याच्या वंशजानां कितीशी दिली ? नुकसान देणगीवरून जबाबदारीची किंमत अजमावतां येईल. गंगाधरशास्त्री हा खरें पाहतां इंग्रजांचा एक पाजी हस्तक होता. वागणूकींत तो चढेलपणानें वागे. कैटिशूळांची व्यथा त्याला बरीच होती. बोलण्या चालण्याची आदब त्याला मुळींच नव्हती. सहज बोलतानां बाळाजीनातूप्रमाणेंच 'डाम रास्कल' ही शिवी त्याचे तोंडांत फार असे.[२] तो जुन्या तऱ्हेचा शास्त्री असून इंग्रजांची उसनी ऐट फार मिरवी. आणि सहज बोलतानां इंग्रजी शब्द मध्येंच घुसडी. प्रत्यक्ष पेशव्यांच्या समोर तो आपला थाट व दिमाख त्यांच्यापेक्षांही जास्त दाखवी. बडोद्यांत आपल्या वर्तनानें त्यानें अनेक शत्रू निर्माण केले होते. व पुण्यांतही त्याचा उर्मटपणा कमी झाला नव्हता. व तो आपला धनी व आपला देश चतकोरभर भाकरीसाठीं सहज विकणाऱ्या अमानुष लोकांपैकीं एक होता.

या एकंदर राजकारणांत बाजीरावापेक्षां सातारकर महाराज हे मुख्य होत. एक बाजीराव किंवा कोणी एखादा पेशवा गेला तर सातारकर महाराज दुसरा एखादा पेशवा सहज उभा करूं शकते. एक पेशवा काढून दुसरा निर्माण करणें त्यांच्या हातचें होतें. पण सातारकर महाराज नाहींसे झाल्यावर दुसरे

---

१ आत्मचरित्र.

२ एलफिन्स्टन आपल्या एका स्नेहाला लिहिलेल्या पत्रांत त्रिंबकजीबद्दल ह्मणतो:—

"He appears to be quite an Englishman; walks fast, talks fast, interrupts & contradicts and calls the Peshwa & his ministers "old fools" & "Damned rascals" or rather "Dam Rascal." Life of Elphinstone. Vol. I, p. 275.

सातारकर महाराज निर्माण करून सिंहासनावर बसवणें बाजीरावाला सोपें नव्हतें. शिवाय बाजीराव हा मुनीम असून सातारकर हे महाराष्ट्राचे धनी होते. तेव्हां सातारकर महाराजांसंबंधें विचार साहजीकपणेंच मनांत जास्त घोळतात. बाजीरावाची व इंग्रजांची शेवटली लढाई सुरू होण्यापूर्वीच सातारकर प्रतापसिंह महाराजांचें व एलफिन्स्टनचें सुताडें गोताडें जमलें होतें. रोहिड खोऱ्यांतले देशपांडे प्रसिद्ध रंगो बापुजी गुप्ते यांनीं ही सर्व हकीगत साद्यंत लिहून ठेवली आहे. ती वरून असें दिसतें कीं, प्रथम आंगरे यांजकडे एलफिन्स्टन साहेब गेले असतां तेथें रंगोबानें त्यांची भेट घेतली. व नंतर गोसाव्याचा वेष घेऊन त्यानें महाराजांचीं पत्रें एलफिन्स्टन यांस पोंचवलीं. हें काम करण्यांत रोहिडखोऱ्यांतले देशकुळकर्ण्याचें वतन आपणास मिळावें, व इतर प्रकारेंही आपला लाग लागावा हा हेतू होता. व हें वचन त्यानें प्रतापसिंहापासून घेतलें होतें. हळूहळू हें कारस्थान रंगो बापूजीनें बरेंच रंगास आणलें. यांत नरसू काकडा, खंडेराव शिर्के, तात्या नारोळकर, दाजीबा उपाध्ये, महाजनी वगैरे मंडळी रंगोबाला साथीदार होती. बाळाजीपंत नातूस बाहेर घालवून हीं खलबतें एलफिन्स्टन व रंगो बापूजी करीत. पहिल्याच भेटीस साहेबांनीं रंगोबास पांच मोहरा बक्षिस दिल्या. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्य विक्रीचा हा बयाणा खिशांत पडल्यावर हा सवदा नीट पटवला असतां व सर्व दौलत एलफिन्स्टनच्या घरांत घातली असतां आपणांस चांगली बिदागी मिळेल व रोहिडखोऱ्याचें वतनही साहेब धनी होऊन आपणास देतील या आशेनें रंगोबानें फार मेहनत घेतली. व अटोकाट श्रम केले. व अखेर हा सवदा नीट पटला. राज्य साहेबांचे पदरांत गेलें पण वतन मात्र रंगोबाचे हातीं आलें नाहीं. इतकेंच नव्हे तर नंतर अनेक बरे वाईट संस्कार घडून पुढें तो अगदीं भणंग झाला.[१]

या कारस्थानांत व एलफिन्स्टनकडे चोरून जाऊन खलबतें करणारांत रंगोबाशिवाय इतर अनेक सत्पुरुष होते. त्यांच्या लिहिण्यावरूनही रंगोबानें लिहिलेली हकीकतच खरी ठरते. व तीसच दुजोरा मिळतो. सातारचे महाराज प्रतापसिंह यांनीं इंग्रजांशीं लावलेलें बोलणें त्यांस बंदोबस्तानें ठेवल्या वेळेपासूनचे किंवा

---

१ रंगो बापूजीनें छत्रपती महाराजांस लिहिलेलें पत्र. म. इ. साधनें खंड १५, पृ. ३३५.

अडचणींत सापडल्या वेळचें नसून फार अगोदर पासूनचें होतें. हें मागें सांगितलेंच आहे. निंबाजी व सुभाजी भोंसले यांचे यादींत ( हकीगतींत ) लिहिलें आहे कीं, आम्हीं साष्टी येथील कारकून रामचंद्र परभू याची भेट घेतली व राजकारण केलें. भोसले मजकूर म्हणतात ' पूर्वीं विठू कोंबडा याचे हातून तुम्हांकडे ( इंग्रजांकडे ) राजकारण केलें होतें, तें पंत प्रतिनिधि याणीं तुम्हांकडील वकील पुणें मुक्कामीं होते त्यास कळवावें, तें न कळवितां बाजीराव यांस कळविलें यास्तव तेथें तसदी फार जाली आहे. ' ( आतां ) आम्हांस खालीं लावून देते समयीं महाराज राजश्री छत्रपती यांची आज्ञा जाहली कीं इंग्रज याचे दोस्तीचा मजकूर बोलोन बाकी मार रुबरु महाराजांची व तुमची गांठ पडेल ते वेळीं उलगडून घ्यावा. हाली पळटणें पाठवून किल्ला घ्यावा आणि खुलासा करावा. ' यानंतर भोसले मजकूर हे ममईस जाऊन मुंबईतील मुख्य ' जनराल गुढाण साहेब ' यास भेटले. व त्याच्याशीं बोलणें करून राजकारण सुरू केलें. ' यास नऊ महिने झाले. तो श्रावण गेला. तेव्हां शेवटीं गुढाण साहेबांनीं आलिकडे बोलावून मंडळी बाहेर काढून बोलले कीं तुमचें काम एक दोन वर्षांनीं होईल. आमचे साहेब या प्रयत्नांत आहेत. तुह्मीं ही गोष्ट फुटूं नये. तूर्त निघोन जावें. नंतर ( आह्मीं ) निघोन आलों.

या नंतर सातारकर महाराजांचे इंग्रजांकडील यत्न अनेक तऱ्हांनीं बरेच दिवस चालू होते, व दिवसेंदिवस स्वराज्याचा वृक्ष तोडून टाकण्याचें इंग्रजांचे यत्नहि किती जोराचे व निकडीचे चालू आहेत हेंहि बाजीरावाच्या लक्षांत चांगलें आलें. दोघांचाही बिघाड जास्त होऊं लागला होता, व इंग्रजांचें आणि बाजीरावाचें बिनसेल किंवा बिनसलें असें लोकांच्या लक्षांत येऊं लागलें होतें. बाजीराव जों जों मऊ घेई तों तों इंग्रज त्याला जास्त दडपीत व तो जों जों पडतें घेई तों तों इंग्रज त्याला समूळ पाडून टाकण्याचा यत्न करीत. अशा एकेवेळीं इंग्रजांचा व बाजीरावाचा बिघाड झाला आहे असें समजून पुन्हां राजकारण करण्यासाठीं बळ-वंतराव चिटणीस यांनीं बेटांत एलफिन्स्टन साहेब बहादुर यांजकडे पुन्हां बोलणें

सुरू केलें, व बळवंतराव चिटणीस म्हणतात, कीं, इंग्रज यास सूचवून बंदोबस्त होई तें करावें म्हणून बाळाजीपंत नातू यास मजकूर कळविला. त्यांनीं उत्तर केलें कीं एलफिन्स्टन साहेब यांस कळवून तुम्हांस उत्तर कळवितों. नंतर उत्तर सांगितलें कीं बाजीराव याचा व आमचा बिघाड झाला होता, त्यास अडचणीचीं कलमें आह्मीं बहुत टाकिलीं. त्यास तितक्या कलमांस बाजीराव यांनीं रुकार देऊन तह केला. त्यास पुन्हां तह[1] बिघडे तों पर्यंत कार्यास अवकाश पडला. या नंतर दोन महिने मध्यें गेले. तेव्हां बाजीरावाची स्वारी माहुलीस गेली तेथें श्रीमंत महाराज यांची व बाजीरावाची भेट झाली. "[2]

यावेळीं इंग्रजावर स्वारी करण्याची अवश्यकता बाजीरावास निकट जाणवली होती, व या आपल्या स्वारीस श्री. महाराज प्रतापसिंह ह्यांची मंजुरी घेण्यासाठीं बाजीरावांनीं माहुली मुक्कामीं भेट घेतली आणि त्यांस सांगितलें कीं इंग्रज याचा व आमचा बिघाड झाला आहे. ह्या प्रकरणीं मसलत बहुत बोलले व मसलतीचा सारांश ठरला. हें बोलणें बोलून बाजीरावाची पाठ फिरली न फिरली तोंच सातारकर महाराजांनीं बळवंतराव चिटणवीस यांस आज्ञा केली कीं हा मजकूर अलपिन्स्टन बहादुर यांस कळवावा[3] आणि त्याप्रमाणें आपल्या पेशव्यानें केलेल्या मसलतींची वित्तम बातमी महाराष्ट्राच्या या मालकानें महाराष्ट्राच्या शत्रूंस तावडतोब कळविली. पुढें नरसु काकडा यांस पुनः लढाई चालू असतां अलपिन्स्टन साहेबांकडे पाठविलें. नरसू काकड्यानें संकेत ठरवून संकेताचे वर्तमान येऊन सांगितलें कीं " फिरंग, " किंवा " सातारकर महाराज " हीं दोन नांवें घ्यावीं. म्हणजे खुणेची ओळख पटेल त्यावरून " सातारकर महाराज " असें नांव घेतलें व ऐन लढाईंत सातारकर महाराज इंग्रजांच्या स्वाधीन झाले. तेव्हां ज्या धन्यानें

---

१ हा तह ता. १३ माहे जून १८१७ रोजीं झालेला तह होय.

२ भारत इतिहास मंडळ पुस्तक १७, पृष्ठ २३.

३ भारत इतिहास मंडळ पु. १७, पा. २०.

भोरः

असें वर्तन केलें त्या धन्याला बाजीरावानें आपले बरोबर घेतलें व बच थोडें फार आपले नजरेखालीं वागविलें ह्यांत त्यांनीं गैर केलें असें कोणीही ज्ञाता म्हणणार नाहीं. आणि सातारकर महाराजांस बाजीरावानें नजर कैदेंत वागविलें ही त्यानीं चूक केली व हा त्याच्या हातून मोठा गुन्हा घडला असें आतां यापुढें कोणा-लाही म्हणतां येणार नाहीं. वास्तवीक पहातां बाजीरावानें महाराजांना आपले नजरेंत ठेवलें किंवा बरोबर घेतलें याला कैद असें म्हणणें केव्हांही रास्त होणार नाहीं. महाराष्ट्र स्वातंत्र्याच्या व आपल्या अस्तित्वाचा कायमचा निकाल लावणारा लढा लढत असतां, महाराष्ट्राचा मालक प्रतापसिंह महाराज शत्रूपक्षाशीं खलबतें करतों हें लक्षांत आल्यावर तो केव्हांही शत्रूच्या हातांत जाईल असा सुटा ठेवणें राजनीतीला अक्षम्य आहे. त्याला आपले स्वाधीन ठेवण्यांत बाजीरावानें फारच उत्तम पेच टाकला. व शत्रूला पूर्णपणें घोटाळ्यांत टाकलें. बाजीरावाच्या या हुशारीची जाणीव एलफिस्टनला पूर्णपणें झाली. बाजीरावानें प्रतापसिंहाला आपल्या नजरेंत ठेवलें तें कैद ह्मणून नव्हे. तर त्याच्या करणीनें राज्याला अडथळा येऊं नये ह्मणून ठेवलें. बरोबर असतांना तो महाराजांची मिजास चांगली ठेवी. व त्यांना होतां होईल तितकें करून फार जपे. त्यानां कैदी असें त्यानें केव्हांही म्हटलेलें दिसत नाहीं. उलट ग्रांट डफ वगैरे ग्रंथकार महाराजांना ते होऊन स्वाधीन झाल्या बरोबर, आपले लढाईत पाडाव झालेले कैदी ( Prisoner of War) असें ह्मणूं लागले.

हें सर्व कारस्थान करून रंगोबा गुप्ते यानां व त्याच्या इतर मदतगार कार्य कर्त्यांना किंवा सातारकर महाराजांना काय प्राप्त झालें याचा क्षणभर विचार केला असतां कोणाचेंही अंतःकरण पिळून जाईल. इतर मदतगार लोकांना नुसत्या हेलपाट्या पलिकडे कांहीं प्राप्ती झालेली दिसत नाहीं. बिचाऱ्या रंगोबाचे हात तर कोरडे ठणठणीतच राहिले. व त्याची निराशा पहिल्याच सपाट्याला झाली. पण सातार-कर महाराजांना मात्र आपण साधलें व मोठा दिग्विजय केला असा भास काहीं काळ झाला. साताऱ्च्या प्रतापसिंह महाराजांचे बाहुलें साताऱ्यास नेऊन राज्यावर

बसविण्यांत, शिवाजीची गादी कायम ठेवावी, किंवा प्रतापसिंह व त्याचा वंश राज्यावर नांदवावा, असला कोणताही विचार नसून पेशव्यांची सत्ता संपुष्टांत आणावी, महाराष्ट्राचें स्वातंत्र्य लौकर लयास न्यावें व मराठ्यांची दिशाभूल करावी हाच हेतू इंग्रजांचा होता. पण सातारकर महाराजानां इंग्रज केवळ निरपेक्ष बुद्धीनें संकटकाळीं आपणास धावून येऊन मदत करीत आहेत, व शिवाजीचे आपण वंशज म्हणून आपली कळ त्यानां वाटून ते आपणास सिंहासनावर शुद्ध मनानें थोर बुद्धीनें बसवीत आहेत असें या वेळीं वाटलें.

लॉर्ड हेस्टींग्स ता. १४ आगष्ट १८२० मध्यें या संबंधें 'सीक्रेट कमिटीला' लिहिलेल्या खलित्यांत ह्मणतात:——

"I also authorised at that period the eventual assignment of a provision in lands for the Raja of Satara as a Jahageer or the establishment of a compact sovereignty. The choice between the two was confided to Mr. Elphinstone's discretion, my object being simply to secure the conciliation of the Maratha tribes to the new order of things and to effect a counterpoise to the remaining influence of the former Brahaminical Government."

लॉर्ड हेस्टींग्स साहेबांना धाडलेला खलिता एलफिन्स्टन साहेबानीं मि. ग्रांट डफ साहेबांकडे पाठवतानां त्यांस आणखी मुद्दाम कळविलें कीं:——

It will be proper to (impress) on them (the inhabitants) as as well as on the Raja, that it is not intended to revive even in name, the empire of Sevajee, but to create for the Raja a new state, the limits of which shall be fixed by H. E. the Governor General.

वर लिहिलेल्या लार्ड हेस्टिंग्सच्या खलित्याला लार्ड एलफिस्टन साहेबांनीं ता. १८ जून १८१८ मध्यें लिहिलेल्या जबाबांत ते (एलफिस्टन) लिहितात:—

Your excellency's instruction left me the choice of giving him a Jahageer or a small sovereignty. I was inclined to adopt the latter plan for various reasons. At the time when I had to decide, the Marathas showed no disposition whatever to quit the Peishwa's standard, and it appeared not improbable that the dread of the complete extinction of their national independence and still more, that of the entire loss of their means of subsistence, from the want of a Government likely to employ them, would induce them to adhere to Bajeerav, with an obstinacy that could never have been produced by affection for his person or interest of his cause.

( सातारा पेपर्स, पृ. २, पृ. ५२. )

असे आणखी वाटतील तितके उतारे देतां येतील; पण हे तीनच तूर्त पुरेत. या तीन उताऱ्यांवरून सातारकर महाराजांना वाटला तो हेतु इंग्रजांचा खास नव्हता हें उघड आहे. त्यांना गादीवर बसवणें व त्यांच्या हातून जाहीरनामें काढविणें हेंच महाराष्ट्राचें राज्य साधण्याचें उत्तम साधन आहे, असें इंग्रजांनीं ठरविलें. महाराष्ट्राच्या सिंहासनावर चढण्याची 'सातारचे महाराज' ही एक सोईची पायरी आहे असें जाणून त्यांनीं ती पायरी सोयीसाठीं उभी केली. व आपलें कार्य उरकून महाराष्ट्राचे सिंहासनावर चढल्यानंतर त्यांनीं त्या पायरीची वाटेल ती वाट लावली. सुमोंरं पंचवीस तीस पावसाळे लोटले नाहींत तोंच त्यांनीं ती पायरी उचलून दूर भिरकावून दिली. सातारकर श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह महाराज यांस काशीस नेऊन टाकलें. आणि याप्रमाणें करून त्यांस व त्यांच्या पेशव्यांस गंगास्नान करून स्वस्थ बसणें भाग पाडलें. व शेवटीं या दोघांचें देहावसान गंगाकाठींच झालें. श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह महाराज व त्यांचे पेशवे असे दोघेही जे एकदां महाराष्ट्राबाहेर गेले ते कायमचेच गेले. त्यांचे पाय पुन्हा महाराष्ट्रास लागले नाहींत. मराठ्यांनीं मोठ्या अभिमानानें स्थापलेल्या सातारच्या गादीची यापुढें झालेली

विटंबना व त्या गादीच्या खावंदांची दैना, महाराष्ट्राच्यानें खास ऐकवणार नाहीं अशी ती हृदयविदारी आहे. कडू बदामाच्या व आक्रोडाच्या झाडांना पन्नास साठ वर्षांनीं फळें येतात असें म्हणतात. परंतु प्रतापसिंह महाराजांनीं रुजवलेल्या या कारस्थान वृक्षाला तीस पस्तीस वर्षांतच फळें आलीं व तीं त्यांस, त्यांचे वंशजांस, व त्यांचे सेवक जे आम्हीं महाराष्ट्रीय लोक, त्या आम्हां सर्वांस चाखित बसणें भाग पडलें, हें महशूरच आहे.

असो. या लेखाकांच्या वाचनानें जे विचार सहज मनांत आले ते मी स्पष्टपणें वर मांडले आहेत. हे लिहितांना एकवार असेंही मनांत आलें कीं हे विचार कदाचित् कोणास पटणार नाहींत. व यदा कदाचित् ते पटले तरीही कालस्थितीचा विचार करतां तें लिहिणें कोणास आवडणार नाहीं. परंतु जुने ऐतिहासिक लेख मिळवून ते प्रसिद्ध करावे, त्यांच्या अस्सलपणा-बद्दल खात्री करून घेऊन तो शाबीत करावा, व त्यांच्या अभ्यासानें जे सिद्धांत निघतील ते महाराष्ट्रापुढें निर्भिडपणें मांडावेत हेंच इतिहास संशोधकाचें खरें कर्तव्य आहे व यांतच राष्ट्राचें कल्याण आहे असें जाणून हे विचार लिहून काढले. व आज गेलीं शंभर वर्षें ज्या बाजीराव पेशव्यावर आपण शिव्यांची लाखोली वाहत सुटलों त्याचें शेवटचें वर्तन आतां नवीन पुराव्याच्या दृष्टीनें कसें दिसतें, हेंही न्यायी महाराष्ट्र उत्सुकतेनें ऐकेल असें वाटून हे विचार या प्रस्तावनेंत छापून प्रसिद्ध केले. आणखी नवीन अस्सल पुरावा उपलब्ध होऊन हे यांत दाखल केलेले विचार चुकीचे ठरल्यास मी तेंही आनंदानें प्रसिद्ध करीन. तूर्त इतकेंच म्हणावयाचें आहे कीं ज्या व्यक्तीवर केवळ सुखविलासाकरतां आळशी बनून महाराष्ट्र इंग्रजांचे स्वाधीन केला असा आरोप ठेवितों तो आरोप कितपत खरा आहे ? त्या व्यक्तीशिवाय इतर कोणी या कृत्यास भागीदार होता किंवा काय ? असल्यास दोषाची वाटणी कशी होऊं शकेल ? कीं हा दोष सर्वस्वीं आपण समजत होतों त्याहून निराळ्याच व्यक्तीकडे जाऊन पडेल ? असे कांहीं मुद्दे पुढें यावे इतकाच हेतू आहे. बाजीराव माहुलीस प्रतापसिंहांची लढाईचे

बाबींत संमती घेण्यास गेला होता त्याचवेळीं त्यांनीं रुकार दिला नसता व तसें ते जाहीर करते तर ती गोष्ट निराळी होती. पण इकडे संमती देऊन मग प्रत्यक्ष शत्रूशीं खलबतें करावीं, त्यास बातम्या पोंचवाव्या व गफलतिनें जाऊन शत्रूचे स्वाधीन व्हावें हें कोणा साधारण मनुष्यासही कमीपणा आणणारें आहे. मग राज्याच्या मालकाची गोष्ट काय ? त्यास तर हें वर्तन अगदींच तिरस्कारणीय होय.

असो. आता या रुमालांसंबंधीं एक दोन गोष्टी नमुद करण्याची मुभा घेतों. पहिल्या रुमालांत बरेच हस्तदोष व चुका राहिल्या आहेत त्या तशा असणें योग्य नाहीं असें अनेक गृहस्थांनीं कळविलें आहे. यांत कांहीं चुका आमच्या आहेत. पण बरेच दोष व मोडी वाचनाच्या आणि इतर चुका मूळ प्रतींत त्याच आहेत. मला दिलेली प्रत रा. कै. पांडोबा पटवर्धनांनीं नकल केलेली होती. व त्या प्रमाणेंच नकल करून ती छापील प्रत आम्हीं छापली. पांडोबांनीं केलेली नकल अजून कोणासही पाहावयास मिळेल. हा ह्मणजे पहिला रुमाल फार महत्वाचा आहे. या बखरीच्या आधारेंच कृष्णाजी अनंत सभासदानें आपली बखर रचली, किंवा याहून खरें ह्मणजे यांतील मजकुराची थोडी छाटाछाट व बदल करून पंत मजकुरानीं आपली सभासदी बखर बनवली असें मला वाटतें.[1] या पहिल्या रुमालांतील ' भोंसल्याचे बखरींतील ' अनेक शक इतर तऱ्हेनें उपलब्ध असलेल्या अस्सल माहितीशीं तंतोतंत जमतात, व यांत दिलेली बारीक सारीक माहीती चौकशी अंती पूर्णपणें खरी ठरते हें पाहून या बखरीच्या आणखी प्रती व साधल्यास अस्सल प्रत—हातीं यावी अशी तळमळ मनास सहजासहजीं लागते. तो योगायोग कधीं येईल तो खरा.

या पुढील रुमालांतही पहिल्या रुमालाच्या प्रकाशनाचे सर्व नियम पाळण्याचें ठरविलें आहे. पण केव्हां केव्हां टीपा किंवा प्रस्तावना लिहीण्याचे योजलें आहे. ही योजना गैरसोयीची वाटल्यास ती सोडून देण्यासही हरकत नाहीं. पण हे सर्व मनचे बेत आहेत. पहिल्या रुमालानंतर हा दुसरा रुमाल पांच वर्षांनीं प्रसिद्ध झाला. या पुढला तिसरा रुमाल कधीं निघतो. किंवा मुळींच निघणार कीं नाहीं हें एक परमेश्वरच जाणतो.

---

१ मजजवळ असलेल्या एका जुन्या सभासदी बखरींत शाहूच्या राज्याभिषेकपर्यंतचा मजकूर आला आहे. व ती मी श्रीमंत शाहू महाराज छत्रपतींच्या आज्ञेवरून लिहीली असें त्यांत ह्मटलें आहे.

# 'मराठी दप्तर रुमाल २.'

# सरदार गोखले यांची कैफियत.

## लेखांक १.

धोंडोपंत गोखले श्रीमंत पेशवे यांचे पागेचे वर्तमान काय कोणत्या प्रांताचे त्याचा रोजगार पेशवे याजकडे कसा लागला नंतर कामकाज खस्त मेहनत करून दौलत व सरंजामास मुलूक कसा मिळविले व त्याच्यामागे पुत्रानी दौलत कसी राखिली अखेरीस कसे जाहाले सर्व सविस्तर लिहिण्याविसी आज्ञा त्याजवरून धोंडोपंत गोखले हे पूर्वी विजयादुर्ग तालुकेत मौजे पिरदावण याची वाडी मजरे तलेखाजण येथें घर वतन याची वंशावळ.

### बाळाजीपंत याचे चिरंजीव.

१ गणेशपंत.

गणेश बलाल याचे पुत्र.

१ आपासाहेब.

१ बापुसाहेब.

---

आपासाहेब यासी पुत्र नाही.

आपासाहेब धोंडोजी वाग याचे लढाईत ठार जाहाले त्याची बायको अस्थिबरोबर सहगमन गेली.

१ बापुसाहेब याचे पुत्र.

१ गोविंदरावबाबा इग्रजाचे लढाई आजोरोन देवाधीन जाहाले.

१ विठलराव लाहानपणीच मेला.

---

२

१ धोंडोपंत याचे पोटी.

१ पुत्र ०

१ कन्या सौ. ताईबाई नरगुंदकर संवस्थानिक आपासाहेब यास दिल्हे लग्न इडकल ता. रामदुर्ग.

---

२

येणेप्रमाणे असतां गणेशपंत बलाल याणी विजयदुर्गांत दफ्तरदार असामीवर सरकार कामकाज करून योगक्षेम चालवित होते. धोंडोपत प्रबुद्ध होऊन रोजगारास कोकणप्रांत विजयदुर्गचे मामलदार भानु याजकडे जात येत होते त्या समयी रामोसी बेरड लोक बावडे प्रात करवीर वगैरे याचा उपद्रव विजयदुर्गप्रांती बहुत साहाला तो सुभेदारानी सिबंदी ठेऊन बदोबस्त केला परतु बेरडाचे पारपत्य होईना श्रीमंतापर्यंत बोभाट जाऊन भानु सुभेदार यासी इतराजी पत्रे चोराच्या बदोबस्त बिसी आली तेव्हा चिंताक्रांत होऊन उमेदवार लोक व कारकून वगैरे यासी बोलावून आणून ज्याणी चोराचे पारपत्य करील त्यास सरकारातून असाम्या दरखाच्या अगर हशमाकडे काईम करून देऊ आणि मेहनत पाहून बक्षी. सही देऊ याप्रमाणे सागितले त्याजवरून धोंडोपंत गोखले याणी चोराच्या पारपत्याची चाकरी पतकरून आपले कलिजेचे सिपाई सरकारी रुजु करून चालिले ते तूप बंदूख तरवार बाळगून कजाखी करून रामोसी बेरडाचा अडा कुठ होतो त्यावर छापा पडून तोडातोडी जाहाली त्यावेळीं बहुत स्वस्त करून शेपन्नास चोर धरून आणून सरकारात दिल्हे त्याचेही पारपत्य जाहाले नंतर धोंडोपतास हशमाकडे सरदारी असामी करून दिल्ही त्यासमई नाना फडणीस याणी श्रीमंत माधवराव सवाई याजपाशी कारभार चालवीत होते तेथेपर्यंत महसूर जाहाले धोंडोपंत मर्द यासी हुजूर राहणेस आज्ञा जाहली दरमहा चौतीस करार करून ठेविला त्यास काही दिवस पुणे मुक्कामी राहिले इतक्यात कर्नाटक प्रांती हैदरखान याजवर नाना फडणीसाची स्वारी किले बदामीस सन सबासमानीन शके १७०८ पराभव नाम संवत्सरात आली किल्यास मोर्चेबदी करून लढाई चालली. कर्नाटकातून हैदरखान याजकडील सरदार फौज व तोफा पलटणा सुध्धा आली त्यासमयी धोंडोपंत गोखले यासी स्वारी ठेवावे यासी आज्ञा होताच या प्राताचे कसेही मिळतील शत्रूकडील स्वार आणि सरदार मडली आणि तो याजविसी सरकारचे अभय असावे ऐसी विनती करून आज्ञा घेऊन कारस्थान करून हैदरखानाकडील फौजेतून सरदार आणिले तपसील.

१ कासीराव कोकरे.

१ हीरापा शेडगे नरगुद.

१ जानजी मोटे.

१ रामराव देशमुख मुळगुद.

१ घोरपडे.

येणेप्रमाणे पाचसे जमेतकरून आणिले ते सरकारातून रुजु करून हजरी घेऊन धोंडोपत गोखले यासी सरदारी दिल्ही नंतर बदामी किल्यावर बहुत खस्त मेह-नत केली नाना फडणीस याची मर्जी प्रसन्न जाहाली किल्ला घेऊन स्वारी पुण्यास आली उपरातीक काही दिवसानंतर श्रीरंगपटणावर इग्रज बहादुर याणी चाल धरून निजामन मुलूक भागा नगरवाले व श्रीमत यासी कुमकेस बोलाविले तेव्हा हरीपंत फडके हुजूरत फौज सुधा व परशरामपंतभाऊ पटवर्धन फौज वीस हजार सुधा पटणाच्या स्वारीस रवाना केले तेव्हा परशरामपंतभाऊ याजबरोबर धोंडोपत गोखले याचे पतक दिल्हे परशरामपंतभाऊ पुण्याहून दरकुच धारवाड किल्यास शाहा देऊन मोर्चेबंदी करून लढाई चालिली किल्ला टाकून गेले तेथे टिपूसुल्-तान याचा सरंजाम व फौज होती नित्य कुसुगल किल्याच्या रोखे छेबिन्यास रात्री हजार स्वार व पायदळ ठेविले होते एक दिवसी धोंडोपत गोखले याचे पतकास छेबिना सागितला तयार होऊन पथका सुधा गोखले कुदगोळ किल्याचे रोखे हेबली गावाजवल उभे राहिले नतर पाहाटेच्या प्रहर रात्री टिपू सुलतान याज-कडील फौजेचा छापा येऊन याचे पथकावर पडिला बाण व तोफा व पलटणच्या लोकाची फैर होऊन स्वारानी घोडी घातली तेव्हा गोखले याणी पथकासुधा जागा धरून तोफा वगैरेची मारागिरी धरलेली सोसून स्वाराबरोबर लढाई बहुतच केली मग याची त्याची सरमिसल होऊन जाहालीम तरवार चालिल्या सुलतानाकडील सरदार मातबर दाहावीस जाया जखमी होऊन फौजेचे तोंड करवटले नतर किल्या-पावेतो फौज पळाली इतक्यात उजेडले गोखलकडील पतक्यात शेहेपनास माणुस जखमी व ठार जाहाले ते मुकामास लस्करास आले ते परशरामपंतभाऊ यासी वर्तमान कळतांच येऊन बहुत सिफारसी करून जखमी लोकाची बरदास्त करून श्रीमंताकडे तारीफ वर्तमान लिहून पाठविले ते पत्र प्रविष्ट जाहाल्यावर श्रीमंत बहुत संतोष पावले पागेची वस्त्रे देऊन गोखले यासी पाठविल ते भाऊ पटवर्धन याणी सुभदिनी गोखले यासी पागा देऊन वस्त्रे दिल्ही व सरदार लोकांस बक्षी-साही देविल्या श्रीरंगपटणपावेतो भाऊ बरोबर राहून जिकडे काम सागतील तिकडे सरकार चाकरी शर्त, मर्दुमीने फते होऊन येऊ लागले हे वर्तमान ऐकून श्रीमत बहुत सतोष पावून कृपा करू लागले श्रीरंगपटणास इग्रज बाहादूर याणी निकडीने परशरामपंतभाऊ यासी बोलावून पाठविले तेव्हा फौज सुधा दरकुच गेले बरोबर रस्त अनाज वगैरे पोहोचविताच इग्रज बहादुर बहुत खुसी जाहाले नतर

मसलत आटपून पुण्यास परशरामपंतभाऊ आले त्यानतर सन शके त्यावर्षी कितुर तालुक्याचा सुभा माहादाजी खडेराव वोक याणी हुजुर करून माहाली आले अमल काटकाई माजवून ठाणी घेतली संगोलीस बळवतराव वोक हरीपंत फालके वगैरे होते तेथे हजार पायदल व दोनशेहे स्वार येऊन ठाण्यास वेढिले तेव्हा लढाई होऊन बहुत जेर केले तेव्हा माहादाजीपताचे बंधु रामचंद्रपंत वोक होते त्याणी विसाजीपंतनाना देशपाडे पाछापूरकर यासी जमाव देऊन कुमकी पाठविले त्यासमयी ठाण्यावर चालून आले तेव्हा देसाईच्या फौजेची याची तुबल लढाई होऊन मोर्चे करून ठाण्यात गेले तेथे दारुगोली वगैर सरजाम नव्हता तो दोन रोज निरहार करून लढाई केली नतर सला करून उतरले त्यास देसाई याणी गदीगवाडात बंदीत ठेविले फौज घेऊन हुबली वेढिली तेथे मोड खाऊन कितुरास आले तेथील सुभा बागेवाडीस कुरुदवाडकर रघुनाथराव दादा पटवर्धन याच्या ठाण्याच्या अश्रस राहून फौजबदी करून सखोपतबापु देशपाडे पाछापूरकर यासी सरदारी देऊन हुबलीस जाऊन ठाणे बळकाविले हे वर्तमान हुजूर श्रीमताकडे लिहून पाठविल्यावर श्रीमतानी देसाई याच्या पारपत्यस्तव धोंडोपत गोखले यासी मोहिमी वस्त्रे देऊन बरोबर तोफखाना व ढमढेरे आनदराव बेदरे वगैरे याची पागा देऊन रवाना केले ते मजल दरमजल कूच करून हुबलीस आले त्यापुर्वी पाच हजार काटक हजार स्वार तोफा घेऊन येऊन देसाई याणी बहुत लढाई घेतली नतर आसून (?) सखोपंत व नाना उभयेतानी खस्त करून देसाईचा मोड केला परतु मैदानात लढाई घ्यावयासी फौजेचा बल विशेष नाही असे असता दोन लढाईत देसाईच्या फौजे कच्च करल्यामुळें जोर न पोहचता आणि श्रीमतापर्यंत बोभाट जाहाला हुजुरून फौज येऊन पारपत्य होईल सुभेदारासी तह करून आपला बदोबस्त करून घेऊन सुभेदाराकडील मंडली सापडली आहे त्यास सोडून द्यावे ऐसा विचार करून श्रीमत रावत्रीमल देशपाडे बागेवाडीकर याणी सुभेदार याची पुस्त पन्हाः राखून हुबलीस सरजाम पोहचवून फारच सरकार उपयोगी पडिल्यामुळे सुभेदार आणि देशपाडे याच्या मध्यस्थीने बोलण ठरवून बलवतराव वोक व हरीपंत फालके वगैरे यासी सोडिले नतर काही माहाल सुटले इतक्यात धोंडोपंत गोखले फौज सुधा हुबलीस दाखल जाहाले तेथून कुच करून होगलास राहून फौज स्वार पाचसे पायदळ एक हजार येणेप्रमाणे सडे होऊन नदी मलापहारी उतरून

कगोनूर मैदानात गेले तो कितुरकरानी हजार दीड हजार स्वार व पायदल चार हजार घेऊन पुढ आले तेव्हा मुकाबिला होऊन लढाई सुरु जाहाली प्रहरपर्यंत गोळागोली होताहोता इकडे गोखले याणी आपल्या फौजेची हुशारी पाहून एकीकडे पायदळ एकीकडे स्वार दोन टेळया करून कितुरकरवर नीट चालून गेले तेव्हा मातबर लढाई जाहाली खुद धोंडोपतानी कितुरकरावरी घोडीं घालून दोन अडीचशे हे स्वार मारीले जाया जखमी बहुत जाहाले त्याजवर कितुरकराचा मोड जाहाला तेव्हा नदीत पाडोन हजार लोक बुडोन मेले लुटून फस्त केल्यावर तालुक्याचा बदोबस्त करून माहादाजी खडेराव याच्या हवाला करून पापा पंडित व चितो पडीत नि॥ निजामलीखान- भागानगरकर याजकडील सरदार कनकगिरी तालुक्यात पाच हजार फौजेनिंसी राहून सरकार तालुकेत स्वारी करीत होते त्याच्या पारपंत्यास सरकारातून आज्ञा जाहाली त्याजकडून दरमजल लढाई मातबर करून धारवाड़ास बंदीस ठेऊन मोगलाई तालुकेची खडणी घेऊन त्याचे सरदेस राहिले नतर त्याच वर्षी गुडगुटीकर नाईक संवस्थानिक याचे व सुरापूर नाईक याचा खटला वाढून लढाई जाहाली सुरापूरकारानी गुडगुटीस सवस्थान घेतल्यावरून धोंडोपंत गोखले यासी कुमकेस घेऊन गुडगुटी संस्थान घेऊन होते तिकडून पाचहजार फौज व पायदल व तोफा घेऊन आल्यावर गोखले याजबरोबर पाचसे स्वार व हजार पायदल तोफा दोन येणेप्रमाणे सरंजाम तयार करून फौजवर चालुन घेतले ते दाहा घटिका लढाई जाहाली नतर खुद गोखले स्वारसहीत फौजत घोडी घातली सेहे दीडसहे खासे मारिले तेव्हा सुरापूरकराचा मोड होऊन धर सुटला तेव्हा फौज लुटून तोफा हती घोडी पायदल बहुत आणिले सवस्थानाची खडणी घेऊन येताना श्रीमतास वर्तमान कळून बक्षीस मोत्याची कठी व सिरपेच वस्त्रे जाहाली ती समारंभे करून स्विकार केला सावनूर तालुक्यात पुरदया अरलीकटी करंडगी माहालात होता तो दोनचार हजार लोक ठेऊन बडाव करून सरकार तालुक्याची खराबी करीत होता हे वर्तमान श्रीमतास कळोन त्याचे पारपत्य करणेविसी आज्ञापत्र येताच दरमजल सावनूरास जाऊन पुरदयावर छपा घालून गलप ठोकला तेव्हा लढाई होऊन पुरंदया सिकस्त जाहाला बंडाचे पारपत्य करून फौजसहीत पुरंदयासी सावनूर तालुक्यात होते तेव्हा नाना फडणीस याची येतराजी होऊन पागा तोफखाना यासी गोखल्याचे रजे तलबेत न राहावे हुजूरास येणे याविसी पत्र येताच पागा निघोन

गेल्या तोफखाना भीमराव नि॥ पानशे याणी सरकार तोफ व पडाव तोफ याचे येणेप्रमाणे सरजाम सुधा सावनूरास राहीले नतर पाच साहा महिन्याने गेले त्याजवर पानशे याच्या सरजामा पैकी होनगुदी तालुक्यात मसकीमुदगल सरहद देशाप्रत आली निझामशाही असदलीखान मोगलसरदार याणी पाच हजार पठाण व तोफा फौजेनिसी होनगुद तालुक्यात स्वाऱ्या करून बखेडा केल्यावरून श्रीमतापर्यंत बोभाट जाऊन त्याच्या पारपत्यास गोखले यासी पुनः मर्जी प्रसन्न होऊन हजुरात बापू गोखले वकीलीस होते त्यास वस्त्रे देऊन सनदा सिके कटार देऊन रवाना केले तो हानगुद मुकाम पावेतोच दुसऱ्या दिवसी पाचसेहे फौज व तोफ व एकदर हजार पायदल घेऊन तयार होते हे वर्तमान ऐकील शादत–अलीखान मोगल याणी फौज सुधा गोखले याजवर चालून आले. त्यासमयी गोखले याचे फौज थोडी परतु हिमत भारी तेव्हा सर्वत्र सरदारसी हिमत देऊन लढाई सुरू करून बेलाशेक गोखले याणी त्याच्या फौजेंत घोडी घातळी तेव्हा पठाण लोक त्याणी जुहामर्दी तरवारी लढाई सुरु करिताच परस्पेर दोन घटकेपर्यंत तरवारीच्या शेब्दाखेरीज दुसरा शब्द नाहीं ऐसे तुबल जाहाले नतर खुद शाहादतअली पठाण याने गोखल काहा म्हणत खास खास स्वारी गोखले यावर येऊन वार टाकिला तो गोखले याच्या उजवे हातावर जखम लागली त्यासमई धोंडोपंत गोखले याणी शाहादतअलीखान मोगल याजवर वार चालवले तो पठाणाचा उजवा हात कलम जाहाला हातातील तरवार पडिली तेव्हा पठाण याणी घोडा माघारा फीरवावयाचा डोल पाहून घोड्यावरूनच गोखले याणी पठाणावर उडी टाकीली तेव्हा उभयेताची मिठी पडून घोड्याखाली आले गोखलेकडील सरदार लोक सर्व जखमी जाहाले तरी दंम भारी आपासाहेब व बापुसाहेब हे दोघेही तरवार मारले अश्यात पठाण बहुत ठार पडले आणि खासा शाहादतअलीखान वगैरे खासा लोक असामी पडाव जाहाल तेव्हा फौजेचा मोड जाहाला फौज कुटून फस्त करून मुकामी येऊन जखमी सरदार यासी बरदास्त करून शाहादतअलीखान यासी पालखी व बाकी पठाणास व लोकास घोडी व वस्त्रे देऊन बहुमान करून लावून दिल्हे इकडील मजकूर श्रीमंत सवाईमाधवराव कैलासवासी जाहाल्यावर नाना फडणीस माहाराज तुंगभद्रेपर्यंत राज्याची खंडणी घेऊन दुसऱ्या साली स्वारी निघोन राज्याची ठाणी घेत निघाले ते गोखले याणी सावनूर तालुक्यात बदोबस्त करून फौजे-

सैहीत सावनूरात छावणी करून होते तेव्हा माहाराज करवीरकार याचे सरदार रत्नाकरपंत अपा राजाज्ञा याणी दाहा हजार फौज तोफा पायदल घेऊन पाछापूर-पासून तुंगभद्रेपर्यंत राज्य घेऊन सावनूरास गोखले होते त्यास शाहा देऊन कारडगीच्या तल्यावर मुकाम केला तो धोंडोपंत गोखले याणी कदीम स्वार पाचसे व - रीद पाचसेहे एकूण हजार पायदल तोफा पाच येणेप्रमाणे सरजाम सुद्धा सावनूरात किल्यात होते दररोज सावनूरच्या मदानात लढाई होते होती महिन्यानतर एक दिवसी माहाराजाकडील सरदार जमा होऊन गोखले याजवर चालून गेले त्याची याची मनस्वी लढाई होऊन धोंडोपंतास तोंडावर जखम लागल्याबरोबर अपासाहेब व बापुसाहेब उभयतानी तरवार चालवून खस्त करून गोखले यांसी साभाळून घेऊन आले त्यासमयी सखोपतबापु व नानापाछापूरकर व सयपा जगताप व मदनसिंग व कासीराव कोकरे व सिदराम घोरपडे बलवंत-राव घाटगे वगैरे याणी फारच मर्दुमकी केली राजमडळकर माघारे मुकामास गेले इकडे फारच जायाजखमी जाहाले खर्चाची तंगच्याई कुमक कोणाचीही नाही याप्रमाणें तीन महिने दररोज लढाई मारीतच होते पुढें परिणाम दिसेना खावद नाहींत व्यर्थ कुजोन मरावे यापेक्षा समोर लढाई केल्यास स्वर्ग समजोन सदरहु मोठेमोठे सरदार यासी मसलत करून लहान मोठे सर्व येकदिल होऊन तयार करून निघाले धोंडोपंत गोखले याच्या जखमा सेजेस आल्या नव्हत्या त्यास पालखीत बसवून आपासाहेब उभयता दोन टोल्या फौजेच्या करून बहिरवमामा हातारे व मुले ऐसे स्वार जमाऊन एकवेळ धोंडोपंताजवळ पुढें उभ-यता पाठीमागे नगारा निशान व मोखले बाहीर सुभा राजमडळकरावर येक कोस चालून गेले ते भाद्रपद वद्य नवमी दिवसी रत्नाकरपंत व पाटणकर गाईकवाड बाहदर वगैरे मोठे सरदार याणी दाहा हजार फौजेनिसी मुका-मातून चालून आले समीपता होऊन लढाई सुरु जाहाली तोफातोफी व पायदलच्या फैरा समस्त पाच घटकेपर्यंत होत होती त्यानतर एक ठिकाण उभे राहिले असता तोफा खालीं फौजची नासाडी होती येकदा घोडी घालावी ह्मणजे फौज येकदिल होऊन राजमंडळावर सन्मुख चाळुन गेले मुख्य सरदार सदरहु याणी आपअपले पथकाविसी बहुत खस्त अंगीजीनी केली आणि समरंगणी युध्य खस्त जाहाले तेव्हा थोर थोर मोहरे राजमडळकराचे खाली जाहाले फौजेचा घर सुटले पळ निघाला पाठलाग करून मारीत सुटले पाच कोसापर्यंत

सोडासोडी करीत गेले तळ कुटून घोडी हाती नौबती तोफखाना वगैरे सलतानार्त पाडव करून घेऊन श्रीमताच्या पुण्यप्रभावे जय संपादून शांहानाले वाजवीत वाजवीत आले सरदार मंडली जायाजखमी बहुत कच्चे पके जाहाले त्य सी जखमाना देऊन निगा करवून जखमा बऱ्या जाहाल्यावर बहुमान करून बक्षीस पालख्या आफ्दगीऱ्या वस्त्रे देऊन फौजचा नूर वाढविली नतर सरकार तालुका तुंगभद्रेपासून वरंप्रभेपर्यंत ठाणी बसवून कितूरकर वगैरे याजपासून खडण्या घेऊन होनगेल तालुक्यात छावणी केली इतक्यात टिपू सुलतान सिकदर याची व इग्रज बाहादूर याची लढाई होऊन टिपू सुलतान ठार जाहाला श्रीरगपटण घेऊन राज्याचा बदोबस्त करून सुलतान याचे सरदार फौजबद याचे पारपत्य करीत चालले ते सोंधे प्रात मुंडगोडाजवल नदी उतरून धोडजी वाग फौजेनिसी श्रीमताच्या राज्यात येऊन तयार करून धोडजी वाग याजवर गेले त्याची यांची निकटता होऊन लक्ष्मेश्वर मुकामी फौज लुटली तो येक स्वारानिसी करवीराकडे गेले नतर अपासाहेब पटवर्धन याणी करवीरची मोहिममिरी केली सरदार सरकारातून सिदे याची पलटणे साहेब यासी घेऊन येऊन करवीरास मोर्चे बसविले त्यासमयी गोखले यासी करवीरास मदतीस जाण्याची सरकारची आज्ञा जाहाली त्याजवरून गोखले याणी अपली कदीम फौजेचे सरदार येकाडी व मानकरी याणी पेशजी करवीरकराच्या लढाईत खस्त मेहनत केली होती त्यांस बक्षीस बहुमान पावले नवत आणि हाली करवीरची मसलतीस जाणेची जरूर तेव्हा लोकासी बक्षीस बहुमान देऊन वाढविले असता सरकारचे कामकाजास झटले तेणेकरून येजमानाची किर्ती वृध्यी जाणोन समक्ष मेहनत केल्याचे नावनिसी याद लिहून.

१ सयाजीपा जगताप यासी पागा घोडी ५० रास व वस्त्र पालखी जातीस गाव मौजे सिहवली ता. नवलगुद.

१ सखारामपंत बापु देशपांडे पाछापूरकर यासी पागा घोडी ५० रास पनास पालखीची वस्त्रे जातीस मौजे हिरेकोप तालुके नवलगुद.

१ कासीराव कोकरे यासी पागा घोडी ५० रास पालखीची वस्त्रे मौजे हडगली ता. नवलगुद.

१ मदनसिग जमादार यासी पागा घोडी २५ पचवीस पालखीची वस्त्रे मौजे जाऊर तालुके नवलगुद.

१ मानकरी व येकाड लोकास सोन्याची कडीतोडे वस्त्र आत्पागीऱ्या व चवरी वगैरे देऊन.

---

५

येणेप्रमाणे बहुमान करून फौजेची तयारी करून सरंजाम जंगी तोफा पायदल सुध्धा करवीरांस गेले मोर्चेबंदी करून वरुणतीर्थ दक्षिणभागी आहे तेथे मुकाम केला नतर आपासाहेब तीन महिने वेढा घातला होता परतु किल्ला जेरीस आला नाही गोखले येताच येक दिवसीत मातबर लढाई करून किल्ला जेरीस आला नंतर पुण्यात होळकराचे राजकरण होऊन करवीरच शाहा उठला तेव्हा गोखले व चितामणरावआपा पटवर्धन सुधा कितुर प्राती जाऊन कितुरास गेले बापुसाहेबचे बाइको प्रसूत होऊन मृत्यू पावली सुतकी होते धोडजी वाग याणे करवीरातून निघोन पाछापूर तालुक्यात धाकधुम करून पैका घेऊन फौजबंदी करीत मोगलाईत जाऊन तिकडून पठाण दाहा हजार घेऊन तमाम राज्यांची खंडणी घेऊन गरग तालुका धारवाड येथे येऊन धोडोपतासी लढाई घ्यावी ऐसी मसलत केली ते वर्तमान गोखले यासी समजोन कितुरास राहिल्यास पाणी नाही आणि प्रसंग पडला असता इग्रज बाहादूर याची कुमक आहे जालीहालास जाऊन तेथे लढाई घ्यावी याप्रमाणे विचार करून रात्री कूच करून हलीहालास चालीले ते कितुरकर देसाई याणी फितवा करून रस्ता चुकवून झाडीत फौज घातली ते मार्ग तसी पडताच डझाडेत व तीन कोशा गिरंक खात फौज राहिली तिकडे वागास बातमी कळविली खासी फौज सडी तयार होऊन राऊतडवगी नाल्याजवळ गाठ घातली तेव्हा गोखले आपली बाहीरबुनग व काही फौज हलिहालास रवाना करून हजार खासा सरदार घेऊन नाल्यावर बेफकीर बसले होते इतक्यात कालापाहाट तोफ नाल्यात रुतली ती काढत हाती त्यासमयी फौजेची गलबल ऐकून हुशार जाहाले समीपता होऊन लढाईस धोडोपत गोखले व आपासाहेब व बापुसाहेब व सखोपत बापु व सयाजी जगताप कासीराव कोकरे व मदनसिग व मानकरी सुध्धा समोर चालून गेले तेव्हा लढाई

बहुत होऊन बापुसाहेब व विसाजीपंतनाना पाछापूरकर वगैरे यासी जखमा लागल्या त्यास हलीहालास रवाना करून गोखले व आपासाहेब दोघेही पठाणास मारीत चालिले तेव्हा गर्धी होऊन खतल जाहाले गोखले याचे फौजेची फुट पडोन झाडीत लोक जमले नाहीत फकत गोखले उभयेता पठाणाच्या भिडात सापडले घोडोपंत गोखले झाडाच्या धका लागून खालीं आले त्यास पठाणाची उडी पडोन तरवार चालिलेया गोखले याणी त्या समई मर्धुमी फारच केली जखमा लागून मोकामास आले आपासाहेब पठाणाची फली फोडोन पार जाहाले माघोन उलटून फलीत सिरले सभोवते पठाण पाचशेहेचा गरका पडला येक भालेकरी आपासाहेब याणी मंडल धरून पठाणास भाला लावीत चालिले पठाणाचे भाले लागून होय अणि आपासाहेबच्या भालेच्या जखमाने शेपनास पठाण जाया जाहाले तत्रापि आपासाहेब साबूत परतु पाचशेहे पठाण मर्द तटून गड्रून उभे राहिले आपासाहेब माहाशूर सहस्रांत येक भालेकरी घोडाची लढाई याची उपमा दुसरा स्वार नाही याप्रमाणे पाच घटिकापर्यंत पठाणाची तरवार लागू दिला नाही मृत्यू समीप आल्यामुळे भाला तुटला तो भाला टाकिला तरवार सडक घेऊन पठाणावर धावला तो पाचशेहे पठाणाची चौकडोन उठवणी येकदाच होऊन आपासाहेब तरवारच्या सफाईन पचवीस असामी ठार केले नतर एकदा पंचवीस तरवारच्या जखमा मस्तकावर होताच घोड्यावर व्याकूल होऊन स्वर्गास गेले फौजेत मामभांड (?) होऊन हलिहालाच्या किल्याच्या अशरांस गेली त्रिंतामणराव आपा व बापुसाहेब उभैतानी जखमा लागून मोकामी आले तेव्हा इग्रज बाहादर कुमक करून वागाचें शाहा सोडविली येक महिनापर्यंत हलीहाल मुकामी राहून जखमा सेजस आल्यावर उभयता सलीसाहेबास कुमकेस घेऊन धोडजी वाग याच्या पाठीस लागले याचा पल सुटला तो कौलतोभनुच्या मैदानात गाठ पडोन लढाई होऊन बागाचे पारपत्य करून स्वारी फिरत गेली नतर नवलगुद वगैरे प्रांती होते नवलगुद तालुक्यातची ठाणी बसवून राहिले होते पुण्याकडे होलकर हिंदुस्थानांत गेल्यावर श्रीमंत बाजीरावसाहेब माहाडाहून पुणेस आले येऊन राज्याचा बदोबस्त करून नगर प्रांती बाराभाई व बावनपागे याणी फौजबंदी करून तमाम मुलुक लूटीत चालिले त्याच्या पारपत्यांस गणपतराव पानशे तोफखाना सुधा व नाना पुरधरे जरीपटका हुजरत बापु गोखले असे तीन सरदार नेमिले कर्नाटकातून बापुसाहेब गोखले याणी दरमजल कूच करून पंढरपूरच्या

सरदेस गेले मोहालच्या मुकामी बावनपागे बालकृष्ण गंगाधर याची लढाई होऊन फौजचा मोड जाहाला नतर आठ दिवसानतर त्रिवर्ग सरदार मिळून पंधरा हजार फौज जिवाजी येशवत भाराभाई याची फौज पंधरा हजार हिंदुस्थानात होते ते हातनूर नजीक मुकाम करून शाहा दिल्हे लढाई दररोज होऊ लागली त्यानतर काही दिवस गेले गोखले यासी रुप्येची अडचण जाहाली चौकडोन रसीद बद आणि रस्ताही चालेना कोंडून पटवर्धनानी जेर केला हे पाहोन गोखले याणी सदरहू सरदार मडली वगैरे यासी बोलावून आणवून मसलत करून फौजचे येक-दिल्ह करून डरविलेचे किल्यात बसून लढन करावे ते केलेले नाना फडणीस या समयी सरकारच्या नि पा वर ठाण घतली या रोषे पटवर्धन आमच्या पारपत्यास सरकारातून समवास होऊन आम्हावर आले येक वेल मोड केला परतु दम खटी जाहाली नाही यासमई वरवर श्रीमताकडून पत्रही लिहिले असता बदोबस्त होत नाही सरकारच्या आमच्या मदतीसही नाही नाही अता सरकार कामावर प्राण गेल्यास श्रेयस्कर वाचल्यास सरकार मर्जी प्रसंग होऊन सरफराज होईल अता सग्रामचे दुसरा उपाय नाही असे करार बेलभडार होऊन सरदार लोक येकवलच्या मुकामी होते तो छापा घातला मोड होऊन माडवगणांसच्या मैदानात मोड जाहाला विठोजी होलकर पडाव आला त्यास आणवून श्रीमताकडे पाठविले नतर स्वारी फिरली कर्नाटकात बागलकोट तालुक्यास गेले माधवराव रास्ते याज-कडे तालुका होता त्याजकडे खडणीचा रोख केला नतर बिगाड होऊन लाविल्या लढाई जाहाली नतर जेरीस आले खडणी कबूल करून बागलकोटास तोफा रसद दिल्ही हाली तेथून कूच करून बदामी नजीक कितुरच्या तल्यावर मुकामी केल्या केंतुरकर काटकानी फौजवर चालून येऊन गोळी टाकिली तेव्हा तयार होऊन बापुसाहेब सरदार मडलीसह गावच्या असपास फौज येऊन पायदल घेऊन हला केला येक हला फिरविला दुसरे खेपास हला चढलीला तो आतून बदुकीचा मार बारी जाहाला त्यासमई दरवाजेजवल जोत्यावर चढत असता पोठास गोली लागून सखोपंतबापु पाछापूरकर पागे कामावर आले नंतर बापुसाहेब गोखले हे ऐकून बहुत रोषे करून हला करून गडीत सिरले ते दोनतीन सेहे काटकास ठार मारिले त्यादिवसी दुचित होऊन पदरच्या लोकास बहुताप्रकारे समाधान करून बंदोबस्त केला तेथून कूच करून कोणूर मलापाहारी तीरास जाऊन दसरा-पर्यंत तेथेच राहून नवलगुदची जमाबदी करून गदवले संवस्थानाकडे खडणी

सरकाराची यावयाची त्याजवर मोहीमीस श्रीमताची आज्ञा येताच मजल दरमजल जाऊन तेथून खडणी घेऊन फिरताच सुरापूरकरानी मदनसिगास छयापा घालून लुटून घेतले ते ऐकून सुरापुरावर चालिले त्यानी वकील पाठवून खडणी दिल्ही ते येकून नतर गदग किला घेऊन सावनूर ताका बाबासाहेब पटवर्धन याजकडे होता तो सोडोन सरकारात घ्यावयाविषई बापूसाहेब गोखले यास आज्ञापत्र यताच मजल दरमजल कूच करून सावनूरास गेले त्याजवर पटवर्धन याणी तालुक्यातील ठाणें बदोबस्त केले होते ती तोफाकडील लढून अवघी घेतली नतर सावनूरास मुकाम केला हे वर्तमान बाबासाब पटवर्धन याणी यैकून दाहाहजार फौजेनिसी गोखले याजवर आले आपासोहेब सरलस्कर व कितूरकर यासी कुमकेस घेऊन सावनूरास शाहा दिल्हा त्याउपरी हतिमतूरासो मुकाम पडला दररोज येऊन लढाई करू लागले पधरा दिवसानतर खासे फौज बापुसाहेब याजवर चालून घेतले तेव्हा बापुसाहेब याणी आपल्या सरदार लोकाच्या च्यार तुकड्या करून विसाजीपंत-नाना बाहादूर यासी पूर्वीस आपण खुद भागी पुणेकरमंडली पश्चमेश जनोबा सुभेदार उतरच्या भागी येणे प्रो येकून तोफासह वर्तमान तुकडे या बदोबस्ताने राहिले या अंगावर येईजेपर्यंत दमाने पटवर्धनाची पुदियुन येक येक जखमा अगावर घेऊन नतर पटवर्धन याजवर उठताच कठा मार करून फौजची तोड फिरविल्या वेली पराजय पावोन पळू लागले येक कोशपर्यंत खिखडीता (?) जाऊन बापुसाहेब गावेस माघारे सावनूरास आले नतर पुनः आपली फौज येकदिल करून सावदिल होऊन युद्ध योजिला नतर दुसरे दिवसी बाहीर सुध्धा फौज व तोफखाना व पायदल येकदर तयार करून दोनप्रहरी साहेब नोबत करून जिवावर उदार होऊन पटवर्धन याच्या सन्मुखी रणागणी उभे राहिले ते पटवर्धन व सरलस्कर वगैर सरदार आपले सलतनसुधा सावनूरच्या पूर्वीभागी येकोडीवर जमून राहिले नतर संध्याकालचे प्रहर दिवसपर्यंत फार गोळागोली युद्ध जाहाले नतर प्रहर दिवस राहिला असता पटवर्धनाचे अगावर चालून गेले तोफा व पायदल याची गोल्याची मारागिरी बहुतच होऊन हातास हात लावू लागले त्यासमई बापूसाहेब गोखले याणी त्याच्या फौजेत घोडे चालवून मारीत सुटले ते पाहून सरदार मंडळीही बरोबर तरवार मारीत चालिले त्याची फली फुटली फौजेचा मोड जाहाला अस्तमान होताच बापुसाहेब गोखले याच्या तळावर उभे राहिले लोक दाहा कोस परियत पाठलाग करीत गेले पटवर्धन उधळून जाऊन लक्ष्मेश्वरास

राहिले फौज कुटून गेली त्याप्रमाणे खराबी जाहाली यावर श्रीमताकडून कृष्णराव वकील पुण्याहून येऊन गोखले व पटवर्धन याचा सला करून तालुका सरकारात घेतला त्याचा अमल गोखले याजकडे सागोन फौजेचा खर्च जाहाला तो सरकारात देऊन सरदार मडली जखमी होती ती त्यास जखमाना देऊन बक्षिसा व वस्त्रे कढी तोडे व किताब वगैरे देऊन लोकास खुसी राखिले सरकारच्या कामावर दुरुस्त राहिले लढाईचे वर्तमान ऐकून श्रीमंत बाजीरावसाहेब याणी बहुतच बापुसाहेब याची तारीफ करून सरफराजी केली सरदार बापु गोखले हे माहाशूर व इमानी मसलती लोकराजी जितद्रिय येशस्वी अंतरनिष्ट ज्ञानी यास निकट ठेवावेयासी योग्य असे श्रीमताच्या ध्यानात येऊन हुजूर बोलाविले शके संवछर पुण्यास जाताना × × × सरदारास जमावे ह्मणोन सदासिवपंत भाऊ यास सागताचे याणी विचार करून बापु गोखले बुध्धिवान् सरदार शूर याणीच प्रतिनिधीस मार्गास आणतील ह्मणून श्रीमतापासी विनंती केलीवरून बापु गोखले यासी मोहिमीची वस्त्रें देऊन रवाना केल्यावर दरमजल कूच करून प्रतिनिधीकडील नवे सरदार फौजबद वर्धनगड वगैरे किल्याच्या आश्रास होते त्यासी व खुद प्रतिनिधी याची लढाई करून सिकस्त जाहाले ही गेले नतर तेलणीस सोटा किल्ला घेऊन कैद करून पुण्यास पाठविले इकडे वसतगड व कमलगड व मोरगड व महीपतिगड वगैरे किल्ले विज्यापूर वगैरे माहाल घेऊन पुरातन कारभारी याचे स्वाधीन राज्याचा बदोबस्त करून पुण्यास श्रीमंताच्या दर्शना घेऊन मुकामी राहिले कोकणात कालेगडगारी किल्ला मोठे तेथे गडकरी याणी रायकड रचावल्या दरवडे करीत होत त्याच्या पारपत्यास गोखले यासी आज्ञा जाहाली याजवरून बालाजीपंत माराठे यासी वस्त्र देऊन फौज तोफखाना देऊन रवाना केला तो किल्यास शाहा देऊन बसले किलेदार याणी येकदोन वेला लढाई करून मोर्चे उठविले सरदाराकडून बदोबस्त होईना हे समजून सयपा जेगताप व रामचंद्रपंत व यमाजीपत पाछापूर व बाबाजीराव गोखले वगैरे प्रमुख यासी काही सरजाम देऊन पाठविले त्यानी जाऊन लढाई करून मोर्चे भातखल्यास बसविले त्यादिवसी लढाई मनस्वी होऊन शंभर लोक ठार व दोन सहै जखमी याप्रमाणे होऊन मोर्चे काहीम जाहाले ते तोफा तोफा लढाई समग्र बारा महिने देऊन किल्ला सल्लेन घेऊन पुण्यास फौजत आले त्यानतर नासीक त्रिबक व कोपरगांव व येवल ठिकाणी भिल्लाचा उपद्रव होऊन गंगथडी उज्याड जाहाली भिल्लानी

फौजबंदी करून धामधूम करून लागले त्यानतर विसाजीपंत गोखले यासी पाठवून भिल्लाचा बदोबस्त केला बापुसाहेब सर्वोत्तम लढावये शूर मसलती येशस्वी श्रीमताचे चित सभाळून मर्जी संपादिली नतर विसाजीपंत गोखले याणी बापुसाहेब याजबरोबर विरोध बुध्दि न सोडून श्रीमतापासी जाऊन तजकारा वगैरे गुन्हे समजाविल्यावरून श्रीमताच्या चितांत विकल्प येऊन मर्जी जाहाली मग प्रतिनिधी याजकडील किल्ले व राज्याच्या सोडचिठ्या घ्याव्या याजकरिता बापुगोखले यासी हुजूर आणून सोडचिटया द्याव्या ह्मणताक्षणी गड किले वगैरे सोडचिटया दिल्या त्याप्रमाणे सरकार तालुके वगैरे माहाल रुजू जाहाले नतर गैरसमजाविणारच लबाड जाहाले नतर बापु गोखले प्रमाणीक ठरून त्याच्या सरदारीची तंगच्याई परस्पेर ऐकोन कदीम सरजाम नवलगुद गदग वगैरे माहाल खेरीज पाच लक्ष येकूण अकराबारा लक्षाचे राज्य देऊन अठरा लक्ष कर्ज रुपये हवालतीस होते तेही परिहार करून गोखले याजवर कृपाळू जाहाले त्यानतर काही दिवसानी श्रीमताची इग्रज बाहादूर यांची दोस्ती अवल ता॥ (न)वलगुद व मुगद तेगूर वगैरे माहाल सरजामास सरकारातून दिल्हे होती तितक्यांस ही कमाविसदार वासुदेवपंत म्हराठे यासी ठेऊन पुण्यास तोफखाना पायदल सुधा खंडणी मामुलप्रमाणे सवस्थांनिकाकडून घेत गेले नतर श्रीमताची भेट होऊन मुकामी कायम जाहाले ते काही दिवस गेले नतर श्रीमत प्रतिनिधी याणी आपले पदरचा पुरातन कारभारी व सरदार मडली याजवर बेमर्जी करून लहान माणसास जवळ करून बेतहरा कारभार करू लागले नवे नवे कारभारी राज्य लुटून लागले व तेलणीवर प्रतिनिधीची मर्जी होऊन अनन्वित येवस्था जाहाली तो राज्याचा बोभाट आणि चोराचा उपद्रव व दरवडे पडू लागले लोक भयस्थ होऊन बहुत हलाखी जाहाले हे पाहून राज्याचा बदोबस्त व तेलणीस कैद व प्रतिनिधी मार्गात येण्यास्तव सरकारातून होती राजकारणामुळे हलकी मनुष्याचे प्रबलता होऊन परस्पेर चितात विकल्प येऊन बिगाड जाहाला उभयपक्षी आपआपल्या जागी सावधगिरी जाहाली श्रीमंतानी येकदर सरदार मडलीचा सला घेऊन बिघाडाचा डौल दृष्टीस पडताच इग्राज बाहादूर याणी बापुसाहेब याजकडे लिगो भगवत वकील या समागमे निरोप पाठविले ते ते तूर्त लढाई नमोद कली आहे अश्यास आपली अमची दोस्ती इकडील लक्षात आसावी ऐसे कितक स्नेहभावाचा विचार सांगून पाठविला नतर पूर्वी कर्नेल वसलीसाहेब पुण्यास आले समई बापु गोखले याजवि-

भोर

सीची खातरजमा श्रीमंत बाजीराव साहेब यासी सागून रुजू केले ते कुपणी मदार थाची खातरजमा सरकारात गुतून हाली लढाई नमूद जाहाल्यावर सरकारकामात काम कसूर केलेस खातरजमेस इग्राज बाहादूर यांणी बटा अणि मना हरामपणा येईल ज्याच्या पदरी आपणास ठविले आहे त्याची इमान इतबारी चाकरीवर प्राण गेला तर चिता नाही सरकारची तनाखोरी केल्यास तूर्त दौलत आपण देतील परंतु लोकाचा आपवाद अणि परलोक नाही हे कर्म अमच्याने होणार नाही अपली दोस्ती आह्मी मिळविली आहे आमची लोकात आपकिर्ती केली असतां ज्याणी खातरजमा केली आहे त्याची सिफारस होईल न हून दुसरा भाव मनी न आणावा स्वामीद्रोह आहे आह्मी करून स्वप्राणानिसी राहून त्या योगान दौलत मिलवून अनंभव केल्याने लोक निंदा करतील ते कोठवर ऐकावे त्यापेक्षा जीवन-माफक सन्मुख युद्धामध्ये सरकार कामावर आल्यास श्रयस्कर याप्रमाणे नानाप्रकारचे नीतीच्या गोष्टी वकीलाबरोबर सागून पाठविले इकडे श्रीमताच्या आज्ञानुसार फौजेची तयारी व दारुगोली वगैरे सरजामाची तरतूद व लोकाची खातरी व सरदार मडलीची समत घेऊन लढाईची तरदूद तजवीज प्रहूड जेनास करून श्रीमतापासी सर्व सविस्तर ध्यानास येतसे विनंती केली यावर श्रीमताची इंग्राज-बाहादूर याचा बंदोबस्तास बेबनाव पडून बिमाड जाहाल्यानंतर लढाईचा डौल दृष्टीस पडून समस्त सरदार मडली नवल करून बापु गोखले यासी मुख्त्यार देऊन लढाईस अश्विन वद्य ११ येकादसीचे दिवसी आपण परबतीवर बसून आज्ञा दिल्ही आज्ञा घेऊन खडकी पुलावर इग्राज बाहादूर उतरले होते पलठण चार होती श्रीमताचे फौजेची तयारीची बातमी येताच अलंपिष्टनसाहेब याणी बोट टाकून पलटणात जाऊन पलटण तयार करून गणेशखिंडीच्या मैदानात येऊन उभे ठाकिले इकडे फोज व तोफखाना सरदार मडली सनमुख जाऊन समस्तास लढाईचा इशारा तोफाचा कळवून तोफा सुरू केल्यानतर इग्राज बाहादूर याज-कडील तोफा सुरू जाहाल्यावर बापु गोखले याणी जातीनिसी फौजसह घोडी घातली ती पलठणावर अदलताच पलटण मागे हटून सांवरून तोफांची मारगिरी पलटणाच्या फेरा श्रेकदाच सिलक झाडल्यावर गोखले याजकडील स्वार येक हजार घाड्यासहित समरगणी कामावर येताच चहूकडून खरदार उठावे ते माघारे घेतली त्यापैकीं नाना अपटे यमाजीपंत पाछापूरकर देशपाडे या उभयेतानी दोन हजार स्वारानिसी पलटणाच्या पाठीसिवार होता याने बहुतच नासाडी पलटणाची केली

इकडे फौज येकीकडे राहिली दरम्याने बापु गोखले पलटणाचे संनिधाने भैरजी सिताले व बाबाजीपंत गोखले व रामचेंद्रपंत देशपाडे पाछापूर व रामचद्र वेकटेश खासे बरोबर होते बापु गोखले याचे खाली घोडा होता तो जखमी जाहाला तर फैरा सोसून त्याचे ठिकाणीं गोखले राहिले इकडे तोफखाना व पायदल याणी पलटणावर मारांगेरी बहुतच करीत जागा धरून राहिले ते समग्र प्रहररात्रपर्यंत येकसाहा लढाई केली च्यार पाच सहे जाया जखमी जाहाले त्यानंतर पलटण लढाई महकूब करून मुकामास गेले पलटाणाची खराबी फारच जाहाली गोखले सडी फौज सुध्धा मुकाम ज्यास्थली त्याच स्थली राहिले प्रातःकाली श्रीमताची फौजची फार लढाई मुबलक जाहाली तुह्मी नाही अशात पुन्हा लढाईची मसलत केलीया खराबीची बी जाणून आह्मि आलपिष्टन साहेब बाहादुर यांस बोलण्यास वकील पाठवून दिल्हे याजवर श्रीमतानी फौज माघारी नेहली बापु गोखले यासी बोलोन नेऊन आणून सला विचारल्यावर सला मनास न येता लढाई ठरवून सर्व सरदार फौज तोफखाना वगैरे येक जागी मारगिरावर मुकाम पाडिला नतर जान-ल्याहून अलपिष्टनसाहेब याच्या कुमकेस च्यार पलटण व रसद आली हे वर्तमान ऐकून नाना आपटे वगैरे यासी च्यार हजार फौज देऊन रवाना केले ते जाऊन रसद मारून अणिली पलटणे जाऊन मिळाली ती नदीच्या पैलीकडे डोंगराखाली उतरभागी मुकाम जाहाल्यानतर नदीवर दररोज गोळागोळी चालली होती रवि-वारी अष्टमी दिवसी सूर्योदयापासून तिसरे प्रहरपयत पायदळाचा लढाई नदीत जाहाली नतर इग्रज बाहादूर याणी तोफा पलटण तयार करून फौजेवर तोफा रोखून गेले श्रीमताकडील तोफाही सुरू जाहाल्या अस्तमानपर्यंत उभय शेनकडील बेसुमार गोळे चालिल नतर रात्र जाहाली श्रीमताकडील पायदल नदी धरून राहिली त्याजवर पलटण चालून आल्यानतर पायदल जागा न सोडता बदुकीच्या फैरा व बाणाचा मारा मनस्वी जाहाला तो चंद्र अस्तमान जाहाला तरी लढाई अपरमित जाहाली श्रीमताकडील फौजची नासाडी व पलटणाची नासाडी फारच जाहाली गोखले मात्र आपल्या फौजेनिसी जाग्यावर काईम राहिल हजार पायदल जखमी जाले तोफखाना वगैर सिव्हगडास रवाना करून श्रीमतास बापु गोखले याणी सासवडास जावयास चवदा वेल विनंती सागून पाठविले परतु श्रीमतानी न साडिता लढाईतच राहिले होणार होईल परतु श्रीमत गेल्यामुळे लष्कराचा धर सुटला असे भले लोक ह्मणतील आदेशाने राहातच श्रीमतास सक्त विनंती बापु

गोखले जनाब देशपांडे सावपूर अताजीपंत मामा गद्रे याजबरोबर सांगोन पाठविले नंतर श्रीमंतानी सांवसगडास गेले इकडे समग्र रात्र लढाई होत होती सुर्य उगवला तो इग्रज बहादूर यावयाचा पुर्वी सर्व सरदार विंचुरकर व पटवर्धन व गोरे याणी जागा सोडून गेलेच होते हे पाहून राहिल्यास परिणाम नाही ह्मणोन बापु गोखले पुणे सोडून सिंसवडाची वाट धरताच तमाम फौजा जिकडील तिकडे जलदीनेच घाट साडून संसवडास गेल्या भोजन करून जेजुरीस मुकाम करून पुलावरून घाट चढून देऊरावर मुकाम जाहाला नंतर इग्रज बाहादूर याणी पुण्याचा बंदोबस्त करून श्रीमंताचे पाठीस पलटण व तुरफ व तोफखाना वगैरे सरजाम घेऊन जेजुरीस मुकाम केला श्रीमंतापासी सरदार पटवर्धन आदिकरून इग्रज बाहादूर यांच्या मुकामापासून वीस कोसाचे अंतरेने स्वार राहिली दरम्यान बापु गोखले सलतनेत सुध्धा लढाई घेते असावे या प्रो प्रकारे मसलत घाटून विनंती केल्यावर श्रीमंताची स्वारी पंढरपुराच्या रोखे पुढें बेताप्रमाणे चाल्ती जाहाली त्या दिवसी मुकामावर अपा निपाणकर येऊन मिलाले इकडे बापु गोखले आपली तयारी करून जेजुरीच्या रोखे इकडून सरदार बरोबर फौजा देऊन इग्रज बाहादूर यांसी युध्ध करावेसी रवाना केले ते नदीच्या पुलावर जाऊन गाठले तेथे लढई लागून घाटपर्यंत उभयेता सर्व शेना अल्या दुसरे दिवशी घाटात मातबर लढाई जाहाली नंतर दररोज इग्रज बाहादूर अगाडी व पिछयाडी व बाजू रोखून लढई करीत चालिले च्यार पाच मजल त्या प्रकारे जाहाले तेव्हा खेरीज जिला पंढरपूर येथे मुकामास जाते समई बापु गोखले याणी खासा सरदार लोक निवडून बारा सेहे असामीचे पतक करून आपण त्या मंडलीत राहून इग्रज बाहादूर याच्या दोनी बाजू सांभाळून होते किती येक सरदार यासी बोलावून बक्षीस कबूल करून पलटणच्या रवेची फली फोडून तरवार मारावे त्यासी तोडा बक्षीस असे बोलताच त्या दिवसी लोकानी हुकुमाप्रो कामकाज करून बक्षीस घेतली मुकामास पोंहूचले नंतर श्रीमंताकडील फौजेची चिकाटी तुटेना बहुतच अडचण इग्रज बाहादूर यांसी पडली तेव्हा वाखरी मैदानात लढाई मातबर जाहाली रामचंद्र वेंकटेश गोखले याजकडील सरदार त्यांच्या पायांसी गोली लागल्यावर लढाई मोहकुब जाहाली कुरली भिमा तीरावर गोखले याचा मुकाम जाहाला दुसरेया दिवसी पाहटेच्या पाच घटका रात्रीस गोखले याचा फौजावर छापा इग्रज याणी घातला तो सांभाळून नित्याप्रो अगाडी पिछयाडी

रोखीत चालिले असे पधरा दिवस जाहाले त्यानतर ब्राह्मणवाडी जुनरप्रांतच्या घाटावर मुकाम श्रीमताचा पडला इग्रज बाहादूर याचा फौजेचा अतारा फारच पडला अणि बापु गोखले याचा पुत्र बाबा यासी ज्वराची भावना होऊन मृत्यू पावले त्यांची स्त्रीच्र बारा वर्षांची होती तिने सतीचा निछय करून केला तो ऐकोन श्रीमतानी व बापु गोखले याणी राहावे याविषई बहुत आग्रह केला तो न यैकिता पतिव्रतेन मोठा समारभ धर्म बहुत करून सती गेली त्या मुकामाहून फुलगाव आपटीस मुकाम गेला दुसऱ्या दिवसी जजुरीचा रोखे जात असता घोडोनदीहून इग्रज बाहादूर याणी पुणेकडे श्रीमताची जाणार तिकडील कुमकेस जात होता अकस्मात गाट पडली यानतर फौज पाहून इग्रज बाहादूर याणी तोफा चालु केल्या श्रीमत अैकोन बापु गोखले यासी आज्ञा केलीज अज लढाई करून मार्ग करावा हे आज्ञा घेऊन समस्त सरदार मडलीसहवर्तमान पलटणावर चालून घेतले ते मैदानात निभावणीं पडेना ऐसे पाहून कोरेगावच्या अश्रयास अले ते पाठोपाठी फौजा गाठी घातल्या तुबल लढाई होऊन पलटण व तुरपस्वार सिकस्त जाहाल्यावर येक वाड्यात सरदारलोक घटकारात्रपर्यंत फैरा करीत होते त्या दिवसी पाचसेहे लोक ठार जाहाले सरदार लोक पाचपनास कामावर आले बापु सिंदे धारवाडकर याचे पायास गोली लागोन जेर जाहले ते घरी गेले जेजुरी मुकामेस जाऊन दरकुच करून मुधोल प्रातास आले दोन टोल्या करून येक निपाणीकडे तोफखाना पायदल रवाना केले बागलकोटावरून बेळगावास येऊन निपाणीच्या मैदानात लढाई घ्यावी ऐसा बेत करून मुधोलास गेले पढरपुराकडोन अलपिष्टनसाहेब याणी छ्यापा घालावा याकरिता येणार हे बातमी येताच उगार मुकामावर छ्यापा घालावेयास सुरपालीहून सडे होऊन बापु गोखले रातोरात्र उगारास येताच बातमी कळून साहेब महिसालास जलदीन निघोन जात असता फौजची गाठ पडून आगाडी व पिछ्याडी मारल्यावर महिसाल व कवठे दरम्यान माल तेथे पळटण उभी राहून प्रहरपर्यंत गोलागोली होऊन मुकामास कवठेस केला पाठीमाघे कर्नाटकाहून इसमितसाहेब होतेच दोनी शाहा साभाळून श्रीमंतास सातान्याकडे रोखे सुचून आपण पळटणाबरोबर सदरहूप्रो नित्य लढाई घेत रहिमतपूरान बेरगावास मुकाम केला रहिमतपुरावर अलपिष्टनसाहेब व इसमत-साहेब बाहादूर उभयताच्या भेटी होऊन दुसरे दिवसी श्रीमंत सातान्याहून घाट उतरून पळटण देशी जाणार हो बातमी ऐकोन घाट धरून श्रीमत हस्तगत

करून घ्यावे ऐसी मसलत करून प्रहररात्री कुच करून पळटणे सुर्योदयास नादगिरी जवळ येताच ही बातमी गोखले यासी कळोन पळटणाबरोबर तयार राहून सरदार चहुकडे नेमून लढाई घेत घोळवीत दोन प्रहरपर्यंत घालविले इकडे श्रीमतास अवकाश पडून घाट उतरून पळटण दशी काबलेश्वरास गेले नतर इग्रज बाहादूर याणी इछा सोडून सितारा वगैर किलेस गुतोन राहिले श्रीमत सोलापुरास जाऊन तेथील बदोबस्त विसाजी देवराव पाछापूरकर यासी सांगून दरड्याच्या रोखे स्वारी चालली ते पढरपुराहून पाच कोशावर अष्टे गावजवल मुकाम जाहाला माघ शु॥ १५ दिवसी सातान्याहून इरुमत साहेब याणी पळटण तुरुफ सडी करून दोन दिवसात मुकाम मजकुरी येणार ही बातमी चतुर्दसी रात्री कसताच श्रीमताजवल बापु गोखले याणी विनंती करून दोन प्रहर रात्री कुच करून श्रीमताची स्वारी पुडे जावी मागे छापा घालून आपण जावे असा विचार ठराव करून डेन्यास येताच आपा देसाई सरलस्कर याणी श्रीमंताजवळ येऊ (न) पुर्णमेचे स्नान करून भोजन करून जावे ते रात्री छापा अला तर साभाळून असी मसलत बिघडविली हे वर्तमान कलोन गोखले चिताग्रस्त झाले रामचद्र वेकटेश घाटावर होते त्यास दाहा बोलावणी निकडीची गेली असता येत नाहीत आणि सरदार मडली याचे चित शुध नाही सरकार कामास झटत नाहीत सर्व मसलत आमच्या अगावरच गुंबद श्रीमतासी नानाप्रकारी इतरानी मसलत देऊन लागले असे किती येक प्रकार मसलत चालली असता रणमुख जाहाल्यावर माधे काय झाले तरी चिता नाही असा सिधात मनी करून जवलचे मडलीस सागतच होते चतुर्दशी दोनप्रहरच्या अमलात कूच नगारा करून बाहेर पडावयाच्या रोखे पाठविली आपण स्नानसध्या करून सुरयोदिवई भोजन करून सडी तयार होऊन बसले होते श्रीमताची स्नानसंध्या होऊन भोजनास बसले इतक्यात छापा अल्याची बातमी अली नतर रामचद्र भोजराव पाछापूरकर यासी सरलस्कर यासी जलदीने बोलावून घेऊन येणे मी श्रीमताकडे जातो ऐसे सागुन श्रीमताकडे गेले रामचद्र भोजराव जलदीने सरलस्कराकडे जाऊन वर्तमान सागून सदरहुप्रो बोलाविले ते ऐकोन तुह्मी जाऊन बापुसाहेबास सागणे जे फौज घेऊन अताच येतो ऐसे सागून आपण झाडेस गेले ते माघारे बापु गोखले याजकडे येताच श्रीमतास इटे मुकामी इग्रज बाहादूराच छापा आला त्यासमई श्रीमतानी बोलिल्यावर अखेरीची बोलणे बोलून निघाले ह्मणोन सदरहु लिहिले आहे

त्यासमई बोलले ते सविस्तर ल्याहावे म्हणोन आज्ञा त्यास बापु गोखले याणी इग्रज बाहादूर याचा छापा अल्याचे वर्तमान यैकून श्रीमतापासी विनंती केली श्रीमंत अपले स्नानसध्या व ध्यानात होते पुर्व दिवसी बापु गोखले याणी कुच्याचा बेत मध्यरात्रीस केला तो निपाणीकर, देसाईनी सल्हे न येऊन राहिले यामुळे हे विघ्न अल्याचे मनात विषाद होता अणि भोजन सोडून निघावे तर अधीरपणा व असावध रीत दिसते म्हणोन श्रीमत याणी गोखले यावर जेहल केली जे आपण लढाईच्या कामांत माहाशूर अणि सावध सर्व गोष्टीत कुशल समजोन ही मसलत तुमच्या गली घालून आम्ही बेफिकीर असावे ते जेव्हा पाहावे तेव्हा असावधगिरीने कार्य न पाहता गडबड सागण्यात येऊन मर्जी दिक करून न सुचे ते होऊ लागले पुढील विचार काय सागावे निष्ठुर वचने कानी पढताच पूर्वी दिनी याप्रो छापेची गडबड होईल याजकरिता मध्य रात्री कूच करून दाहा कोश जावे तेथे स्नान सध्या भोजन उरकलेनंतर मुकामास जाण्याची मनसुभी विनंती केलीच होती ते मनास न येता दुसऱ्याचे उतर ऐकोन गडबडीन मर्जी खटी जाहाल्यास त्याणी आपल्या धर्मेकडून पराकाष्टा केल्यानतर स्वामी कार्य कोण करणार करून पलेस पाहचवितील आज रण सिध्धच आहे शेवकजनावर स्वामीनी चित्त विटल्यावर त्याचे असानप्राय होऊन जिवादारभ्य स्वस्त करून रणांगणी स्वामी कार्यावर आले असता श्री सनिधानास नीट पुनरपि स्वामीच्या निकटी आल्यास याहीपेक्षा बहुमान आहे या प्रसंगी स्वामीनी भोजन सपाऊन सत्वर स्वारी चालती झाली पाहिजे चरण दर्शन या उपरी होईल तर उत्तम न होय पेक्षीच शेवटच याप्रमाणे बोलोन नमस्कार करून श्री इष्टदेवता श्रीमारुतिचे स्मरण करीत निघोन बाहेर आले रामचद्र भोजराव पाछापूर याणी सरलस्करचे वर्तमान सागितले ते ऐकोन निघोन छापा आल्याचे रोखे फौजेची तयारी होतीच आपली साहेबनौबत वगैरे सनताल सुध्धा इग्रज बाहादूरच्या सन्मुख जाऊन राहिले मुकामाच्या पश्चमभागी वोढ्याच्या पुर्वेस खडीवर राहून बातमीस लक्ष्मणसिग जमादार यासी पाठविले ते बाणखस्तीवर तुरक स्वार दृष्टीस पडले हे पाहून दाहा वीस असामीयासी श्रीमताकडे छापा अला जलदीने स्वारी घोड्यावर होऊन जावे याजकरिता विनंती करावयासी पाठविले तर तळावरच स्वारी होती हे पाहून रामचद्र भोजराव यासी श्रीमताकडे निकडीची विनंती सागून पाठविली त्याणे विनंती करिताच मेणे उतरून माहाराज व राणी घोड्यावर स्वार होऊन जलदीने चालले

त्या समई निपाणीकरांसी श्रीमंताची आज्ञा आलीजे सारीच्या माघे तुम्ही व गोखले उभयता चांगल्या बंदोबस्ताने छापा सांभाळून मुकामास येणे विसी सांगितले नंतर रामचंद्र भोजराव यांस सरलस्कर याणी बरोबर घेऊन छाप्याच्या रोखे गेले बापु गोखले पंढरपुरच्या अंगी काडती घेऊन चालिले ते पाहून इसमितसाहेब बाहादूर याणी तुर्फाच्या तुकड्या दोन करून तोंड रानीत चालिले श्रीमंत अर्ध कोश गेले हे पाहून सरलस्कर याणी सांगितले जे बापु गोखले यासी सांगणे जे छापा आला हाली लढाईचा प्रसंग निभावणार नाही फौज मुकामास गेली हाली जमेत थोडी आह्मी व आपण पिछा सांभाळून जाऊ असे सांगताच रामचंद्र भोजराव याणी बोलिले जे गोखले व इंग्रज बाहादूर यांची गोळागोली होत आहे अशांत गोखले माघारे कसे येतात आपण यावे जाऊ असे ह्मणताच आह्मी श्रीमंताबरोबर जातो असे बाळून गेले रामचंद्र भोजराव गोखले याजकडे येतात इतक्यात पांच शेहे राऊत पाठीवर टाकून पनास खासा बरोबर गोविंदराव घोरपडे मुधोलकर व भइरजी सिताले वगैरे धारकरी घेऊन तुरपाबर उटले आधी गोखले याजकडून लोक बंदुखीची गोली चालली तुरफातून तोफेचे गोले दोन सुटले नंतर तमचेची फैर जाहाली यावर गोखले तुरफात सिरून पनास खासे यानिसी मारीत चालिले तेव्हा दाहा वीस मोहर साहेब खाली येताच तुकडी माघारी हटली दुसरी तुकडी आलाहिदा होती तिणे पाहून गोखले यासी पोटी घेऊन येताच पहिली तुकडी फिरली मध्ये गोखले सापडले पनास खासेही सापडले तेथे तरवारा मनस्वी चालवून पनासापौ च्यालीस खासा सरकार कामावर आले गोखले यासी गोळी लागली घोडा होता तो मोकळा जाहाला तुरफामध्ये सापडलेल्या असामीपौ दाजीबा अईतोळे पागे व बहिरजी सितोळे पुणेकर व चितोपताचे चिरंजीव जखमा लागून व रामचंद्र भोजराव पाछापूरकर असे दाहा असामी यासी वाट फुटून बाहीर आले क्षेत्र आल्याच्या ठिकाणी येकमेकाची गाठ पडली नाही दोन हजार तुर्फात पनास असामी सिरल्यावर येकाची भेट येकास नाही गर्दी जाहली त्यासमई बापु गोखले यांची व इसमंतसाहेब बाहादुर याची गाठ पडुन जखमा लागल्या ऐसे ऐकीव वर्तमान परंतु गोखले याच्या मंडळी दाहापौ कोणाच्या दृष्टीस पडले नाहीत बापु गोखले याणी गर्दीत मिसळले त्याची अखेरी जाहाली ते ईश्वर जाणे याप्रकार छापा येऊन गर्दी जाहाल्यावर तुर्फानी श्रीमंताच्या पाठीवर गेले तेव्हा अकलकोटकर व माहाराज बाबासाहेब व राणीसाहेब राजे याणी कुथून

राहिले श्रीमताबरोबर गेले नाहीत त्यास इग्रज बाहादुर याणी सिकस्त करून बाजी-रावसाहेब याची पाठलाग बरीच केली त्यासमई श्रीमताजवळ पचेविस स्वार होत तुर्फाची मिठी पडली तेव्हा श्रीमत बाजीरावसाहेब व चिमाजीअपा उभयतानी बहुत मर्दुमी करून तुर्फाची मिठी तोडून मुकामास गेले सकल फौज मुकामास आली पनासपौ दाहा असामी ही आल्या गोखले याचे वर्तमान ऐकोन श्रीमंत बहुत दुखी होऊन पुन्हा सरलस्कर यासी खलबत करून कूच करून दुसऱ्या दिवशी स्वारी जात असता सरलस्कर यासी श्रीमतानी बापु गोखले याजकडे जाण्या विषई आज्ञा केली होती जाऊन काय केले असे पुसत असता सरलस्कर व रामचद्र भोजराव पाछापूरकर याचे समक्ष सरलस्कर गोखले याजकडे न गेल्याचे हाऊन श्रीमंतानी निषेध केल्यानतर चतुःश्रिगीपर्वत स्वारी गेली तिकडे खानदेशाहून रामदीन नी॥ होलकर याजकडील सरदार येऊन मिळाले नतर गण-पतराव सुभेदार नागपूरकर आले फौजा घेऊन व तोफखाना व रामचद्र वेकटेश यासी बोलावणे पाठवून नागपूरास चालिले नागपूरानजीक ठाण येथे मुकाम करून पाढरे कवडीस झाडोत बाणगंगा तीरी राहिले नतर आठ पधरा दिवस मुकाम करून चईत्र वद्य १० स चौहुकडून पळटण तुरुप स्वार यक कोशावर मुकामास आले त्याची बातमी कळताच बरोबर सरदार निपाणीकर व इचूरकर व पुरदरे रामचद्र वेकटेश नि॥ गोखले वगैरे यासी श्रीमतानी बोलावून मसलत करावी ते प्रथम निपाणीकरास बोलावून पाठविले असता भाना घेऊन आले नाहीत रामचद्र वेकटेश यासी बोलावून रात्री छबिन्याचा बदोबस्त करून पूर्वभागी झाडीतून पार व्हावयासी नवसाजी नाईक पुंडे यासी पुसून माहीतगारी झाडीची ओह समागमे घेऊन जाव यैसी योचना करून पाहटेच्या प्रहर रात्री निघोन श्रीमतापुढे नवसाजी नाईक यासी घेऊन चालिले त्याचे पाठीमागे बाईसाहेब त्याचे पाठीमागे यमुनाबाई गोखले यामागे सरदार व फौजा असे जात असता घाटास आले तिकडून पळटण वाट चढून येत होती ती गाठ पडली मग सरदार मडली व निपाणीकरास बोलाविले पुढे उभे राहताच तोफा पळटणातून सुरु जाहाल्या पाच पनास मुडदे पडले तो फौजेचा धर सुटून निपाणी-कर व सरदार मडली पळोन श्रीमताच जागी बरोबर दाहा स्वार वामनराव आपटे व पाढरे वगैरे बाईसाहेब व गोखलेबाई राहिले नतर पलटण तुरुफ स्वार जवळ अले श्रीमतानी जिवावर उदार होऊन राहिले हे पाहून

जवल अनीन धरून घोडा फिरविला नवसाजी नाईक वाट काढीत चालिला इकडे दोघी बाया पळटणे पाहून घोड्यावर बसावयास अवसान नाही अश्या घाबऱ्या जाहाल्या तोफाचा भडभार आणि हातास हात लागले त्या वेळीं मोठा गजेब जाहाला अश्यात श्रीमताची सौभाग्यवती बाईसाहेबास बापु नारायण रामदुर्गकर याणी पाठीसी बांधून नीघोन गेले सौभाग्यवती यमुनाबाई गोखले यासी रामचंद्र भोजराव देशपाडे पाछापूरकर याणी पाठसी बांधून साऱ्याच्या माठीमागे तुरफाची दाटी साभाळून दोन कोशापर्यंत मारामारी सोसून झाडीत जाऊन असता फौज येकीकडे जाहाली श्रीमंत येकीकडे व गोखलेबाई येकीकडे याप्रमाणे फुटाफूट होऊन तीन कोशावर मोठा दरा लागला घाट खाली उतरताच पळटण तुरपाची गाठ तुटली तेथे श्रीमताची व बायांची भेट जाहाली नतर दोन रोज झाडीत चालत चालत होत अन्न नाही तिसऱ्यारोजी उमरखेडयास भोजन करून अवढ्या नागनाथाचा धाट उतरून बेरीज मुकाम करून अशरी बऱ्हानपुराच्या रोख होताच देशाची फौज दरोबस्त विसाजीपंत गोखले व सर्जराव घाटगे वगैर याणी इग्रज बाहादूर याचे अभयपत्र आणवून निघोन गेले सौभाग्यवती यमुनाबाई गोखले गगातीरी राहिली श्रीमत दर मजल चालले दोन मुकाम पुढे गेल्यावर निपाणीकर याणी श्रीमत चिमाजी अपास घेऊन श्रीमताचा निरोप न घेता निघोन आले पटवर्धन सोलापूर मैदानात राहिले सर्व सरदार निघोन गेले रामचद्र वेकटेश हुजरात मिळोन हजार राऊत राहिले त्यास घेऊन तापी नदीस मुकाम करून सालज ( ? ) तालुक रास्ते याजकडेस होता माधवराव रास्ते होते त्याणी मेजवानी केली तीन मुकाम जाहाला अशरीच्या कोस बऱ्हानपूर साहा कोश दौवलतरावकड किलेदार सिंदे याजकडील सरदार येऊन भेटून रजे तलेबत राहिले खानदेशात आरब तीन हजार व तोफखाना कादर जमादार होते येऊन मिळाले फौजेचा जम पडला हे वर्तमान ऐकोन दमटीन साहेब बाहादूर याणी वकील पाठवून बदोबस्त करून श्रीमताची भेट घेऊन अले या बरोबर इदुरा नजीक नर्मदेच्या पैलीकडे जात असता अबीचा दंगा पैक्या करिता जाहाला तो ऐवज देऊन उठविला इचूरकर व पुरदरे श्रीमताचा निरोप न घेता पुण्यास निघोन आले छावणीस जाऊन राहिले येक महिना पाऊस लागला नतर श्रीमताकडून वकील रामचद्र भोजराव पाछापूर मलकन साहेब याजकडे जात होते गोखले याची दौलत गारद जाहाली बाई कोठे राहिली न कळे त्यांच्या सरजामाचा मुलूक हवाला

करवितो तुम्हाकडून सरदारास पाठवावे व बापु गोखले यासी दतपुत्र करावे ऐसे सागून दत पुत्रास वस्त्र अलंकार रामचद्र भोजराव यासी वस्त्रे देऊन अलपिष्टन-साहेब बाहादूर याजकडे सनदा देऊन रवाना केल्यानतर पुण्यास येऊन साहेब बाहादूर याची भेट घेऊन हकीकत अर्ज करून घेतल्यावर सौभाग्यवती येमुनाबाई गोखले गगाखेडास होती येऊन सासवडास राहून येक वर्षात दौलतीचा बदोबस्त करून देतो म्हणोन साहेबाचा हुकूम होता नतर मुबईस जाताना जातीचा सरजाम द्यावयास सागून गेले नतर बाई कृष्णातीर नजीक सातार्‍यास येथे येऊन राहिली रामचद्र भोजराव पाछापूरकर बाईचा निरोप घेऊन घरी आले याप्रमाणे गोखले याची दौलत कमाई हकीकत मेहर बुलटन साहेब बाहादूर याणी लेहून देणे या विशी हुकूम केल्यावरून रामचद्र भोजराव देशपाडे पाछापूरकर याणी लेहून दिल्हा असे इग्रज बाहादूर हे धर्म राज्य करीत आहेत याप्रमाणे मागे कोणी केले नाहीत पुढेही करणार नाहीत मागील सरकार नि॥ लोकास योग्य तनसा सरजाम देऊन प्रज्या नीतीनी धर्मराज्य करितात श्रीमताच्या पदरचे सरदार लोकाचे इतमाम व सरजाम चालवितात ऐश्यात गोखलेही इग्रज बाहादूर यांच्या दोस्तीन बहुतच दौलत चालविली अणि लढाई मर्दुमी करून स्वामीकार्यास आल्यामुळे दोस्तदार याची कीर्ति वाढविली असता त्याच्या माग त्याजकडील सरदार वगैरे कामकाज गोखले याज बरोबर करून दौलत बुडाली यावर घरी राहून केवल फक्त जाहाले फारच रोजीच फाके होतात या लोकाची मात्र गैर-नेनेसाहेब याणी दाद केली नाही करणार खाविद आहेत सन १२३५ फसली शके १७४७ सातारा शेहे सत्तेच्यालीस पार्थिव नाम सवछरे पौष्य शुद्ध ५ गुरुवार लिहिला समाप्त.

# छत्रपतींची शके १७३९ तील दिनचर्या टिपणी.



## लेखांक २.

बाजीराव पंडितप्रधान याचे व इंग्रेज बाहादूर याचे वैमनस्व येऊन बिघाड जाला प्रधानपंत पळत फिरु लागले मागे इंग्रेजाची फौज फलटणे लागली पुणियात प्रथम लढाई जाली त्याजवरून श्रीमंत् छत्रपती माहाराज कुटुंबसुधा किले वासोटा येथे नर्क चतुर्दसीचे दिवसी किले सातारा येथोन काढोन नेले तेथोन लष्करात बाजीराव याणी आपले जवल आणून ठेवावे ह्मणजे फंदफितूर होणार नाही या संकल्पाने वासोट्याहून श्रीमंत् प्रताप शाहू माहाराज छत्रपती स्वामी व श्रीमंत भाऊसाहेब माहाराज व श्रीमंत आप्पासाहेब महाराज व श्रीमंत माद्रश्री माईसाहेब यासी घेऊन आपणाजवळ नेले मार्गसीर्ष शुध्ध शष्टीस लस्करात पावले नंतरी लस्करातच स्वारी असता सोलापुराहून कूच होऊन पुढे आष्टी वाळकीचे मुकामी छ १४ रबिलाखर माघ शुध्ध १५ पौर्णिमा शुक्रवारी कूच जाले बिनी गेली भोजन करून स्वारी निघावयाची तो प्रातःकालचे साहा घटका दिवसास जर्नेल स्मित इंग्रेज बाहादूर घोडनदीवर छावणीस होता तो फौजसुधा तुरुक व लयन तोफा घोड्याच्या समत आला या पूर्वी छत्रपती स्वामीची भोजने जाली होती बाजीराव जेवावयास बसले होते अर्धे जेवणांत बापू गोखले याणी बातमी सांगोन पाठविली की इंग्रेज कोश आर्ध कोशावरी आले स्वारी जलद निघोन आंतरा पाडावा मी तोंडावर जातो आजचा समय कठीण आहे सावधगिरीने जलद निघोन जावे आणि बापू गोखले तोंडावर जे समयास स्वार मानकरी होते तितकेच घेऊन गलबलीने निघोन गेले इकडे लष्करात गलबल जाली घाबरेपणे बाजीराव भोजन टाकून डेऱ्या बाहेर आले लस्करात गलबल आरड फार जाला मेणा जलद आणऊन म्यानांत बसून चालीस लागले आणि माहाराजास चलावे ह्मणोन सांगोन पाठविले ही हि स्वारी चालू जाली तो इतकियात इंग्रेज याचा लगट जाला तुरुक पुढे वाढून आले बापू गोखले तोंडावर पाच च्यारसे स्वारानसी गेले होते त्याचा मुकाबला होताच गोखले याणी चालून घेतले त्यात जाऊन मिसळले समई च्यालीस पनास आसामीनिसी जाऊन हात्यार लाविले तो तुरुक स्वाराचा गोशा मिळाला घेरा पडला मागून पाठीवर फौज व कुमक पोहचावी ते न जाले बाजीराव याजबराबर सर्व फौज पळावयास लागली बापू गोखले विरेस येऊन तरवार चांगली

केली जर्नेल खासियावरच उटले तेथे गोरे तीन च्यार मारले सेवटी आडवे बाजूनी एक गोरा खासा याणी पस्तोल मारिला बापूचे छयातीत जोड गोळ्या लागल्या तत्रापि सांभाळोन खासा जर्नेल स्मित याजवर हात टाकिला आणि बापू गोखले ह्मणतात तो मी बोलले उजवे मानेवर जखम केली जर्नेल याणी जर्नेल तो मै ह्मणून हात चालविला तो बापूचे डोईवर जखम लागोन खपरी डोईची फुटली त्यानी घोड्याखाली आले प्राण सोडिला पुरे जाले बराबर उरले त्यापौ जखमी काही जाले काही ठार जाले घोरपडे दोघे खंडेराव व गोविंदराव व आनंदराव बाबर ऐसी चांगलीच माणसे पडली दुर्गसिंग मोहिते ( हंबीरराव ) यास दोन जखमा लागल्या काही उधळले[1] नंतरी तुरुक स्वार डावे उजवे दोन तुकड्या करून वाढले पाठीस लागले व लयन व घोड्याच्या तोफा ऐसे काला पर्जन्याचा ढीग येतो ऐसे पाठी-मागे दिसो लागले दोन प्रहरचा समय उन्हानी संगीना चकाकू लागल्या जवळ पिछयावर येऊन भिडले तेव्हा आप्पा निपाणकर सर लष्कर बाजीराव याचे म्याना-जवळ येऊन रागे भरला की हा समय म्यानात बसावयाचा नव्हे तेव्हा उतरून घोड्यावर बसले आणि माहाराज छत्रपती स्वामी व भाऊसाहेब माहाराज व आप्पा साहेब माहाराज यास हि घोडयावर बसविले आणि भरधाव घोडी हाकावयास लागले जवळ बराबर पंचवीस तीस हजार फौज पळती परंतु एकासहि मागे फिरणे हिया होईना फिरेनात तरवारीची मेणे न काढता पळत भालेकरी याणी भाले टाकून दिल्हे भरधाव पळण्यांत आतफागिरे म्याने पालख्या वगैरे ज्यास जे वोझे जाले ते टाकीत चालले तो लगट फारच जाला या त्रिवर्ग खाशास पुढे घालून बाजीराव पाठीसी चालले तो मातुश्री माईसाहेब माहाराज म्यानात होती तो मेना मागे राहिला याजमुळे माहाराज याणी घोडयास हात घालोन माई राहिली त्याची वाट काय ह्मणतात तो म्याना येऊन पोहचला यमा बनकर खिजमतगार याज-बराबर बाजीराव याणी आपला घोडा बसावयास माईसाहेबास पाठविला याजवर बसून जलद चलावे मेना आता निभत नाही तेव्हा मातुश्रोनी उत्तर केले की आगोधर घोडी मागितली तेव्हा आह्माविसीच मात्र दुष्काळ पडिला होता आता या घोडयाचा हास भास मला नाही आपलेच घोडीवर बसून येतो ह्मणून बोलोन बहुतच रागे भरून घोड्यावर बसली शामराव व बाळाराव रास्ते मागे चालू

---

टीप १ मूळांत हंबीरराव या शब्दाभोंवती टिंबें दिलेली आहेत.

लागले जलद चला ऐसा धेगा करू लागले तेव्हा माईसाहेबानी पुसिले हे कोण आहेत तो राघोपंत जोसी नि॥ बाजीराव याणी सांगितले की रास्ते आहेत इतके दिवस मागे चालण्यास कोणी नहुते आता कोठून आले ऐसे बोलताच रास्ते तोंड चुकाऊन पुढे गेले माईसाहेब यास त्रिवर्ग महाराज पुढे चालले ते गर्दीत दिसेनात त्याजवरून फारच रागे भरली तिघाची भेटी लौकर करा ते बाजीराव याणी ऐकून सेखू खैरा खिजमतगार यास पाठविले आणि त्या बराबर निरोप पाठविला की य समई मजवर मर्जी प्रसन्न असावी दोन कोश संभाळून गेल्यावर मी विनंत्या करून सर्व स्वामीचे पुढे ठेवितो तो त्रिवर्ग महाराज याची गाठ पडली तो गर्दीचा समय लगट फारच जाला बाजीराव याणी आपले बायकोस छिटाचा आंगरखा व पायजमा घालून डोईस रुमाल बांधविला होता तिजला व ढमढेरे वगैरे याच्या दोन चार बायका यास घोड्यावर घालोन जवळच चालविल्या असेत ज्या बाजूनी इंग्रेज या कडील तुरुक जवळ दिसेत तो मार्ग सोडोन डावे उजवे पळता वाट नाही नांगरटी व वोढे व कर्डीची सेते भडोला भारी याजमुळे घोडी व माणसे फार हैराण होत तो येक तोफेचा गोळा येऊन पडला त्याणी फारच गलबल जाली फिस्तूल गोळ्या येऊ लागल्या घोड्या हात्तीस व माणसास लागू लागल्या या गलबलीत माईसाहेब यांची घोडी फारच ज्याहाली करू लागली घोडी आटपेना आणि इंग्रेजा कडील स्वार फारच संन्नीध येऊन पोहचले तेव्हा भाऊसाहेब माहाराज याणी माईसाहेब यासी आपली घोडीवरी घेऊन शालनामेचे रुमालाने पाठीसी बांधिली माईसाहेब बसिली होती ती घोडी आमल मागे राहिली सो तुरकानी पाडून नेहली घोड्यावरून उतरून बसण्यास आवकाष पडिला तो बाजीराव लांबले जवळ स्वार सुधा कोण्ही उभे राहिले नाही तो तुरकाचे गोसे समीप येऊन पोहचत चालले तसेच धावत असता पाईच्यास व स्वार यास गोळ्या लागून माणसे मरू लागली राघोपंत जोसी निसबत बाजीराव व दाजीबा कोलसकर नि॥ कासीपंत बादरे हे बाजीराव याजकडून राहणेस होते तेहि सोडून पळावयास लागले दाजीबा गेलेच तो त्याचे पुढे गोळीनी एक मुडदा पडल तो पाहाताच पुन्हा माहाराजाजवळ मागे फिरोन येऊन बोलिला जे जवळ कोण्ही उ ले नाही इंग्रेज सभवते मिळाले घेरा पडिला आता कोठवर पळावे पळून जीव बच्यावत नाही पळून व्यर्थ मरू नये बाजीराव याणी आपली आस्ता सोडिली त्यास घोड्यास हात घालून उभे राहावे ते समई सरकार पो बळवंतराव मल्हार व यशवंतराव

मल्हार चिटनिवीस उभयता बंधू व भीवराव विठल पोतनीवीस व आनंदराव केशरकर आजह्यात सरदेशमुख यांस गलबलींचे समयीं जवळ असावे सोडू नये ऐसे सांगितल्यावरून जवळ चालले होते पैकी केशरकर त्या गलबलीत उधळले चुकले पोतनीस यास आज्ञा केली जे बाजीराव याजकडे जाऊन सांगावे जे आह्मी येकटे राहिलो आह्माजवळ कोण्ही नाही माईसाहेब फारच घावरी जाहाली तुरुक जवळ भिडले तुह्मी येऊन अथवा फौज पाठवून काढून न्याहावे ऐसे सांगोन पाठविले ते बाजीराव याजपासी जाऊन मिसळले बाजीराव हि न फिरेत व फौज हि न ई तेव्हा घोड्यास हात घालून उभे राहाताच दोन हजार तुरुक माहाराजावर नागव्या तरवारा व पेस्तुल बाा गोळ्याचा भडीमार करीत लाऊन जवळ आले हे पाहाताच बळवंतराव चिटनीस घोडियावरून उतरून धावून जाऊन हाक मारून नांव सांगोन बच्याव होई तो अर्थ करावा सांगितले त्याजवरून चिटणीस घोडीवरून उडी टाकोन पाय उतारा होऊन धाऊन गेले तो पुढे तुरकातून पाच च्यार स्वार वाढले होते त्याजवळ जाऊन पोहचून पुकार केला की छत्रपती महाराज सातारकर उभे आहेत गोळ्या घालू नये व गर्दी होऊ नये ऐसे बोलताच सेख बडे हवालदार व सेख बडे मकदुम व महमदयुसुफ पाचवे तुरबापैकी व मेजर दपटीण सरदार चिटणीस याजवळ येऊन पोहचले सच्या बात ह्मणोन पुसोन हातावर हात घेतला तो गर्दी माहाराजावर जाली हे पाहाताच साहेबास दाखविले तो साहेबानी तरवार आपले आंगाभोवती फिरवली तो दोन हजार तुरकानी एकदाच तरवारीस मेणे केली दूर होऊन भोवताली घेरा दिल्हा मेजर दपटीण माहाराजाजवळ येऊन माहाराज यांचा हात धरिला आणि सातारकर सच्चे ह्मणोन पुसिले मेजर दपटीण यांचे आंगावरी दुपेटा भारी होता तो घातला हवालदार शेख मकदुम यास हातातील आंगठ्या व शाल नामी रुमाल दिल्हे मेजर दपटीण बोलिला जे आप कूच डरना नहीं आब कुच फिकीर नही सातारा तुह्मारा है और गादी तुह्मारी है हम तुमारे है ऐसे बोलोन दिलदिलासा दिल्हा आणि हातातील तरवारा नागव्या होत्या त्या घतल्या माहाराजाचे मणगट धरिले होते ते जरनेल याची भेट होई तोपर्यंत सोडिले नाही तेथेच उभे राहिले तो बाजीराव याजकडील हात्ती आंबारीचे व चौघड्याचे व निषाणाचे व खुले वोळून आणले ते माहाराजाजवळ हजर केले

टीप १ येथें 'खंडु सिंदे त्यावर धावले महाराजानी मागे फिरविले एकट्यानी काय करणार नंतर' इतके शब्द मागाहून दोन ओळीमध्यें घातले आहेत.

मोठा समय परम दुर्धट परंतु ईश्वरे व माहाराजाचे पुण्य प्रतापे खैर जाले ते समई जवळ आसाम्या ठरल्या होत्या त्याची नावे बि॥ तपसील

२ चिटणीस आसाम्या

१ बळवंतराव मल्हार

१ यशवंतराव मल्हार

---

२

१ राघोपंत जोसी निसबत बाजीराव

१९ हुजरे वगैरे मंडळी

| | |
|---|---|
| १ गोदाजी | १ बापू जाधव |
| १ खंडू सिंदा | १ विठू जाधव |
| १ कोंडी भोसला | १ जोती जगथाप |
| १ माहादू सूर्यवंशी | १ जोती ढेंबरा |
| १ मुरारी रेणूशा | १ धोंडी घोरपडा |
| १ धोंडी बनवाडकर भो | १ सिदू वालकर |
| १ बारगीर नि॥ निंबाळकर वाठारकर | १ दारकू बायेको |
| १ राघू मोतदार | १ संकू मोतदार |
| १ आन्या मोतदार | १ बहिरु मोतदार |
| | १ इंगु मोतदार |
| ९ | १० |

---

**१९**

माहाराज सापडल्यानंतर मागून हाती वळून आणिले त्याजवर आसाम्या होत्या त्या

| | |
|---|---|
| १ बळवंतराव भो चतुरसिंगाचे पुत्र | १ आबाजी बुढा |
| | १ |
| १ पांडोबा वैद्य सिषा बाजीराव याचा | माहात हातीवरील |

२ स्वारी माघारी फिरल्यावर गव्हात लपून बसल्या होत्या आसाम्या त्या

१ संभू मुदबखी
१ गोपाई मुदबखीण
———
२

याप्रमाणे आसाम्या व खासे च्यार इतके राहिले ऐसी गुजरून गेलियावरी बिलिमोर साहेब जर्नेल स्मीत याचा कारभारी येऊन पोहचला भेटोन पाहून जाऊन जर्नेल स्मीत यास कळविले माहाराज यास घेऊन जर्नेल मागे होते त्याकडे मेजर दपटीण चालले हाती व उंट बि॥

| | | |
|---|---|---|
| १ आंबारी समवेत | २ चौघडयाचे | २ उंटावर नवबती |
| १ हावता समेत | ८ खुले | लंग |
| —— | —— | —— |
| २ | १० | २ |

———
१४ ✓

हात्तीवर बळवंतराव भोसले होते ते वोलखून उतरून घेऊन घोडयावर बसविले माईसाहेब यास आंबारीत बसावे ह्मणून मेजर दपटीण याणी विनंती करून बसविली खवासियात भाऊसाहेब महाराज बसले स्वारी चालली तो जर्नेल जखमी म्यानात होता तो पुढे येऊन म्यानातून उतरून टोपी काढून सलाम केला भटल नंतर आष्टीवाळको वरच त्याच तळावर मुकाम जाला तेथे लष्करातच स्वारी उतरविली खुसीच्या तोफा करावयाचा हुकूम बिलिमोर साहेब येऊन पुसोन तोफाची सरबत्ती जाहाली बाजीराव वगैरे सर्वांचे खटले लुटले गेले फार नाष जाहाला कोटी रुपयाचा विशय इंग्रजास सापडला माहाराज सडे घोडयानसी काही एक सामान नाही तेव्हा लुटीपो सत्रा उंट लादल्याले माहाराजाकडेस दिल्हे ते नेऊन डेरे उभे केले नंतर विसाजीराम नि॥ जर्नेल यास समाचारास पाठविले त्याणी साखरपाणी आणिले ते सर्वांनी घेतले नंतर बापू गोखलियाचा मुरदा डोलीत घालून आणिला तो वोलखण्यास कोण्ही पो ह्मणोन जर्नेल याणी निरोप पा। त्याजवरून बळवंतराव चिटणीस यास पो ओळखून आले फक्त आंगराखा आंगात

मलमलीचा उरला होता घोडयानी तुडिविले त्याणी पायाचे कातडे गेले होते दोन जखमा लागल्या होत्या पहिले जखमेचा डोळा उघडा होता याप्रो पाहून आल्यावरी गोखले याचे मुरद्याची डोली व आंताजीपंत हजरनीस नि॥ गोखले जखमी ऐश्या दोन डोल्या माहाराजापासी डेऱ्याजवळ पा माहाराजानी व सर्वत्रानी पाहून वोलखल्यानंतर आग्न देण्यास हुकूम देविला शोभने वगैरे मिळविता च्यार घटका रात्रीस वोढ्याचे कडेस नेऊन आग्न दिल्ही चार घटका दिवस अस्तमानाचा राहता जनैल स्मित साहेब व विलिमोर साहेब ऐसे माहाराजाचे डेरियास आले खुरशा मांडून बैसले खुर्सी वगैरे बोलणे जाले नंतर काय मर्जी बोलले त्यास इकडून उत्तरे केली कलमे तपसील

१ तुमची आलपेष्टाण आगोधर भेट जाहाली सर्वत्र लाहान थोर पळाले आमची घोडी लाहान होती ऐशे नाही परंतु पूर्वसंकेत उमजून तुमची फौज पाहताच बाजीराव याची संगत तुटताच घोडयास हात घालून उभे राहिलो त्यास आलपेस्टण याची भेटी लौकर व्हावी

१ बाजीराव पाहिजे तसा तह कुटुंब देऊन करील आणि आह्मास मागील त्यास त्याचे हाती न द्यावे हे वचन पके असावे

१ आमचे बोलणे तुह्मी मुरबी होऊन आलपेष्टण यासी बोलावे त्याची उत्तरे त्याणी केली

---

२

१ बाजीराव याचे हाती आमचा प्राण गेल्याविना जाल आसे घडणार नाही हे वचन पक्के

१ आलपेष्टण साहेब याची भेट होणे जलद तरी पुणियास स्वारी चलावी दिरंगानी भेट घेणे तरी सातारियास स्वारी चलावी तेव्हा जलद भेट होईल तिकडे येणे करावयाचे हे ठरून पुण्याचे रोखे कूच ठरले

१ मुरबी होऊन बोलाने त्यास आह्मी सिपाई फक्त तत्रापि आंतर करणार नाहीं

---

३

एकूण कलमे तीन उत्तर प्रतिउत्तर केले आणि निरोप घेऊन डेऱ्यास गेले राजश्री बाळाजी नारायण नातू यास पत्र लष्करात येऊन दाखल जालीयाचे व पूर्वसंकेत राजकारण दर्शऊन आलफिसतन याचे लष्करात जर्नेल याचे लष्करातून डाक होती त्यात रवाना केले जर्नेल याजकडून खर्चास रुपये २०० दोनसे आले जवाहीर पेटी व भांडी रुप्याची माईसाहेब याजकडील भवानी बिन सेटी खडसरे देवपूजे याजवळ घोड्यावर होते ते गर्दीसमयी धावता सावधगिरी करून उतरून सेटफळचे रानात वावरात पेटी पुरून ठेविली व भांडीं वगैरे कबज्यात लपवून ठेविली ते सेतकऱ्यानी पाहिले ती भांडी नेली पेटी मात्र राहिली पुढे भवानी गेला तो लुटला एक चोलण्यानिसी राहिला स्वारी इंग्रजाचे लष्करात आहे ऐकून सहा घटका रात्रीस पठाणास शंभर रुपये कबूल करून माहाराजास नेऊन भेटवा मी त्याचा आहे बोलला त्याणी आणून गुजरला नंतरी भवानीनी वर्तमान सांगितलेवरून ते समयी त्याजबराबर स्वार पनास देऊन पाठविला त्याणी सेटफळचे रानात जाऊन जाग्याची वोलख धरून पेटी काढून आणिली भांडी मात्र गेली आला परत नंतरी भोजने जाली यावरी बक्षीस दिल्हे बि॥

३ बळवंतराव भोसले

१ तिवट
१ शालजोडी
१ आंगरखा मलमली

——

३

५ बळवंतराव चिटणीस

१ तिवट तांबडे पैठणी
१ शालजोडी
१ मलमली आंगरखा
१ मलमली पायजमा
१ हात रुमाल

——

५

५ भवानी बिन सेटी देवपुजे

१ तिवट
१ धोत्र रेसीम काठी
२ हिरेची आंगठी
१ निळेची आंगठी

२ यशवंतराव चिटणीस

१ तिवट
१ दुपटा

——

२

येणे प्रमाणे बक्षीस दिल्हे चिटणीस यास निषाण सूज्ञ आसा किताब व अष्टप्रधाना बराबरी सत्कार मरातीब बक्षीस वचन दिल्हे साखर खैर जालियाची कोणा एकास न लागता बचाव जालियाची श्री देवास काढून सर्वास दिल्ही यजमानी स्वीकारिली याप्रमाणे प्रथम दिवस माघ शु॥ पौर्णिमा शुक्रवार शके १७३९ ईश्वर नाम सवत्सरे सु॥ समान आशर मया तैन व आलफ

माघ वद्य प्रतीपदा मंदवारी कूच प्रातःकाळीच होऊन दाहा घटका दिवसास मुकाम करकंब येथे जाला हात्तीवरील निषाण करावे ऐसी योजना बोलून करकमचे बाजारातून सेला पागोटे आणून भगवे रंगवून निशाण तयार केले शंभर रुपये खर्चास आले

माघ वद्य द्वितिया रविवार ते दिवशीं मुकाम करकंब येथेच जाला प्रातः-काळी उठोन मुखमार्जन जाले ते समयी भाऊसाहेब महाराज जवळ होते बळवंत-राव चिटणीस यासी आज्ञा केली की तुह्मास आष्टप्रधानातील पद द्यावयाचे बक्षीस त्यास कोणते द्यावे विवंचना चर्चा करिता सुमंत पद याचे नकल जाले रिकामे आहे हे तुह्मास दिल्हे मर्जी जोगे होताच करावयाचे याप्रमाणें बोलणें विनंति न करिता प्रसन्नतेने वचन बोलले आस्तमानी उदईक कूच करावयास हुकूम पुसोन बिलिमोर गेले

माघ वद्य सोमवार त्रितिया प्रातःकाळी कूच जाले ते समयी निषाण नवे केले त्याची पूजा करून दक्षणा व इनाम वाटून आरणोदई हात्तीवर निशाण दिल्हे दाहा बारा घटका दिवसास मुकाम आकोले नजीक टेंभुरणी येथे जाला निशाणा-बराबर चालावयास मोगले स्वार जर्नेल स्मित याणी दिल्हे ते नित्यशा चालू लागले खर्चास रुपये १०० शंभर आले जर्नेल याजकडून बिलिमोर आले आणि बोलले की साहेबाचा मनोदय आहे की ढाल, आपली तयार करवावी बाहुटा आमचेत ह्मणतात मोठे माहत्म बाहुट्याचे त्यास लौकर तयार करवावे आणि उभा करणे आह्मास कळवून करावा करवितो ऐसे उत्तर जाले इकडून बोलणे जाले जे भेटीचा सिलसिला गावगन्ना साडे नऊ रुपये घेण्याचा आहे याचे कसे करावयाचे ह्मणून चिटणिसास बोलावयास सांगितले वरून बोलले त्याणी उत्तर केले की सांप्रदाया-प्रमाणे आपण गावगना घेत जाणे बोलले त्याप्रमाणे इकडून प्रारंभ जाला इंग्रेज भेट घेत होते ते आपले मना करून भेटी सुधा सर्व इकडे त्याजकडे आले सुधा

आपण न घेता देऊं लागले इकडून मात्र दर गावगनाचा ह्मडेनिसी एक रुपया प्रमाणे पाववीत गेले सदाशिव माणकेश्वर याकडील कारकून टेंभुरणीहून फडफर्मास घेऊन येऊन नजर केली बाजीराव याणी बहुत उपसर्ग केला वगैरे वृत्त सांगोन गेला प्रातःकाली कूच व्हावयाचा हुकूम पुसऊन नेला

माघ वद्य चतुर्थी मंगळवारी प्रातःकाळी कूच होऊन दहा घटका दिवसास हिंगणगाव भीमातीरी मुकाम जाला बिलिमोर येऊन विनंति केली की नदी पाणी आहे त्यास उद्या मुकाम येथेच व्हावा ह्मणजे लस्करचे सिपाई लोक व सोजर लोक नाहातील हुशार होतील मग जसा हुकूम तसे करू त्याजवरून मुकामचा बेत ठरला

माघ वद्य पंचमी बुधवारी हिंगणगाव मुकामी आस्तमानचे सहा घटका दिवसास बिलिमोर येऊन पुसिले की ढाल तयार जाली आसल्यास उभी केव्हा करावयाची त्याजवरून त्यास सांगितले जे तयार जाली आहे उभी करावयाचा हाच समय आहे त्याजवरून त्याणी विनंति केली की जर्नेल स्मित व सर्वत्र साहेब लोक बाव्हटा उभा करितानी येणार व तोफा मारावयाच्या त्या किती माराव्या हुकूम व्हावा त्याजवरून तेवीस तोफा माराव्या सांगितले नंतर साहेब लोक आले नावनिसी बिो

| | |
|---|---|
| १ जर्नेल स्मित साहेब | १ हटक्यासल साहेब |
| १ | १ मेजर दपटाण साहेब |
| १ कपतान मेण साहेब | १ शाप साहेब |
| १ बिलिमोर साहेब | ——— |
| ——— | ३ |
| ४ | १ विसाजी रामाजी नि॥ जर्नेल |

येणे प्रमाणे येऊन तोफा ढाले पासी आणून ढाल उभी दोन घटका दिवस राहाता उभी करिते समयी बळवंतराव चिटणीस याजकडून ढालेची पूजा करऊन माहाराज डेऱ्याबाहेर उभे राहिले होते सर्वत्र साहेब लोक जवळ उभे राहून समारंभे ढाल पूर्वाभिमुखे उभी केली तोफा तेवीस केल्या नंतर डेरियात साहेब मंडळी येऊन बसले आणि भाषणे केली बि॥ तपसील कलम

१ आलपिष्टन साहेब याची पत्रे बहुत खुसी जाली आज आपले निषाण उभे राहिले लाट साहेबास हि बहुत खुसी होईल लिहिली गेली आहेत आलपिस्टन साहेब सामोरे येऊन भेटी समारंभ होईल

१ आपण राज्य करितील जो आपला मुलुक यात बाजीराव याचा हात सिरू देणार नाही आपण खावंद या उपरी आता काही फिकीर नाही सातारियास जाऊन तख्तावर बसून राज्य करावे बाजीराव याचा कदापि आपणास इजा लागणार नाही तो राज्यांत येऊ पावणार नाही

१ बाजीराव याचा तह या उपरी होणार नाही आपण काळजी तिळमात्र करू नये

---

३

याप्रमाणे वदणूक करून टोपी काढुन खुरसीवर बसणे बंद करून भुईवर सांप्रदायायुक्त बसून येक दुभासी स्पष्ट बोलणार साहेब यासी इंग्रेजी जर्नेल बोलोन इकडे हिंदुस्थानी व मराठी भाशेनी बोलावे इकडील बोलणे जर्नेल यास समजावे याप्रमाणे बोलणे जाले बाजीराव याकडील दोन असामी सिष्ये आहेत ते घालून द्यावे हे सर्व पाहिले वृत्त बाजीराव यास सांगतील ह्मणजे बाजीराव आपले दिलात समजेल की राजे साहेबाची व इंग्रजाची दोस्ती जाली व फौज सरंजाम सर्व दाखवून निरोप द्यावा जवळ ठेऊन एखादे समई विस्वासानी जिवास दगा करितील तरी लौकर घालवावे त्यास खर्चास देऊन वाटे लावावे बोलले नंतर विडी खिचिडी वगैरे देऊन निरोप दिल्हा सचीवपंत याजकडील कारकून हरीपंत कोकणस्त समाचारास पंतानी पाठविला तो येऊन भेटला एक दोन रोज होता निरोप घेऊन गेला इंदापूरकर देवराव लपेटे देशमुखीचे वतनाचे गुमस्ते त्यांचे नातू कृष्णराव मेघशाम येऊन भेटले नजर केली त्यास दुपटा घातला त्याणी पाचसे रुपये नजर करार करून निमे ऐवज देऊन फड फर्मास गुजरून स्वारी इंदापूरपर्यंत समागमे होते मग गावी राहिले इंग्रजाकडून खर्चास रुपये एक हजार आले

गुरुवारी शष्टीस प्रातःकाळी कूच होऊन दाहा घटिका दिवसास मु॥ वाडी हासुरणी येथे जाला इंग्रेजाकडील मोगली स्वार बाजूनी लांबून चालले होते ते पुढे

वाढले दुर्बीण लाऊन पाहाता गनीमाकडील स्वार ऐसा संषय येऊन तोफा वगैरे सामान त्याजवर चालून गेले तो आपले स्वारास वोळखिल्यावरी त्या स्वाराच्या सरदारास गैरशिस्त चालल्यामुळें बहुत इजा दिल्ही नित्य पाठ इंग्रजाकडील साहेब लोक अथवा कारकून बोलण्यास येणे तो सर्वत्र त्रिवर्ग खासे व मातुश्री बसली ह्मणजे जे बोलणे ते बोलावे उत्तरे प्रतिउत्तरे मातुश्रीनी करावी ही वडील तेव्हा मधी तोंड घालोन छत्रपती स्वामीस बोलता नये याजमुळें सर्व मुख्तियारपणा व बोलणे तारीफ सावधगिरी याची पडू लागली ते पुढे चालीस नीट नव्हे व इंग्रेजामधी धर्म जो प्रथम किता ती चाल चालणार याजवरून बळवंतराव चिटणीस याणी आबाजीपंत नि॥ जर्नेल यास ममतेत घेऊन बोलोन जे बोलणे कामाचे असेल ते माहाराजासी वेगळे बसून बोलणे होत जावे वगैरे रिकामे बोलणे मंडपशोभार्थ ते सर्वत्रात व्हावे याप्रमाणे किता ठरावा ऐसे ठराऊन बिलिमोर यासी बोलोन जर्नेल यासी बोलोन ठराविले नंतरी स्वारीत चालता एकीकडे मार्गातच आबाजीपंताचे बोलणे माहाराजाचे करून देऊन परस्परे ऐक्यभाव जाला याप्रमाणे बिलिमोर याचे होऊन खलबतास राहुटी वेगळी नहुती बळवंतराव चिटणीस याचेच राहुटीत बैठक गादी नेहमी असावी त्याचे येणे जाले ह्मणजे तेथे यावे माहाराजानी तेथे यावे बोलणे होऊन मग सामोपच्याराचे थोरले कचेरीत डेऱ्यात व्हावे याप्रमाणे होऊ लागले हे मातुश्रीस फार असाह्य जालें परंतु पुढे मागे नीट नव्हे राजकारणास लोभ धरून फल काय याजकरिता याप्रमाणे यजमानानी केले व करविले

माघ वद्य सप्तमी शुक्रवार छ २१ रोज प्रातःकाळीकूच होऊन बारामतीस मुकाम जाहला डेरियास स्वारी जाऊन नंतर श्रीसिद्धेश्वरास दर्शनास स्वारी गेली देवालयातच ब्राह्मण भोजनाची तरतूद करवून स्नान देवालयातच जाले श्रीसांबाची पूजाकरून काळे याचे देवीचे दर्शन घेऊन श्रीविठोबाचे व मोरोपंत याचे ग्रहाचे दर्शन करून दक्षणा ठेऊन स्वारी परत भोजनास डेरियास आली ब्राह्मण भोजन शंभर पात्र जाले खेरीज भुईसी शंभर रुपये दिल्हे आबाजीपंत नि॥ जर्नेल याणी विनंति केली की जी स्वामीची आज्ञा व मर्जी तसे वागलो कोणाचे मर्जीचा दरकार ठेवीत नाही त्यास सरकारानी कृपा करून येक घोडी मला बसावयास बक्षीस द्यावी बळवंतराव चिटणीस याचे वचन विनंति करून देववितो गेले त्यावरून व मर्जीपसंत वागणूक याजवरून बळवंत-

राव चिटणीस याची घोडी चालला बरी होती तीच त्याणी मागितल्यावरून बक्षीस दिल्ही

माघ वद्य अष्टमी शनवार छ २२ रोज प्रातःकाळी कूच होऊन जळगावी मुकाम जाला स्वारी चालतानी बिलिमोर याजवर मर्जी भाऊसाहेब माहाराज याची प्रसन्न होऊन हिऱ्याची आंगठी हातात होती ती बिलिमोर यांचे हातात घातली माघ वद्य नवमी रविवार छ २३ रोज प्रातःकाळी कूच जाले नाही जळगावीच मुकाम जाला तृतीय प्रहरी बिलिमोर आले होते खुसी पुसून गेले.

माघ वद्य दशमी छ २४ रोज सोमवार प्रातःकाळी कूच होऊन मोरगावी मु॥ जाला डेरियास स्नानसंध्या उरकून स्वारी गणपतीचे दर्शनास गेली ब्राह्मण भोजनाची तरतूद आंताजी माहादेव माहाजनी यास सांगून तेथेच करविली ब्राह्मणास देकार पंचवीस रुपये देऊन भोजनास डेरियास आले प्रसाद तेथेच आणविला इंग्रजाकडून खर्चास हजार रुपये आले

माघ वद्य एकादशी छ २५ रोज मंगळवार प्रातःकाळी कूच जाले नाही मु॥ मोरगावीच जाला

माघ वद्य १२ छ २६ रोज बुधवार प्रातःकाळी कूच होऊन मु॥ बेलसरास जाला आलपिष्टन साहेब व बाळाजीपंत नातू सिव्हगडाहून सडे लस्करात आले तोफा जाल्या नंतरी त्रितीय प्रहरी दर्शनास येतो ह्मणून सांगोन पाठऊन डेरियास आले सामोरे बळवंतराव चिटणीस यास पाठविले साहेब लोक भेटीस आले बि॥

| | | |
|---|---|---|
| १ आलपिष्टन | १ रसूल साहेब | १ ग्राट साहेब |
| १ बाळाजी नारायण नातू | १ जर्नेल स्मित साहेब | १ समागमे बिलिमोर साहेब |

डेरियात येऊन टोपी काढून सलाम करून बसले खुसी मिजाज आछी पुसिले माहाराजाचे नसीब थोर लढाईचे समयी गर्दी आसता कोणा एकास न लागता लस्करात स्वारी आली आता काळजी नाही आपले वर्तमान सर्व लाटसाहेबास लि॥ गेले त्याचीहि पत्रे येतच होती त्यास फार खुसी होईल हाली रसूल साहेब लाटसाहेबाकडे रवाना करितो सर्व तेथोन बंदोबस्त होऊन येईल याजबरोबर

आपण निरोप सांगोन पाठवावयाचे आसलियास पाठवावे हे बोलतील याजवर उत्तर माहाराजानी केले जे आमचे लाट वगैरे सर्व तुह्मीच सर्व मजकुर जर्नेल यासी बोललो तुह्मी पाहिजे तसे करावे तुमचा सर्व भरवसा जाणोन घोडियास हात घालोन येऊन मिळालो पेशजीपासून आपले राजकारण केले आमचा पक्का अभिमान तुह्मास आमचे मनाजोगा बंदोबस्त होणे होईल ही खातरजमा आहे त्याणी उत्तर केले की मोठी खैर जाली शाबूत स्वारी आली हा आह्मास बहुत खुसी आता कोणतेहि चिंता नाही वासोटियास स्वारी बाजीराव याणी नेले व आगोधरचा ऐसे निरोप माहाराजाचे चिटणीस याणी येऊन सांगितले ऐसे बोलले जाहीरनामा पूर्वीच केला आहे तो बाळाजीपंत येऊन वाचून दाखवितील आज प्रथम भेट आहे ह्मणून बोलोन निरोप घेऊन गेले नंतरी एक घटकेने बाळाजीपंत नातू पुन्हा आले आणि जाहीरनामा वाचून दाखविला आज उद्या मुकाम आहे या मुकामावरून जर्नेलसाहेब फौजसुद्धा बाजीराव याचे पिछावर जाणार वर्तमान कळविले त्याजवर सरकारानी उत्तर केले की जर्नेल यास मेजवानी जाहाली नाही साहित्य मेजवानीचे समागमे नाही सातारियाहून आणवून मेजवानी करून निरोप देऊं त्यास बाळाजीपंतानी उत्तर केले की जाणे निकड आहे ये समयी तसा निरोप द्यावा बोलोन राहुटीस गेले नंतरी अस्तमानी बळवंतराव चिटणीस यास बोलाऊन नेऊन सांगितलें की साहेब याचे ह्मणणे मी आता वारंवार येईन परस्परे सर्व मनोदय पूर्ण होतील इतके व्हावे हे मनात माहाराजाचे आले तेच मेजवानी भरोन पावलो फार फार खुसी जाली रानात येथे येते समई उभयपक्षी कोणीकडेचहि सामान नाही मर्जीस असलियास एकादी आंगठी हातातील द्यावी मी हातातच ठेवीन ऐसे बोलले व जाणे त्वरा त्या अर्थी असा बेत ठरवावा सांगितलेवरून सातारियाहून व पुणियाहून सामान मेजवानीकरिता आणावयास रवाना केले परंतु समयास येऊन न पावले सर्वोत्तम बाबूराव अमात्य आलपिष्टन याचे भेटीस सिंव्हगडावर गेले होते ते आलपिष्टन समागमेच आले त्याची भेट घ्यावी सांगोन ठविले त्याजवरून अमात्य येऊन नजर केली सदाशिव भगवंत याणी नजर केली समागमेच होते परंतु बाळाजीपंत याचे लगतेस उतरेत माघ वद्य त्रयोदसी छ २७ रोज गुरुवारी तृतीय प्रहरी आलपिस्टन जर्नेल यास निरोप देववण्यास घेऊन महाराजाकडे आले मिठाई व हारतुरे व विडे अत्तर गुलाब आस्ते पदार्थी होते तो समारंभ जाला जर्नेल यास हिऱ्याची आंगठी व पाचेची पोची मोत्यानी गाठली

होती ती थोर ऐसे सरकारानी आपले हाते हातात बांधली आंगठी बोटात घातली व बिलिमोर साहेब त्याचे कारभारी याजला माणकाची आंगठी दि्ल्ही बहुत खुसीची बोलणी परस्परे जाली जरनेल फारच योग्य थोर माणूस बहुत सरकारचे मर्जीस जपले तेणेकरून ममता फार पडली जातात याजवरून काही मर्जी खिन्न परस्परेहि जाली निरोप दिल्हा नंतरी अस्तमानी विसाजी रामाजी कारकून नि॥ जर्नेल निरोपास आले त्यास तिवट एक व शालजोडी पिवळी दिल्ही रामजी जासूद नि॥ जर्नेल यास तिवट दिल्हे

माघ वद्य चतुर्दसी छ २८ रोज शुक्रवार प्रातःकाळी कुच झाले. जर्नेल याचे कूच होऊन बाजीराव ह्याचे पिछावर गेले. सरकारचे कुच झाले ते वीर येथे मुकाम झाला मार्गी येतां श्री जेजुरीस देवदर्शन केले शंभर रुपये देकार ब्राह्मणास दिला आलपिस्टन यानी इकडील उस्तवारील समाचारास ग्राट साहेब नेमून दिल्हे वीर येथील कुलस्वामीचे दर्शन केले.

फाल्गुन शुद्ध प्रतिपदा छ ३० रोज रविवार वीर येथेंच मुक्काम जाला. त्रीतीय प्रहरी आल्पिस्टन साहेब डेऱ्यास कचेरीस आले. दोन घटका बसले होते. खुशी वगैरे परस्परे बोलणे जाले. विडे आत्तर होऊन गेले.

फाल्गुन शु॥ द्वितीया सोमवारी छ १ जमादिलावल कूच प्रातःकाळी होऊन माणकीवर मुकाम जाला. तेथे सर्व फौज आल्पिस्टन याची सिंव्हगड घेऊन आले. जर्नेल प्रछक साहेब आले. त्याचे भेटीचा समारंभ बहुत तारफीचा लयन बांधून तरतुदीने जाली. मेंढ वाद्य बाजा फारच चांगला तो बाजा करून दाखविला. तोफा २१ एकवीस जाल्या. दोन घटका समारंभ जाला नंतर डेरियास स्वारी आली दोन हजार रुपये खर्चास आले.

फाल्गुन शु॥ तृतीया मंगळवार छ २ प्रातःकाळी कूच होऊन पुन्हा जेजुरीवर मुक्काम जाला तृतीय प्रहरी आल्पिस्टन डेरियास कचेरीस आले. दोन घटका बसून खुशी बोलोन गेले.

फाल्गुन शु॥ चतुर्थी बुधवार छ ३ प्रातःकाळी कुच होऊन भीवरी नजीक पुरंधर येथे मुकाम जाला जाता मार्गी सासवडाजवळ स्वारी पावली तो गढी पुरंधरेयाची सासवडी होती तेथे आबा पुरंधरे याची सिबंदी होती त्याणी गोळी वाजविली पुढे आलपिष्टन साहेब गेले होते त्याणी आपले कडील कारकुन सखाराम-

पंत पाठवून बोलणे करविले की हात्यार ठेवून जावे रिकामे भरी भरू नये परंतु न यैकेत तोफ गढीतून डागली तेव्हा तोफा दोन आणून आलपिष्टन याणी लाविल्या खासा स्वारी लवणात उभी राहिली तेथे गोले गढीतील येऊन पडू लागले आलपिष्टन साहेब तोफेपासी उभे होते तेथोन ग्राट साहेब पाठविले की स्वारी लस्कर पुरधराखाली आहे तेथे जावी वाट चुकवून स्वारीने तोपरयंत जाणे करावे खाशा स्वारीवर गोले टाकिले त्याअर्थी गढी लौकर खाली करून घेतो यजमानानी उत्तर केले की चार घटका बसतो लढाई पाहावयाची बहूत खुसी आहे त्याजवरून बहूत संतोष जाला की माहाराजाची इतकी खंबीरपणा आहे परंतु गोले येतात एखादा गोला लागला असता दगा होईल ही चिंता सेवटी सक्त विनंति केली तो एक गोळा सरकाराजवल येऊन घोरपडे याकडील स्वारास लागला घोडास्वार ठार जाला नंतर दोन घटका स्वारी बसली होती नंतरी लस्करात स्वारी सासवड उजवे टाकून आली मागे लढाई दोन प्रहरी प्रारंभ जाला होता ते सारी रात्र लढाई चालली फाल्गुण शु॥ पंचमी गुरुवार छ ४ मु॥ भीवरवरच जाला प्रातःकाळी लस्करातून तोफा आणखी दोन प्रातःकाळी नेऊन लाविल्या सफेली पाडून आत फार नाश जाला दरवाज्यापाशी खिंडार पाडिले बाला केली गढी घेतली लोक धरून दोन प्रहरा घेऊन लस्करात आले आणि सरकार डेऱ्यापासी उभे केले आणि सांगोन पाठविले की याचे पारपत्य काय करावे इकडून उत्तर गेले तुह्मास पाहिजे ते करावे नंतरी दोन आसामी फासी दिल्हे बाकी हात्यारे घेऊन सोडून दिल्हे नंतरी लागलेच पुरंदर रुद्रमाळ यास मोर्च्यास प्रारंभ केला तोफा नेऊन मांडल्या तिकडून किल्यावरून तोफाचा मार व बाणाचा मार होऊ लागला दोन प्रहर दिवस व च्यार प्रहर रात्र किल्यावरीलच मार जाला याणी गोळी वाजविली नाही मार चुकवून मोर्चेच सारीत चालले तसेच पाठीमागे किल्याचे एक पलटण होते तिकडूनहि मोर्चे ठरून देत तत्रापि याणी मोर्चे चालविलें इग्रेजाकडून ते दिवसी दोन हजार रुपये खर्चास आले

फालगुण शु॥ शष्ठी शुक्रवार छ ५ मुकाम भिवरच जाला तोफा इंग्रेज बाहादूर याणी सुरू केल्या पुरंधर व रुद्रमाळ दोही किल्यावर दो बाजूनी एकदाच सुरू केल्या किल्यावरी लागू केल्या सिस्त बांधून करणे शर्त केली पुरंधरचे बाले किल्यावरील तोफ थोरली चालू होती तिजवर सिसा बांधून मार दिल्हा तोफ बंद

केली बाले किल्यावर भालाभर गोला उडवून कुलपी गोले फुटून खाली जे मोर्चे उतरावे ते लोकात पडून पाच पंचवीस माणूस जाया व्हावे यैसे केले

फालगुण शु॥ सप्तमी शनवार छ ६ लढाईच चालली होतीच खालील तोफ चालली होती वरील तोफ मात्र बंद जाली गोळी व बाण मात्र चालले होते

फालगुण शु॥ अष्टमी छ ७ रविवार प्रातःकालचे प्रहर दिवसास वज्रगड ऊर्फ रुद्रमालचे बोलणे आले दोनप्रहरी लोक उतरून किला इंग्रेज याणी सर केला किला घेऊन आलपिष्टन साहेब याणी चोपदार पाठवून वर्तमान कलविले त्यास इनाम रु. १० दिल्हे तृतीयप्रहरी ग्राट साहेब येऊन सातारापर्यंत वाटेंत किले कोणते व वासोट्यापर्यंत कोणते नावनिसी लिहून घेऊन वाचून घेऊन यजमान स्वामीस पुसिले की पत्रें रवाना किल्यास करितो किले सोडून दिल्यास बरे नाही तरी इजा पावतील उतरे आणवितो बोलून गेले नंतरी बळवंतराव चिटणीस यासी बोलावून नेले आणि सातारा व पुणे येथोन खेरदी जिनस सनगे वगैरे केले होते ते ऐवजी व सनगे शालजोड्या जामदारखान्यातून उसनवार घेऊन गेले त्या ऐवजी पुण्यास हुंडी दाहा हजार रुपयांची व रोख तीन हजार एकसे साडे बेवीस रु. दोन आणे बारा ऐवज दिल्हा याद करून घेऊन आपले अक्षरे नाव लिहून घेऊन वाचून ठेविले

फालगुण शु॥ नवमी छ ८ सोमवार पुरंधर किला सर जाला आलपिष्टन साहेब याणी विचारिले किला पहावयास यावयाचे काय येतो ह्मणून सांगितले अंताजी गंगाधर गाडगीळ नि॥ आलपिष्टन याजबराबर रुप्याची भांडी व मसनती सामान पाठविले

६२ रुप्याची भांडी सुमारी
१ पातेली वजन तोळे १५०॥।१
२० वाट्या
८॥= १२।= ८।-॥ १२॥१॥ ८॥।१॥
९। १८॥।१ १२॥। ८॥। ११॥।=॥
१२ ८॥१। ८।= ११॥। ८॥। १२।१
८॥।= ११॥ ८॥=॥। १२।=॥

वजने नाहींत
४ कासाड्या
३ पंचपात्र
१ सुरई
१ ताह्मण
१ पातेले
६ ताटे

---

२ जांब थोर व लहान
४६।।। १९।।।=
१ अ.पकोरा दोन तोट्याचा
४७।।
३ पल्या संध्येच्या
७९। वजन नाही १
१ आतरदानी ९।।।१।।
२.चौफुले साहा घराचे सफेत कले
३८।।।१ ३८।।।१
१ गुलकातर ११।१
———
३१
३१ कि।।।
———
६२

२ गुलबदान्या
२ समया
२ चौफुले
२ चागरदान
२ डबे पानदाने
४ तबके
१ आतरदानीची काडी
———
३१

८ बिछाइती सामान
१ गादी किनखापी लाल
४ तकिये किनखापी
१ लोड किनखापी
———
६

१ चिकदोनी हिरवे मखमलीचा
१ आसने समधीचे
———
२

———
८

अंताजी गंगाधर यास तिवट व दुपटा दिल्हा व सामाने घेऊन आले माणसे यास इनाम दिल्हे तृतीय प्रहरी आलपिष्टन कचेरीस येऊन पुण्याहून इंग्रेज आले पाचंदरसाहेब व डाल डंबर साहेब व मकलाडे साहेब यास घेऊन येऊन भेटविले

फाल्गुण शु।। दशमी छ ९ मंगलवार स्वारी पुरंधर किल्ला पहावयास गेली बरोबर ग्राट साहेब होते किला पाहून श्री केदारेश्वराचे दर्शन घेतले देवापुढें दक्षणा रु. १० दाहा ठेविले नंतरी सदरेत बसले साखर बेदाणा तबकात घालून इंग्रेज याणी नजर केली आणि विचारिले की तोफा करावयाच्या परंतु दारु नाही व तोफा जाया जाहल्या यामुळे केल्या नाही स्वारी मुकामास आली फरासखान्याचे सामान आले वि।।

१ डेरा बनाती कुसुंबी
 १ डेरा
 २ कनाथा
 २ दऱ्या
 ——
 ५

१ पांढरे खादीचे
 १ डेरा
 ४
 ——
 ५

२ मंडप छीटी तांबडे सात खांबी
 २ मंडप
 २ कनाथा
 ——
 ४

१ मंडप खारवी साहा खांबी
 १ मंडप ४ कनाथा
 ४ सायवाने ० किताळंग
 —— ——
 ५ ४
 ——
 ९

१ डेरा खारवी कुसुंबी
 १ डेरा
 ४ कनाथा
 ——
 ५

११ कनाथा बाढास
 १० काल्या
 १ खारवी
 ——
 ११

——
१४

एणेप्रमाणे आले इंग्रेजाकडून त्याचे फरासास इनाम दिल्हे आलपिष्टन पुण्यास गेले बालाजीपंत व ग्राट येथे राहिले फार वागणे व निरोप पाठविणे येणे बालाजीपंत नातूचे फार बळवंतराव चिटणीस यासी बोलावे बोलावून न्यावे नरसू काकडे जामदार यासी बोलावे तसेच सदाशिव भगवंत नि॥ मुजुमदार यासी बोलावे एकतंत्र न ठेवीत व फार विश्वास सदासिव भगवंत याजवर नरसु व सदासिव भगवंत हे एक विचार बालाजीपंताचा मनोधर्य आपणाहून मोठे डोकेचा माणुस महाराजापासी सिरु देऊ नये नरसु व सदोबा हे हालके बरेच आहेत महाराजास सर्वोपरी गैर माहित आपले तंत्री ठेवावे आपली जरब ठेऊन धोरण आपले हाती राहून याचे बोलणे इंग्रेजापासी आपण बोलावे परस्परे होऊ देऊ नये यात आपली प्रतिष्ठा व सर्वाध्यक्षपणा आपला व्हावा यात दोहीकडे जड आसावे यैसे कित्येक मनसुबे या धोरणानी माहाराजास वरचेवरी विनंति बोध करणें व निडणी नानाप्रकारच्या व बोलणी बोलण्यांत माहाराजास पूर्व अडचणी व सहवास या

शातीचा सर्व शरीरी अनभविक होताच तेच दिसी लागलेवरून मर्जी खिन्न जा-लियावरून बळवंतराव चिटणीस याणी विनंति केली की या मनसब्याचा आगाऊ धोरणा संधी ठेविली आहे. श्रावण मासी माहुली मुक्कामापासून पाठविले तेव्हाच साहेबासी युक्त्य बोलणे केले कीं बाळाजीपंताचे हाते आमचे बोलणे आहेच बोलतो परंतु याहून एखादी गोष्ट बोलणे बोलावयाची ती साहेबास माहीत असावी दुसरेयास कळवूच नये यैसे असेल ते आपणासी बोलावी किंवा न बोलावी परि-स्फोट न होय ही खातरी व्हावी वरकड बोलणे बालाजीपंत हाते बोलत आहोच तेव्हां आलपिष्टन याणी उत्तर केले की आमचे राजकारणाची चाल आतून पेट वेगळी असती कोणते गोष्टीचा अंदेशा असू नये बाहेर यावयाचे नाही आमचा दस्तूर अैसा नाही वचन दिल्हे नंतरी सुचविले की पेशवे याची व बालाजीपंत याची एक जात पदरानी पदर नातेंहि असेलच परंतु आमचे घर या जातीने युग्तीने घरात सिरोन घेतले व फारच फार इजा दिल्ही ती काय बोलावी आणि येथे तरी त्यासीच गाठ पडली तेव्हा बहुत मनास नानाप्रकारचे अंदेशे येऊन बोलणेस मळ राहतो त्यास जी गोष्ट अंदेशेची मनास वाटेल ते वेगळे गाठ पडून ऐकून उत्तर होत असावे यासीच सारा समंध पडूं नये हे वचन असावे त्यावरून त्याणी वचन दिल्हे की कांहीं चिंता नाही हें पूर्वी संधि करून ठेविली आहेच आज्ञा जालियास कारकून पुणियास साहेब गेले तिकडे पाठवून पूर्वसंकेत वोळख देऊन दुसरे कोणी याजवर खासासाहेब मागून घेऊन केल्याविना चैन पडणार नाही आज्ञा जाली की कारकून पाठवून संधान करावे परिस्पुट मात्र न व्हावे परिस्फुट जाली असता नाश फार होईल त्याजवरून बळवंतराव चिटणीस याणी शामराव आवजी आपला कारकून पाठवून जीवनराव वकील नि॥ गाइकवाड याचे करवी श्रावण मासचे बोलण्याचे संकेताचे स्मरण देऊन बोलविले त्याणी उत्तर केले की आह्मी लस्करात येतो महाराजाचे व तुमचे विचारे करिता येईल

कलम

फाल्गुण शु॥ एकादशी छ १० रोज बुधवार मु॥ भिवरच होता अस्त-मानी बालाजीपंत नातू येऊन खलबत करून गेले.

फाल्गुण शु॥ द्वादसी छ रोज गुरुवार आलपिष्टन साहेब सायंकाळी च्यार घटका रात्रीस पुण्याहून लस्करात आले ग्रांट साहेब याजबरोबर सांगोन पाठविले

जे उदईक कूच करावयाचा हुकूम पुसावा डलंडबार साहेब याणी तावदानाचे ऐन्याचा मेना बाजीराव याचा पुरंदरावर होता तो नजर केला

फाल्गुण शु॥ त्रयोदसी छ १२ रोज शुक्रवार प्रातःकाली कूच होऊन कोथल्यास मुकाम प्रहर दिवसास प्रातःकालच्या जाला त्रितीय प्रहरी आलपिष्टन साहेब व ग्रांट साहेब येऊन बोलले जे पुण्यास चिटणीस याजकडील कारकुना-बराबर निरोप आला तो खरा की काय खरा आहे बरकड सर्व क्रम चालला तसा चालावा परंतु अधीक उणे जे होईल ते तुह्मास कळावे व आमची वागणूक कसी हे एक साहेब राहून त्यानी ध्यानी आणिले ह्मणजे आह्मास आयास नाही असे बोलणे जाले नंतरी माईसाहेब व भाऊसाहेब याजकडे आपासाहेब महाराजसुद्धा जाऊन क्षणभर बसून विडे पान घेऊन निरोप घेऊन डेरियास गेले

फाल्गुण शु॥ १४ चतुर्दसी छ १३ शनवार प्रातःकाळी कूच होऊन वाल्हेस मुकाम जाला अस्तमानी ग्रांट साहेब डेरियास येऊन महाराजासी वेगळे बोलोन माईसाहेब व भाऊसाहेब व आप्पासाहेब सुद्धा महाराज बसून ग्रांट बोलले जे वडे साहेब याचा आह्मास हुकूम जाला जे तुह्मी महाराजापासी वकिलीस नेहमी राहावे व जे सांगतील तें ऐकावे महाराज तुह्मासी बोलतील इकडील दस्तुराची वगैरे माहितीस बाळाजीपंत ठेविले ते आह्मास माहित करून देतील आपण जे सर्वांनी बोलणे ते आह्मासी बोलावे दुसरेकडे बोलो नये याप्रमाणें बोलोन गेले

फाल्गुन शु॥ पौर्णिमा छ १४ रविवार प्रातःकाळी कूच होऊन मु॥ पांडे-गाव येथे जाला हुताशनी समारंभ जाला केशरकर याजकडून पोळी बांधवणे साला-वादीप्रा। केले ग्रांटसाहेब व पाच असामी साहेब व बाळाजीपंत समारंभास आले नारळ त्यास देऊन त्याजकडून हुताशनीत नारळ टाकविले वरकड सरकारी मानकरी व मुछदीयास नारळ देऊन टाकविले नंतरी डेरियात स्वारी येऊन बसून सर्वास विडे देऊन निरोप दिल्हा

फाल्गुण वद्य प्रतीपदा छ १५ रोज सोमवारी कूच प्रातःकाळीच होऊन मु॥ तांबवे येथे जाला तृतीय प्रहरी आलपिष्टन साहेबानी बाळाजीपंत नातू याज-कडून खर्चाबद्दल रुपये च्यार हजार देविले ते नातू याणी शामराव आवजी नि॥ चिटणीस याजबरावर भोई देऊन पाठविले अस्तमानी ग्रांट साहेब याणी कारकून कुचाचे परवानगीस पाठविला परवानगी घेऊन गेला.

फाल्गुण वद्य द्वितीया छ १६ रोज मंगळवारी कूच होऊन बनवडी नजीक चंदन वंदन येथे मुकाम जाला त्रितीय प्रहरी बाळाजीपंत नातू आले एक घटका बसून गेले अस्तमानी ग्रयांट आले बाजपक्षी आलपिष्टन साहेब याणी नजर केला तो देऊन गेले बोलणे जाले त्यांतील पर्याय त्रिंबकजी डेंगळे कडील हुजरेत गोदाजी डेंगळा आहे तो स्वाधीन करावा व शेटी देवपुजे खडसरे हा हरी खडसरे त्रिंबकजी याचा भाऊ यास चार दिवस घालवावा जामीन त्याणी द्यावा राहील तेथे खर्चास देऊं स्वस्त जालिया वर आणवू माईसाहेबास बहुत वाईट वाटले बडबड अनर्थ केला परंतु घालवणे आले घालविले

फाल्गुण वद्य त्रितीया छ १७ रोज बुधवार जमादिलावल प्रातःकालींच येऊन ग्रांट याणी सांगितले की चंदन वंदन किल्ला सर जाला रात्रौ किल्यावरील लोक किल्ले टाकून उतरून गेले या प्रमाणे बोलोन गेले किल्यावर बाजोराव याणी पळत हिंडता काही जिनसा ठेविल्या त्या इंग्रजाचे हाती लागल्या ऐन्याचे आंबारी सुधा सांपडले ते उतरून सर्व खाली आणिले त्रितीय प्रहरी ग्रांट येऊन विचारिले की आलपिष्टन साहेब येतात हुकूम आहे कीं काय यावे ह्मणून सांगितले वरून परत जाऊन आलपिष्टन साहेब व ग्रांट व बाळाजीपंत नातू ऐसे आले आणि बोलले जे उदईक कूच करावयाचे स्वारी सातारियास जावयाची असलियास जावी आह्मी वासोटा घेऊन येऊं यजमानी उत्तर केले आम्ही हि वासोट्यास येतो तुम्हास घेतल्या विना सातार्‍यास जावयाचे नाही या प्रमाणे ठरविले नंतरी बोलले जे पांडवगडाकडून जावयाचे पांडवगड घेतला कलें जा व कमलगड घेऊन वासोट्यास जावयाचे वासोटा घेऊन सरकार कबिले उतरवून नंतरी सातारियास जाऊं व आमचे मनात आपणाकडे नीरेचे अलीकडे भीमा नदीचे हाद व वारणेची हाद कृष्णेचे व भीमेचे संगम जाला तेथपर्यंत मुलुक शयाद्रीपासून द्यावा असे मनात आले आहे लाट साहेबाकडे लिहिले गेले आहे त्याचे उत्तर हि येत आहे तों आम्ही हि कर्नाटकातून जर्नेल प्रछक साहेब येतात त्यास भेटोन ते व आम्ही येतो नंतर बंदोबस्त करू आजच किले कोट स्वाधीन करावे तरी ब्रैदा मिटला नाही बाजीराव तिकडे आहेतच याजमुळे किले वगैरे बंदोबस्त आम्ही करितो निशाणे आपली लाववू या प्रमाणे बोलले यजमानाचे उत्तर जाले सर्व तुमचा भरंवसा तुम्हास चांगले दिसेल ते करा या प्रमाणे बोलणे होऊन निरोप घेऊन गेले




फाल्गुन वद्य चतुर्थी सह पंचमी छ १८ रोज गुरुवार प्रातःकाली कूच होऊन पाचवडावर मुकाम कृष्णातीरी जाला त्रितीय प्रहरी बालाजीपंत नातूकडे बलवंतराव चिटणीस यांस पाठविले की हादी महाल मुलुकाच्या बोलण्यात आल्या परंतु समजुतीत न आले शयाद्रीपलीकडून की अलीकडून कसे हे पुर्ते समजोन ऐकून यावे त्याजवरून जाऊन पुसून आले शयाद्री अलीकडे व हादी सदरहू प्रमाणे सांगितल्या अस्तमानचे दोन घटका दिवसास ग्रांट व बालाजीपंत नातू येऊन बोलले माहाल मुलकाचे हादीचा मजकूर व रोज खर्चाचे अहमासानी महिना सालाचे आकाराचे खर्चाचे अदमासाची याद द्यावी म्हणजे आमचे समजुतीस येईल बोलोन गेले नंतरीं पंचमी वसंत याचे रंगाचा समारंभ हुजुरची मंडळी होती त्यास बोलावणे होऊन जाला. नंतरी बालाजीपंत रात्रौ आले आणि बोलले जे उदईक स्वारी वाईस देवदर्शनास म्हणोन जावी म्हणोन केकंजा किल्यास दाब पडेल याप्रमाणें बोलणें होऊन देवपूजा घालविला परंतु मोह सुटत नाहीं लस्कराभोवता हिंडतो रात्रौ येतो आसी आमची बातमी आहे हे फार वाईट दोस्तीत व्यत्येय येईल बाजीराव याचे आग्रहानी व मोहानी हे दशा जाली ध्यानात यावे असे बोलोन गेले उत्तरे निखालस केलींच.

फाल्गुन वद्य पंचमी छ १९ रोज शुक्रवार स्वारी वाईस जावी रोज गुदस्ताचे संकेतावर तयारी जाली नंतरी आलपिस्टन याणी सांगोन पाठविले जे किल्यावर दाब पडावा म्हणोन स्वारी जाण्याचा बेत केला होता त्यास रात्रीसच किला केलंजा घेतला बातमी आली वाईस जावयाची मर्जी असलीयास जावे परंतु वेर्थ श्रम उन्हाचे फार श्रम होतील मग मर्जी असेल तसे त्याजवरून उत्तर सांगोन पाठविले की स्वारी राहिली कार्याविना श्रम करण्याचे कारण...वाईच पाहणे ते स्वस्तपणे आणखे वेळेस पाहतां येईल नंतरी तृतीय प्रहरी कचेरी जाली गवयाचे गाणे जाले आलपिस्टन मात्र वाईस जाऊन बाजीराव याकडील थोर थोर गृहस्थ पुणेकर वाईस पळून आले ते व शास्त्री पंडित याच्या भेटी घेऊन योग्यायोग्य सत्कार शालजोड्या दुपटे तिबटे व दक्षणा देऊन आले आस्तमानी ग्रांट येऊन बोलले जे सातारचे वाडयाचे दागदोजीस खर्चास देविणार आहेच काही इमारत करणे असेल त्यास माहुलीस बाजीराव याचे वाड्याची इमारतीची लाकडे पडली असतील ती न्यावी चकदी पाठवून देतो बोलोन गेले आणि चकदी पाठवुन दिल्ही ती सातारियास विठल बल्लाल याकडे रवाना केली मु॥ पाचवड

फाल्गुण वद्य शष्टी छ २० रोज मंदवार प्रातःकाली व्यतीपाताव॥ श्री कृष्णस्नानास स्वारी जाऊन स्नान संध्या दान धर्म होऊन नंतरी डेऱ्यास स्वारी आली तृतीय प्रहरी बलवंतराव चिटणीस यास बोलावून शेटी देवपूज्याचा मोह सुटत नाही व तुम्ही स्पष्ट सुचवीत नाही सांगीत नाहीं यात तुमचे काही बरे होणार नाही व यजमानाचा नाश फार होईल या प्रकरणी बोलले सदाशिव भगवंत हि तेथे बसले होते

फाल्गुण वद्य सप्तमी छ २१ रोज रविवारी प्रातःकाळीं कूच होऊन वरिये नजीक सातारा येथें मुकाम जाला स्वारी उतरून डेरे होय तो आंबराईत गासे टाकून बसले आलपिष्टन व ग्राटसाहेब बालाजीपंत नातू जवळ आले आणि सांगितले जे सातारियास स्वारी यावी याप्रमाणे बोलणे जाले नंतरी डेऱ्यात आली आंताजी माहादेव माहाजन यास शहरात पुढे रवाना केले स्वारी येती कळवावे भोजनाचा बेत करवावा बैठक सुद्धा तयारी असावी व विठलपंत व मल्हारराव चिटणीस व सिर्के वगैरे मानकरी मुत्सद्दी असतील ते जमा होऊन सामोरे येणार ते यावे सांगोन पाठविले डेऱ्यात स्नाने फराळ जाले नंतरी स्वारी निघण्याची तयारी जाली तात्या जोसी पोतदार आले नजर केली स्वारी निघोन शहरात गेली सामोरे मानकरी मुसदी व शहरचे लोक आले शहराजवळ जाऊन आंबारीत स्वारी जाली विठलपंत व खंडेराव सिर्के खवासीत घेतले भाऊसाहेब महाराज याचे खवासीत बळवंतराव भोसले व बळवंतराव चिटसीस ऐसे च्यार साहेब लोक बसले विडे वगैरे समारंभ जाला भेंड वाद्य इंग्रेजी बराबर आले होते त्याणी बाजा केला त्यास इनाम शंभर रुपये दिल्हे वाडा व रंगमहाल पाहून सिर्के याचे येथे भोजन झाले नंतरी दोन घटका रात्रीस वरयावरी लष्करात स्वारी परत आली विठल बल्लाळ सिर्के बराबर त्या मुकामास आले रात्रौ इकडील तिकडील वृत्ताची बोलणी जाली

फाल्गुण वद्य आष्टमी छ २२ रोज सोमवारी प्रातःकाळी कूच होऊन तांबी नजीक मेढे येथे मुकाम जाला विठलपंत व सिर्के यास परत शहरचे बंदोबस्तास रवाना करावे सांगितलें पो विठलपंत परत शहरांत गेले सिर्के एक मुकामाबरोबर येतो ह्मणून आले आल्पिस्टन याजकडून खर्चाचे आदमासाच्या यादी द्याव्या बोलणे जेवाचे पडिले तेव्हा इकडून उतर जाले आह्मापासी हाली कोणी जमले नाही वरचेवरी मंडळी पदरची व आस येत आहे याचा आदमास कसा समजतो

व त्यास काय पावावे याचा आळा कसा होतो जे तुह्मी द्याल त्यात थोडेबहुत मानून खर्च करू या बोलण्याचा आदेशा काय याचा समज आह्मास पडत नाही त्याजवरून दोन यादी इंग्रेजी चालीच्या करून पाठविल्या त्यात पंगती जेवणार नाव गाव उमर उदा काये किती वर्षांचे नोकर आत सोयरे व पदरचे कारकून वगैरे यकदर यैसे तरेची पाठविली तेव्हा बहूत विचार पडिला नंतरी बलवंतराव चिटणीस यास बालाजीपंताकडे पाठविले की यात आह्मास काही च उमज पडत नाही विठलपंत व मल्हारराव चिटणीस यास आणऊन याची उतरे विचार करून करु त्याणी ग्राट यास कळविले वरी ग्राट व बालाजीपंत आले बोलणी बहुत जाली विठलपंत व मल्हारराव चिटणीस काय बहुत शाहाणे बलवंतराव चिटणीस व अंताजीपंत आहेत यास घालवावे मग त्या दोघास आणवावे तूर्त शहरातून दोघास हि आणवावयाचे नाही आह्मी बोलतो हे सरकारचे बरेसाठी बोलतो साल-मजकूर रयतेस उपद्रव फार लुटीखाली गेले पेस्तर सूट देऊन रयत शाबूत राखणे तेव्हा दोन साले गेली तिसरे साली वसूल येणार तेव्हा खर्च पाहून करावा किती लागतो हे समजले पाहिजे इंग्रेजसरकारातून आता जो यैवज खर्चास येतो ते कर्ज येते हे फिटून सरकारचे जमले पाहिजे वगैरे बोलोन गेले या मजकुराची पत्रे लिहून डाकेत विठल बलाल व चिटणीस याजकडे पाठविले उतरे करण्याची कलमबंद्या लिहिली आली परंतु त्यास न माने आपली चाली वेगल्या त्याच्या वेगल्या जे बोलले ते सेवटास न्यावे वोढ करून उतरे करणे नीट नव्हे हा विचार चालला होती मंडळी त्याचे मते कितेकाची वोढ नये जे ह्मणतील तो रुकार द्यावा त्याजवर च वोझे टाकावे कितेकाचे मनसब्यात कोणते भावे पुसतात न कले आच च आळ फिरतो व आपला आभाव कलतो जे आज ठरेल ते च कायम आपले हाते बांधून घ्यावे पुढे बोलणे राहत नाही व सातारियातील मंडळी शब्द ठेवणार उतावली केली उतरे नीट न केली यैसे बोलण्यास संधी राहाती सर्वत्र येक होऊन करणे ते करावे परंतु त्याचे नेट चालले

फाल्गुण वद्य नवमी छ २३ रोज मंगलवार मु॥ तांबी यादी खर्चाच्या द्याव्या व आह्माकडील कारकून पोत्यावर घेऊन याचे विद्यमाने खर्च करावणे या बोलण्याकरिता ग्राट व बालाजीपंत येऊन बोलणी जाली विचार करून सांगून पाठवितो उतर केले वासोट्या किल्यावरी सरकारवाडा कबिला होता त्या वाड्यास आग लागली खासी कायम आहेत नरकड फार नाश जाला यैसे वर्तमान बातमी आली यावरून मर्जी बहुत खीन्न जाली

फाल्गुण वद्य दशमी छ २४ रोज बुधवार मु॥ तांबी यादी व कारकून प्रकर्णी बोलण्यास बलवंतराव चिटणीस यासी बालाजीपंत नातु याजकडे यक दोन वेला उतरे प्रतिउतरे सांगोन पाठविले परंतु यादी द्याव्या व कारकून नेमून घ्यावा हे च नेट माहाराजाचे मनात काही नाही कुंपनी सरकारचे दोस्तीची गरज फार ठेवितात व आम्ही जे सांगू ते यैकितील ही खातरजमा पकी जाली आहे तुम्ही जवल आसणार सर्व नासता भलते आंदेशे मनात आणून देता हि आलपिष्टन साहेबाची खातरी जाली तुमचे कदापि बरे होत नाही या तरेची बोलणी वोढीची होऊ लागली तेव्हा विनंती करून आज्ञाते कलवितो वरकड उतरे केली च वासोट्यास नाना आगटे व हुजरे समाचारास पाठविले परत माघारे आले.

फाल्गुण वद्य यकादसी छ २५ रोज गुरुवार मु॥ तांबी तिसरे प्रहरी ग्राट याजकडून बालाजीपंत नातु आले बोलणे होऊन गेल्यानंतरी ग्राट याणी बलवंतराव चिटणीस यास बोलावणे पाठऊन नेले भिरजेकडेस जाण्यास किले कोणते व ठाणी कोणती लागतात मार्गी हे विचारिले ते सांगितले करवीरकर याचे वकिलास बोलाऊन त्यास हि माहितगारी विचारली आणि त्यास निरोप दिल्हा प्रचीतगडाकडे किले कोणकोणते लागतात विचारिले ते सांगितले नंतरी बोलले जे माहाराजाची बखर शिवाजी महाराजापासून वहिवाटीची दिल्ही होती ती पुण्यास बेटात गलबलीत नकली याकरिता दुसरी नकल करून द्यावी बडे साहेबानी सांगितले तुम्हावर बहुत मेहरबान होतील सातारियातील वाड्याचे दागदोजीस सात हजार रुो ची हुंडी पुण्यावर दिल्ही नंतरी निरोप घेऊन आले कृष्णाजीपंत माहाजन याजवळ हुंडी देऊन ग्राट याजकडे पाठविले की सातारियातील वाड्याचे कामावर हे कारकून रवाना करितो त्याणी कारकुनास ताकीद केली की माहाराजाचे वाड्याचे काम दुरुस्त करावे यक पैसा खाऊ नये हुंडी पुण्यास पटऊन यैवज घ्यावे पुन्हा बलवंतराव यास ग्राटाकडे पाठविले सातारियातील बाजीराव याचे वाड्यातील व किल्यावरील म्याने जे वासोट्यास स्वारी उतरण्यास लागतील त्यास विठलपंत यास लिहून आणवितो बरे आहे आणवा आलपिष्टन साहेब उद्या वासोट्यास जाणार प्रातःकाली च जातील आपली स्वारी परवा जावयाची याप्रो बोलले नाना आगटे यास पुन्हा रवाना करणे ठरले त्याणी सांगितले माझेनी जाणे छाती होत नाही

फाल्गुण वद्य द्वादसी छ २६ रोज शुक्रवार मु॥ तांबी प्रातःकाली बलवंतराव चिटणीस व सदासिव भगवंत नि॥ आमात्य व नरसू काकडे जामदार यैसे

बालाजीपंताकडे बोलावयास यादी व कारकून घेणे प्रकर्णी पाठविले प्रहरभर बोलणे जाले त्यातील भाव बडे साहेबाचे समजात आसे आले की माहाराजाची बोढ कोणते सांगण्याबाहेर नाही परंतु पोत्याचे कामावर आताजीपंत माहाजन आहेत त्यास हे मानत नाहीं हिमती घेऊन समजाऊन वाढविले यामुले कारकून आणखी इकडील ठेवावा यैसे जाले त्या आर्थी ये समई बोढू नये युक्तीनी काढता येईल परंतु मान्य करावे आताजीपंतास च पाठऊन कारकून न्यावा याप्रो होऊन नंतर दोन प्रहरने आताजीपंत माहाजन बालाजीपंताकडे पाठविले आणि कारकून कोणता देणार तो नेमून द्यावा ह्मणताच बालाजीपंताकडे पाठविले आणि कारकून कोणता देणार तो नेमून द्यावा म्हणता च बालाजीपंतानी अताजीपंतास घेऊन ग्राट साहेबाकडे घेऊन गेले येसोबा कारकून सेणवी घेऊन आले दर्शन करविले आज्ञा जाली जे तुम्ही यैवज घेऊन यावा आणि हुकूम करू तसा खर्च करावा नंतरी येसोबा चार हजार रुो घेऊन आले जामदारखान्यात ठेविले ग्राट येऊन उद्या वासोट्यास जाणे ठरले

फाल्गुण वद्य त्रयोदसी छ २७ रोज मंदवार तांबी ता मेढेखोरे येथोन प्रातःकाली कुच होऊन तांबीनजीक वासोटा येथे मुकाम जाला डेरे उभे राही तो आलपिष्टन साहब पुढे येऊन आपले डेऱ्यास घेऊन गेले दोन घटकेनी डेऱ्यास स्वारी गेली आस्तमानी ग्राट साहेब येऊन वासोटा येथील लढाई मोर्च्यांचे वर्तमान सांगितले जुना वासोटा याजवर तोफा चढविल्या व गर्नाल आर्धघाटी होती ती हि आली रात्रीस मोर्च्यांत जाईल उदईक चालू करितो सांगितले भास्करपंत मराठे नि॥ बाजीराव किल्यावर सुभेदार आहे त्यास पत्र पाठवावे तोफा सुरु जालियावर रदबदल चालणार नाही वगैरे लिहून पाठवावे ठरले मसुदा केला तो दाखऊन पत्र लिहून खंडो गोपाळ नि॥ वाकनीस व जासूद हुजरे प्रातःकाली मोर्च्यांत जाऊन पत्र किल्यावर रवाना करावे मोर्चेवाल्यास चकदी ग्राटानी दिल्ही बाजीराव वासंबेवर आहेत म्हणोन सांगितले

फाल्गुण वद्य चतुर्दसी सह अमावाशा छ २८ रोज रविवार मु॥ तांबी वासोटा पत्र घेऊन कारकून हुजरे गेले ते वर्ती सुभेदार नी घेतले नाही तोफा गर्नाल चढऊन किल्यावर मार सुरु केला प्रातःकाले च प्रहर दिवसापासून आस्तमानपर्यंत सातसे गोला कुलपी वरती पडला किला साट लाहान माणसे जाया जाली आस्तमानी दोन घटका दिवसास भास्करपंत यास पत्र पाठविले ते किल्यावर घेतले उतर दिल्हे नाही राणोजी नाईक दिवख्या गेले.

येऊन वर्तमान सांगितले जे राजवाड्यावर गोला पडला चाकरीच्या बायकास द्रोघीस छरे लागले खांबास गोळा लागला खांब उडाला खासी मंडली खुशाल आहेत परंतु फार घाबरी जाली आहेत आपले हाते आपली मुले माणसे मारता म्हणतात भाऊसाहेबाचा मूल भितो मोठा आनर्थ उसळला आहे भास्करपंत चढी लागला आहे हाक आल्यास खासी माणसे पुढे करून मग मी मरेन येसे नानाप्रकारची बडबड करितो सांगितले ग्राट व बालाजीपंत नातू यास बोलाअणे पाठविली ग्राट आले बालाजीपंतानी सांगून पाठविले काय काम आहे विचारून ये म्हणून पिराजी जासूद आला ग्राट यास सर्व वृत्त सांगितले त्याणीं सागितले आम्हास कालजी फार आहे आलफिष्टन साहेब तोफेजवल बसले आहेत बहुत सिस्तीनी गोळा मारवितात सरकार कबिले लागला नाही तरी तोफेनी वहलेनी घेतला हि असता यक गोळा बुध्या टाकिला वाड्यावर म्हणजे त्यास कलू येईल की आस्ता मुलामाणसाची सोडिली किला च घेणेवर भिस्त आहे गोळा वाडयावर टाकिला तो हि बच्याऊन मारला आहे आता रात्रीस त्याचे बोलणे येईल आता किला लौकर येईल आसे आम्हास कलो आले राजकीय वेवहारास ममता सोडून केले पाहिजे आपण घाबरू नये विडे घेऊन गेले नंतरी बुढ्या भालदार मिरधा साहा घटका रात्री किल्यावर होता तो आला त्याजबराबर निरोप सौ राणीसाहेबाचा आला की गोले तहकुब करवावे आमचे त्राण वाचत नाहीत ग्राट यास बोलाऊन आणिले त्याणी सांगितले की वरते माणूस घेत नव्हता व इकडे येऊ देत नाही ते हा निरोप सांगण्यास येऊ दिल्हा त्याअर्थी त्याचा दम सुटला बोलणार लौकर येतो तोफ आता मना व्हावयाची दस्तुर नाही किला येईल तेव्हा मना नंतरी मध्य रात्रीस भास्कर बलाल मराठे सुभेदार याजकडून कारकून सदासिवपंत जोसी पत्राची उतरे घेऊन मोर्च्यांत आला हुजुरचे हुजरे कारकून मोर्च्यांत होते ते घेऊन बोलावयास आला नंतरी बोलणे बोलला किला देतो परंतु माझा जिवाचा व माझे कुटुंबाचा चीचबस्त सुधा बच्याव व्हावा त्याजवरून बलवंतराव चिटणीस यास ग्राट याजकडे पाठविले ग्राटानी बहुत खातरजमेनी पुसिले किला देतो तरी येऊ नाहीतरी रात्रीस आह्मी येत नाही देतो बोलोन ग्राट यास घेऊन आले तोफ मना करावी त्यास आमचेनी मना होणार नाही या कारकुनानी हे आभय दोही सरकारचे घेऊन जुन्या बासोट्यावर तोफेजवळ जाऊन बोलावे आणि परत जाऊन बरील तोफ

गोली बंद करून पांढरे निशाण उभे करावे ह्मणजे तोफ बंद होईल जिवास भय नाही सौ राणी साहेबानी वचन दिल्हे ते च आमचे येसी खातर जमा करून बराबर हुजरे देऊन सदासिवपंत पाहटेच्या साहा घटका रात्रीस पाठविला ग्रांट याणी बोलख किल्यावर लोक चढतील तेव्हा गलबल होईल याकरिता पुण्यास कारकून हुजरे व पत्र दाजिबा उपाधे व भवानी जामदार यास घेऊन खुणा पुसून घेतल्या

चैत्र शुध्ध प्रतिपदा छ २९ रोज सोमवार मु॥ तांबी नजीक वासोटा किल्यावर भास्करपंत मराठे याजकडील कारकून पोहचून पांढरे निषाण उभे केले आणि जनेल लस्करचे साहेब याजकडे कारकून बोलावयास भास्करपंत याणी पाठविला त्यासी बोलोन तोफ मना जाली आलपिष्टन साहेब व ग्राट साहेब व आंताजी पंत माहाजन व खंडो गोपाळ व हुजरे किल्यावर गेले सरकारातून स्वारीची तयारी होऊन पालख्या व म्याने वगैरे पुढे पाठविले बलवंतराव चिटणीस व नरसू काकडे खाशा स्वाऱ्या उतरून आणण्यास पाठविले स्वारी सरंजाम वरकड मंडळी इंदोलीवर ठेऊन चिटणीस व नरसू किल्यावर गेले सरकारचे दर्शन घेऊन स्वारी उतरण्याचा बेत जाला ग्राटसाहेब व लस्करचे साहेब वाडियात बसून चीचबस्त मोजदाद जाली स्वारी सडी जावी देव सुधा चीचबस्त आज नेऊ नय मोजदाद करून किमती ठरऊन लस्करचे साहेबास यैवजाची खातरी सांगोन मग न्यावे तेव्हा चिटणीस याणी बहूत तरेने बोलोन देव ठेऊन जाता नये दस्तुर आमचा आसा नाही ह्मणून देव न्यावे ठरविले गैर राबता करऊन म्याने पालख्यात जवाहिरपेट्या व कागदाचे रुमाल व देव यैसे युग्त्या काढून स्वारी बराबर व भास्करपंतास वचन दिल्हे होते सौ राणीसाहेबानी परंतु साहबाचे ह्मणणे तीन दिवस वरते भास्करपंतानी राहावे मोजदाद बाजीराव याकडील होऊन ठिकाण लागले पाहिजे तेव्हा बहुत तरेने बोलोन वचनामुले भास्करपंत कुटुंबासुधा समागमे घेऊन स्वारी खाली उतरली लस्करची मंडळी सामोरी आली स्वारी डेऱ्यास आली चीचबस्त वरती राहिली डेऱ्यास स्वारी आलियावर नजरा सर्व मंडळीच्या जाल्या नंतरी बालाजीपंतास बोलाऊन आणिले चीचबस्तीविसी बोलणे जाले साहेबाकडे जाऊन परत आले आणि सांगितले की उदईक उंट हाती बैल तटे पाठऊन वस्तभाव उतरावी सांगोन गेले किल्यावर दोन साहेब गोरे कैद बाजीराव याणी करून ठेविले त्याच्या भेटी आलपिष्टन याच्या जाल्या मुग्त जाले

चैत्र शुध्ध द्वितीया छ ३० रोज मंगलवार जमादिलावल मु॥ तांबीनजीक वासोटा किल्यावरील चीजबस्त उतरण्यास हाती उंट तटे बैल सर्व पाठविले आंताजीपंत माहाजन व खंडो गोपाल किल्यावर च होते सखाराम कानेरे येथोन पाठविले सारी चीजवस्त वर ते साहेब लोक इंग्रेज होते याचे विचमाने मोजदाद करून जवाहीर सोने रुपे हात्यारे कापड भांडी वगैरे याची मोजदाद आदमास किमतीचा मोघम आदमासे तीन लक्षाचा केला फार चीजबस्त वाडा जलाला त्यास जलाले राहिले ते सारे घेऊन लस्करात आले येऊन पोहचले ग्राट येऊन उदईक कूच करून सातारियास जावे तांबीचे मार्गे च जावे यैसा नक्षा ठरऊन गेले राघोजी आगरे याचा पुत्र मानाजी आगरे होता ते मृत्य पावले त्यास पुत्र राघोजी आगरे आहे

चैत्र शु॥ त्रितीया छ १ रोज बुधवार जमादिलाखर प्रातःकाली कुच होऊन तांबीनजीक मेढे येथे मुकाम जाला आस्तमानी बलवंतराव चिटणीस यास बालाजीपंतानी बोलाऊन नेले आणि सांगितले की आलपिष्टन माहाराजास मेजवानी करणार त्यास मंडळींची नावनिसी व कोणास किती वस्त्रे ही याद लिहून विनंती करून ठरऊन देवावी ग्राट रात्रौ आले उदईक मुकाम आसावा लस्करचे लोक घाट उतरून यावयाचे बोलोन गेले सातारियास लिहून पत्रे रवाना केली आलपिष्टन यास मेजवानी करावयाची याची तरतूद व जागाजुगा कचेरीची तरतूद चांगली करावी

चैत्र शु॥ चतुर्थी छ २ रोज गुरुवार मु॥ तांबी मेजवानीची यादी मंडळी हुजुरची सर्वत्र लिहिली आणि बालाजीपंतास दाखविली त्याणी आलपिष्टन यास दाखविली नंतरी बोलणे पडिले जे वारंवार मेजवानी परस्परे होणार दोनसे मंडली हे गैरसिस्त कोणते हि दरबारी यैसे नाही साहेबाकडील मंडळी दाहा बारा येणार मेजवानीस इकडील फार तरी पंचवीस पर्यंत लिहावी फार जालियास सिस्तवार योग्यायोग्य होणार नाही वगैरे बहुत पर्याये बोलले सर्व मंडळी योग्य च टाकावी कोण मोठे पराकाष्टे बालाजीपंत येऊन बोलोन च्यालीस आसामी मेजवानीस यावी ठरविले उदईक कुच व्हावयाचे सातारियास जावयाचे सर्वत्र साहेब कचेरीस येतील कचेरीचा बेत चांगला राखवावा बोलोन गेले

चैत्र शु॥ पंचमी छ ३ रोज शुक्रवार प्रातःकाळी कूच जाले मार्गी धावडसीकर आडवे आले देव दर्शनास चलावे विनंती केली मुहूर्तांनी लौकर जावयाचे

आणखी वेलेस येऊ उतर केले नंतरी करंज्यापासील आंबराईत स्वारी उतरली लस्कर करंज्यावर उतरले सरकारी ढाल ढेरा उभा केला आंबराईत च स्नानसंध्या भोजन जाले त्रितीय प्रहरी मुहूर्तानी मोठेसमारंभे बराबर आलपिष्टन व सर्व साहेब लोक खासे त्रिवर्ग आंबारीत खत्रासियात माहाराजाचे विठल बलाल माहाजन व खंडेराव सिरके व भाऊसाहेबाचे खवासीत बलवंतराव भो व बलवंतराव चिटणीस यैसी स्वारी बहुत च तरतुदेनी वाड्यात दाखल जाली मंडपात कचेरी बहुत तरतुदीनी केली खासा सिव्हासनारूढ जाले डावे बाजूस सर्व साहेब लोक बसले वरकड हुजुरची मंडळी व शहरातील थोर थोर आले नाच वगैरे समारंभ जाला नजरा जाल्या विडे आतर गुलाब होऊन सर्वांस निरोप जाला आलपिष्टन सुधा सर्वांस खुसी तोफा जाल्या किल्यावरील ग्यार रवी सौ भेटला -

चैत्र शुद्ध शष्टी छ ४ रोज शनवार मु॥ शाहूनगर प्रातःकाली बालाजीपंतानी विठलपंत फडणीस व बलवंतराव चिटनीस यास लौकर यावे पोशाख लावले पाहिजे बोलले प्रहर दाहा घटका दिवसास उभयता गेले तो पोशाख लाऊन आगोधर त्यानी ठेविले त्रितीय प्रहरी स्वारी मेजवानीस आलपिष्टन याचे लस्करात डेऱ्यास गेली आलपिष्टन सामोरे येऊन घेऊन गेले सनगे व जवाहीर वगैरे बो

१८ खासा महाराज व भाऊसाहेब महाराज आपासाहेब महाराज

| | |
|---|---|
| १ मंदील कोरदार | १ शाल लाखी झाड पदरी बुटेदार |
| १ किनखाप गठी | १ रुमाल शाल नामी |
| २ मलमल्या | १ पटका बादली कारचोपी |
| १ घड्याल | १ पोची जोड हिरेच्या |
| १ दुर्बीण | १ कंठी मोती व पाच |
| १ सिरपेच हिरे | १ पुष्कराज |
| १ कारखाना हिरे | १ चवरी पराची |
| १ तुरा मोत्याचा | १ आत्फागीर बादली |
| १ दंडपेट्या जोड हिरे | — |
| —— | ८ |
| १० | |

७ माईसाहेब बाबासाहब व सौ बाई सौ सौ जी ( जी ) साहेब

| | |
|---|---|
| १ बादेहार जडाव | १ किनखाप |
| १ आंगठी | १ पैठणी |
| १ शालजोडी | २ चोलखण |
| — | — |
| ३ | ४ |

मंडळी हुजुरची

| | | | |
|---|---|---|---|
| १ पंडितराव | १ भाऊ दीक्षित | १ आमात्य सर्वोत्तम | १ विठलपंत फडणीस |
| १ तिवट | ठकार सदरहू ३॥ | बाबूराव | १ तिवट |
| १ शालजोडी | १ नारायणशास्त्री ३॥ | १ तिवट | १ शालजोडी |
| १ किनखाप | १ दाजी नारळकर | १ शालजोडी | १ किनखाप |
| २ महमुद्या | वैद्य ३॥ | १ किनखाप | १ महमुदी |
| — | १ बापु पुराणीक | २ महमुद्या | — |
| ५ | | — | ४ |
| | | ५ | |

| | | | |
|---|---|---|---|
| १ सिरपेच | १ तिवट | १ सिरपेच | १ बलवंतराव भो॰ राजे |
| | १ दुपटा | १ कंठी | १ तिवट |
| १ दाजिबा उपाधे | —— | १ मल्हारराव राम | १ शालजोडी |
| १ तिवट | २ | चिटनीस | १ किनखाप |
| १ शालजोडी | १ संध्याभट | १ तिवट | १ महामुदी |
| -॥- किनखाप | १ तिवट | १ शालजोडी | — |
| १ महमुदी | १ दुपटा | १ किनखाप | ५ |
| — | — — | २ महमुद्या | १ सिरपेच |
| ३॥ | ५ २ | — | १ कंठी मोत्याची |
| | | ५ | १ तुरा मोत्याचा |
| | | | — |
| | | | ३ |

१ तात्या उपाध्ये
सदरहू प्रो ३॥
१ कचेश्वर बावा
सदरहू ३॥

———

४

१ बलवतराव मल्हार चिटनीस
१ तिवट
१ शालजोडी
१ किनखाप
१ महमुदी

———

४

८ साडे तीन सनगाची मंडळी यकंदर
१ तिवट
१ शालजोडी
-॥- किनखाप
१ महमुदी

———

३॥

१ भिवराव विठल पोतनीस
१ कृष्णराव गोपाळ दिवाण वाडा २
१ बलवंतराव बक्षी
१ नारो माहादेव
१ तात्या जोशी पोतदार
१ कारकून नि॥ सचीव
१ कारकून नि॥ मंत्री
१ कारकून नि॥ आमात्य

———

८

१८ मराठे मंडळ
१७ साडेतीन सनगे तिवट येक शालजोडी येक किनकाफ आर्धे व महमुदी येक येणे प्रो मंडळी
४ सिर्केराजे ५ माहाडिकराजे
१ भवानरावराजे १ सरूपजीराजे
१ खंडेरावराजे १ कुसाजीराजे
१ संभाजीराजे १ आबाजीराजे
१ वाघोजीराजे १ मुरारजीराजे
१ बापूजीराजे

———

४ ५

६ मोहिते
१ रामराव
१ जैसिगराव कर अजहात
१ सरूपसिंग सरदेशमुख
१ हरिबा
१ रतनासिंग
१ नारायणजी

———

६

१ आपाजीगुजर
१ नाथाजी केशर

———

७

———

१० १७

२ दोन सनगेची मंडळी, दोन सनगे तिवट १ दुपटा १

१ तिवट

१ दुपटा

१ दौलतराव गाईकवाड हवालदार पिलखाना

---

२

१ केशवराव आगटे

१ नाना जोसी पोतदार

१ कारकून नि॥ चिटनीस

---

१८

---

३

कारकून मंडळी १५

| यकुण मंडळी १५७॥ | यकुण सनगे मंडळीस | यकुण जवाहिर मंडळीस |
|---|---|---|
| ९ सिष्ट | ४३ तिवटे | ३ शिरपेच |
| १५ कारकून | ३९ शालजोडया | २ कंठ्या |
| १९ कराटे | ४७ महमुद्या | १ तुरा |
| --- | २४॥ किनखाप | --- |
| ४३ | ४ दुपटे | ६ |
| | --- | |
| | १५७॥ | |

येणेप्रमाणे समारंभ होऊन स्वारी परत आली सरकारास हाती घोडा दिल्हा त्या मोतदार व माहात यास इनाम दिल्हे सनगे व महाराजाकडील शागीर्द पैशास इनाम यकंदर रुपये ५०० पाचसे दिल्हे रात्रौ बालाजीपंत नातू पोशाख व जवाहीर घेऊन येऊन माईसाहेब व बावासाहेब व सौ राणीसाहेब व सौ बाईसाहेब व सौ जिजीसाहेब यास प्रविष्ट करून गेले.

चैत्र शु॥ ७ सप्तमी छ ५ रोज रविवार मु॥ शाहूनगर कुंपनी सरकारची व छत्रपती सरकारची दोस्ती जाली खुलासा होऊन सिव्हासनारूढ झाले हे सर्वास महशूर व्हावे ह्मणून से दोनसे जाहीरनामे कंपनीचे रीतीचे सिके मोर्तबे निशाणे होऊन पत्रे चालावयास प्रारंभ जाला जाहीरनामे ग्राट याचे स्वाधीन केले जर्नेल प्रछक साहेब कर्नाटकातून आले विलायतेस जाणेयास या मार्गे आलपिष्टन याची भेटी घेऊन जावे याकरिता त्यास आलपिष्टन याणी आणून भेटविले ते लौकर

निघून जाणार त्यास मेजवानी केली आमंत्रणास बलवंतराव चिटणीस यास पाठविले घेऊन आले प्रातःकाली च कोरडी मेजवानी वस्त्रे जवाहीर दिल्हे नावे—वि॥

८ खुद जर्नेल प्रछक

१ तिवट १६।
१ शालजोडी ५५०
१ किनखाफ २१२॥
२ महमुद्या ३५

——————
८१३।।।

१ कंठी मोत्याची
१ सिरपेच
१ परखाना

——
८

७ ज्यालीसाहेब

१ तिवट
१ शालजोडी
१ किनखाप
२ महमुद्या
१ सिरपेच
१ परखाना

——
७

——
१५

७ दानहूसाहेब

१ तिवट
१ शालजोडी
१ किनखाप
२ महमुद्या
१ सिरपेच
१ परखाना

——
७

७ दजसाहेब

१ तिवट
१ शालजोडी
१ किनखाप
२ महमुद्या
१ सिरपेच
१ परखाना

——
७

७ कच्यल साहेब

१ तिवट
१ शालजोडी
१ किनखाप
२ महमुद्या
१ सिरपेच
१ परखाना

——
७

——
२१

——
३६

सदरहूप्रो मेजवानी होऊन विडे आतर गुलाब देऊन निरोप दिल्हा बलवंतराव चिटणीस व विठलपंत फडणीस यास पाठऊन आलपिष्टन याचे मेजवानीचा निश्चय करविला जेवणाची मेजवानी व्हावी जेवणास यावे हा निश्चय करविला बकरेचे मेजवानीची तरतूद करविली बालाजीपंतापासी शाल नामी बुटाची थोर शालजोडी होती ती आलपिष्टन यास द्यावयास खरीदी घेतली

चैत्र शु॥ आष्टमी छ ६ रोज सोमवार प्रातःकाली विठल बलाल फडणीस व बलवंतराव चिटणीस पाठऊन सूचना करविली दोन प्रहरी जेवणास आले जामदारखान्यापुढे माडीवर जेवणाचा बेत केला त्याजकडील जेवणाची भांडी बिलोरी वगैरे आली जेवणे जाली नंतरी मंडपात कचेरी जाली विडे आतर गुलाब होऊन वस्त्रे जवाहिर दिल्हे नावे

११ खुद आलपिष्टन साहेब  
१ तिवट  
१ शालजोडी  
१ किनखाप  
२ महमुद्या  
१ कंठी मोत्याची  
१ सिरपेच  
१ खाना  
१ पोच्या २  
१ घोडा  
१ हाती  
———  
११

७ कपतान टोवी साहेब  
१ तिवट  
१ शालजोडी  
१ किनखाप  
२ महमुद्या  
१ सिरपेच  
१ परखाना  
———  
७  
———  
१८

७ मेजर किलीलंग साहेब  
१ तिवट  
१ शालजोडी  
१ किनखाप  
२ महमुद्या  
१ सिरपेच  
१ परखाना  
——  
७

७ मेस्तर ज्याफरीसाहेब  
१ तिवट  
१ शालजोडी  
१ किनखाप  
२ महमुद्या  
१ सिरपेच  
१ परखाना  
———  
७  
———  
१४

७ डाकतर कोटस हेब  
१ तिवट  
१ शालजोडी  
१ किनखाप  
२ महमुद्या  
१ सिरपेच  
१ परखाना  
——  
७

३॥ सरजंट बेनिट  
१ तिवट  
१ दुपटा  
॥ किनखाप  
१ महमुदी  
———  
३॥

आन्याबा राईरकर  
१ तिवट  
१ दुपटा  
॥ किनखाप  
१ महमुदी  
———  
३॥  
———  
१०॥

५॥ यशवंतराव घोरपडे
 १ तिवट
 १ दुपटा
 ॥ किनखाप
 १ महमुदी
 १ सिरपेच
 १ परखाना
 ———
 ५॥

३॥ बापू नारायणजी
 १ तिवट
 १ दुपटा
 ॥ किनखाप
 १ महमुदी
 ———
 ३॥

३॥ सदानंदराव
 १ तिवट
 १ दुपटा
 ॥ किनखाप
 १ महमुदी
 ———
 ३॥
 ———
 १२॥

३॥ आबाजीपंत
 १ तिवट
 १ दुपटा
 ॥ किनखाप
 १ महमुदी
 ———
 ३॥

२ खानसो
 १ तिवट
 १ दुपटा
 ———
 २
 ———
 ५॥
 ———
 ६०॥

येणेप्रो समारंभ होऊन निरोप दिल्हा नंतर तत्खाचे दिवाणखान्यात माईसाहेब बसून विडे आतर गुलाब देऊन निरोप दिल्हा निरोप समई आलपिष्टन यास

हिऱ्याची आंगठी दिल्ही निरोप घेऊन गेले त्याणी इकडील चाबुकस्वारास दुपटा पागोटे दिल्हे व इकडून त्याजकडील शागीर्द पेशास इनाम दिल्हे रुो ५०० पाचसे व हाती घोडे घेऊन आले त्यास रुो ६१ यकूण पाचसे यकसष्ट दिल्हे आलपिष्टन माईसाहेबापासून निरोप घेता माहाराज व भाऊसाहेब आपासाहेब जवल होते तेथे बोलणे जाले आलपिष्टन बालाजीपंत याणी प्रश्न केला की आपले-कडील बोलणार यक कोणतो मुखत्यार करून सांगावा त्यावरून विठल बलाल हे ह्मणून सांगितले नंतर बोलणे पडले जे बाजीराव याचा दंगा आद्यापि मिटले नाही सर्व मंडळ व बंडे हिंडतात व पलटणे कामगारीस किल्याकिल्यास वगैरे जाणार व येथे नेहमी राहावयास पलटणे व स्वार येणार तोपर्यंत स्वारी किल्या-वर आसावी बंड बैदा मोडल्यावरी खाली राहावयाचा बेत होईल ह्मणून ह्मणणे फार दाट पडल्यावरून स्वारी किल्यावर जाऊन राहावयाचे ठरले

चैत्र शु॥ आष्टमी छ ६ रोज सोमवार किल्यावर स्वारी राहावयास गेली खाली वकिलीवर विठलपंत फडणीस ठेविले माईसाहेब आस्पर्श ह्मणून दोन तीन रोज राहिली

चैत्र शु॥ नवमी छ ७ रोज मंगलवार आमात्यपंत सर्वोतमराव याचे घरी रामनवमीचा उत्छाह सबब आमंत्रण केले त्यावरून स्वारी किल्यावरून येऊन पंताचे घरी येऊन कीर्तन समारंभ होऊन खाशाचे भोजनाचा बेत जाला बराबर मुसदी मंडळ यास फराळाचा बेत केला नंतर त्रिवर्ग खाशास पोशाख दिल्हे व माहाराजास घोडी नजर केली नतरी आस्तमानी स्वारी किल्यावर गे किल्यावर स्वारी जाता यकवीस तोफा कराव्या हा पंथ इंग्रेजानी सलामीच्या करू लागले

चैत्र शुद्ध दशमी छ ८ रोज बुधवार चतरसिंग भोो किल्यावर कैदेत होते तेथे जलोदर होऊन मृत्य पावले किल्याखाली आणून दहन किल्यावर सुभे-दार होता त्याणी केले परंतु हुजूर वार्ता इंग्रजानी कलू दिल्ही नाही बंड आहे चतरसिंग ह्मणवितो त्याची छयान चौकसी होणे याबदल विठलपंत याजवल ग्राट बोलले मराठे मडळी जवल खातरजमेची किती राहावयाची बाकी खर्चास देऊ यक यक आसामी किल्यावर रवाना करावे किले हावाली करावे गोपालपंत नि॥ त्रिबकजी येथे आसू नये व भास्करपंत मराठे यास सिधा देऊ नये

चैत्र शुद्ध यकादसी छ ९ रोज गुरुवार माईसाहेबाची स्वारी किल्यावर राहावयास आली

चैत्र शुद्ध द्वादसी छ १० रोज शुक्रवार

चैत्र शुद्ध त्रयोदसी छ ११ शनवार किल्याखाली स्वारी उतरून राजवाडयात आली आणि जाहिरनामे तयार केले ग्राट बालाजीपंत आले त्याणी मसुदा करून आणिला त्याप्रमाणे लिहून तयार केले त्यात भाव जे इग्रेज सरकारची व माहाराज सरकारची दोस्ती जाल्याचे पेशजी जाहिरनामे सादर जाले आहेत हाली या सरकारात जो मुलुख लागेल त्याची आबादी व रयतेस उपद्रव करणार त्याचा बंदोबस्त गैर राह चालतील त्यास सिक्षा या सरकारची उत्तम रीत हि लोकास प्रगट होय याकरिता ग्राट बाहादुर यास आज्ञा केली ते बंदोबस्त करितील ह्मणून सर्व लोकास महशूर व्हावे या बाबे तयार केले माहाराज तख्तावर बसून कचेरी जाली जाहिरनामा सर्वास बलवंतराव चिटणीस याजकडून वाचऊन ग्राट याणी उटोन माहाराजाचे हाते घेतला नंतर विडे देऊन निरोप दिल्हा स्वारी किल्यावर निघोन गेली

चैत्र शुद्ध चतुर्दशी छ १२ रविवार

चैत्र शु॥ छ १३ सोमवार

चैत्र वद्य प्रतिपदा छ १४ मंगलवार

चैत्र वद्य द्वितीया छ १५ बुधवार

चैत्र वद्य त्रितीया छ १६ गुरुवार श्रीस्वामी चाफळकर आले त्यास जकातवाडीस चिटणीस यास सामोरे पाठऊन आणून आपण स्वारी खाली उतरून बाजार पेठयावर येऊन आंबारीत बसऊन आपण सेजारी बसले खवासियात आमात्यपंत स्वामीस चादर बुटेदार घालून साष्टांग नमस्कार करून राजवाडियात घेऊन आले आणि क्षणभर बसून किल्यावर स्वामीस घेऊन स्वारी गेली

चैत्र वद्य चतुर्थी छ १७ शुक्रवार

चैत्र वद्य पंचमी छ १८ शनवार

चैत्र वद्य शष्टी छ १९ रविवार

चैत्र वद्य सतमी छ २० सोमवार.

चैत्र वद्य आष्टमी छ २१ मंगलवार श्रीस्वामी हनुमंत बावा चाफळकर याचा आनुग्रह पूजा करून घेतला माहाराजानी च्यारसे रुो रोख खर्च केले माईसो

भाऊसो आपासो राणीसो उभयता व बलवंतरावभो कुटुंब सुधा व त्याची मातुश्री सुधा घेतला व सिरके दोघे माईसो चे बंधु याणी घेतला समारभ मोठा केला पीतांबर शालजोडी धोत्रजोडा रुमाल शाल नामी दिल्हा ब्राह्मणसंतर्पण केले

चैत्र वद्य नवमी छ २२ बुधवार

चैत्र वद्य दशमी छ २३ गुरुवार

चैत्र वद्य यकादसी छ २४ शुक्रवार बलवंतराव मल्हार चिटणीस यास कलमदान रुप्याचे करावयास रुपे जामदारखान्यापैकी वासोट्यास जळींचे रुपयाचे दागिने पो दिल्हे वजन भार १२५ सवासे चांदी दिल्ही.

चैत्र वद्य द्वादसी छ २५ शनवार भोयाचा नाईक व भोई फडणीस याणी आणविल्यावरून पाठविले ते फडणिसास न पुसता वर आले व फडणिसानी ताकीद केली ते न यैकिलेवरून मोघाजी नाईक यास समक्ष आणऊन देवघरापुढे मारविला मर्जी फार विघडली चिटणीस याणी रदबदल करून सोडविला

चैत्र वद्य त्रयोदसी छ २६ रविवार

चैत्र वद्य चतुर्दसी सोमवार छ २७ भाऊसाहेब याचे चिरंजीव बावासाहेब यास शरीरी पीडा होऊन वारले मोठा च अनर्थ जाला बहुत श्रम जाले पालखी वगैरे सामान तयारी करून वाद्ये वगैरे समारंभे माहुलीस प्रहर दिवसा प्रातःकालचे नेऊन दहन केले

चैत्र वद्य मंगलवार छ २८

वैशाख शु॥ प्रतिपदा बुधवार छ २९ जमादिलाखर

वैशाख शु॥ द्वितीया गुरुवार छ १ रजब ता॥ छ २ शुक्रवार त्रितीया

वैशाख शु॥ चतुर्थी शुक्रवार छ रजब कुणबीण मर्जीकडील होती तीं गरत आसता कुणबीण कसी केली तिचे कोणी फिर्याद आले ह्मणोन बालाजीपंत नातूचे ह्मणणे पडिले चौकसी करून परत लाऊन देतो पाठऊन द्यावी त्याजवरून नातूकडे पाठविली बापु भयाराम याणी आपले लेकाचे लग्नाची आक्षत केली व डोलीस भोई मागितल्यावरून देविले फडणीस याची चिठी आली की रोजमुरा व खर्चाचा यकंदर पट लौकर तयार आज व्हावा उदईक श्राद्ध वरते पाहा-

वयास येणार व बापुभट केलकर याचे नाव आश्रितात लिहून च्यालीस रुो आख घालावा बालाजीपंत नातुची भीड फार आहे त्याजवरून लिहविले

छ ४ रजब वैशाख शु॥ पंचमी रविवार पंडितराव याचे घरी बारशास स्वारी यावी हा निश्चय होता परंतु ग्राट याचे वरते येण्याचा निश्चय ठरल्यावरून स्वारी खाली जाणे राहून आहेर पंडितराव यास करण्यास सनगे फडणीस याकडे पाठविली त्रितीय प्रहरी ग्राट बालाजीपंत वरते आले दोन घटका यकांत जाला फडणीस चिटणीस जवल होते रोजमरा वगैरे पट दाखविला तयार होत आहे ह्मणून सांगितले लौकर करवा बोलोन निरोप घेऊन गेले

वैशाख शु॥ शष्टी सोमवार छ ५ रजब स्वारी खाली येऊन वाडियात येऊन

वैशाख शु॥ सप्तमी मंगलवार छ ६ रजब बालाजीपंत किल्यावरी आले रोजमुरे व खर्चाचा पट तयार जाला तो पाहून बोलणे दोन घटका जाले ग्राटाचे ह्मणणे पंचवीस हजार रुो त तयार व्हावे यादी कसाकसी करिता सवीस हजार रुो यादी जाली तेव्हा बालाजीपंतास सर्व समजाविले त्यास ग्राटासी बोलोन ठरावे यैसी बोलणी होऊन पट तयार जाला तो घेऊन गेले

वैशाख शु॥ आष्टमी बुधवार छ ७ रजब

वैशाख शु॥ नवमी गुरुवार छ ८ रजब

वैशाख शु॥ दशमी शुक्रवार छ ९ रजब

वैशाख शु॥ यकादसी शनवार छ १० रजब सवीस हजार रुपये खर्च ठरोन पैकी वीस हजार रुपयेचे तोडे किल्यावर येऊन पावले

वैशाख शु॥ द्वादसी रविवार छ ११ रजब जरनेल स्मित याचे पत्र थैली घोडनदीवरून ग्राट याजकडे आले ते घेऊन फडणीस वर आले थैली चिटणिसापासून फोडऊन वाचून पाहिले चिटणिसानी तारीख पौ घालून ठेविले

वैशाख शु॥ त्रयोदसी सोमवार छ १२ रजब उंट यकंदर वरते आणून माईसाहेब भाऊसाहेब आपासाहेब व वाडा सरकार यैसे नेमून व गेले घेतले बलवंतराव चिटणीस यास यक उंट बक्षीस दिल्हा त्याचा उंट लस्करात लुटीस गेला सबब दिल्हा श्रीस्वामी व त्याची मातुश्री व कुटुंब सुधा किल्यावर निरोपास आली निरोप घेतला शालजोडया स्वामी निसबत आसाम्या रंगोपंत व माण॥पंत व

तात्या व पुराणीक यैशा च्यार शालजोड्या व च्यार तिवटे व आणखी सिष्य यकदोन यास तिवटसेले दिल्हे निरोप घेऊन गेले रोजमुरा वाटण्यास प्रारंभ केला

वैशाख शु॥ चतुर्दसी मंगलवार छ १३ रजब

वैशाख शु॥ पौर्णिमा बुधवार छ १४ रजब सरकार माईसाहेब भाऊसाहेब आपासो व वाड्याकडील वगलाले खर्च चालू झाले रुो २६००० सवीस हजार पौ नेमणूक खर्च नेमून दिल्हा मुदबख सेवेची माणसे घोडी हाती उंट वगैरे सर्व आपले आपले इतमाम ज्याचे त्याणी पाहून करावयास प्रारंभ जाला

| | |
|---|---|
| १४२८१॥ माहाराज छत्रपती | २२७३ मातुश्री माईसाहेब |
| १३४३ वाडा पहिला | ३७५० भाऊसाहेब |
| ६०२॥ मर्जी | ३७५० आपासाहेब |
| १६२२७ | ९७७३ |

२६०००

खेरीज जिलबीचे वगैरे लोक शंभर यासी रोजमुरा रुो व स्वार आसामी पंधरा यास रोजमुरा रुो याप्रो परभारा इंग्रेजाकडून पावावे ठरले

वैशाख वद्य प्रतिपदा गुरुवार छ १५ रजब

वैशाख वद्य द्वितीया शुक्रवार छ १६ रजब

वैशाख वद्य त्रितीया शनवार छ १७ रजब

वैशाख वद्य चतुर्थी रविवार छ १८ रजब

वैशाख वद्य पंचमी सोमवार छ १९ रजब जयवंतराव मंत्रीचे पत्र आले

वैशाख वद्य शष्टी मंगलवार छ २० रजब

वैशाख वद्य सप्तमी बुधवार छ २१ रजब

वैशाख वद्य अष्टमी गुरुवार छ २२ रजब विसाजी रामाजी नि॥ जर्नेल याचे पत्र आले ते पाहून ठेविले आलपिष्टन पुण्याहून आले ते त्रितीय प्रहरी वरती येतो सांगोन पाठविले आस्तमानी किल्यावर आले सामोरे दरवाज्याचे

किल्याचे खाली फडणीस चिटणीस गेले तबीयत आछी पुसिले फडणीसास पुसिले तुह्मी किल्याखाली आसता वरते नित्य येत आसता काय चिटणीसास विचारिले तुह्मी वरत च माहाराजाजवळ आसता होय उतर केले नंतरी वाडियात आले खुसी वगैरे परस्परे बोलणे जाले नंतरी बाजीराव याचे बोलणे चालण्याची गोष्ट निघाली त्याजवरून आलपिष्टन बोलले बाजीराव बोलणार बहुत सावध लिहिणार वगैरे सर्व चांगला परंतु बोलल्याप्रमाणे चालावयाचे नाही दगलबाजी फार याप्रमाणे होऊन विडे आतर गुलाब होऊन निरोप घेऊन खाली उतरून गेले जयवंतराव मंत्रीचे पत्र आले होते त्याचा जाब लिहून त्याचे वकील कारकून बलवंतराव याजवल दिल्हे

वैशाख वद्य नवमी शुक्रवार छ २३ रजब

वैशाख वद्य दशमी सह यकादसी शनवार छ २४ रजब मिरज्या अबदबेग जमादार याचे पत्र आले स्वारी किल्याखाली आली माडीवर जामदारखान्यापुढे बैठक जाली आलपिष्टन व जरनेल मनोरा कर्नाटकातून आला तो विलायतेस जाणार सा। आलपिष्टन भेटीस आले तो व ग्राट यैसे तिघे आले स्वराज्य व सरदेशमुखी व चौथाई यकूण तीन फर्मान पारसी बादशाई पाहावयास दाखवावे ह्मणण्यावरून दाखविले नंतरी माहाराज बोलले सर्व भार इकडील तुह्मांवर आहे इकडील पदरचे मंडळ बहुत तटाईत कलेल तसा सांभाल करावा त्याजवर उतर केले की सर्व मजकूर लाटसाहेबास लिहिला गेला उतर आले नाही जरनेल मनोरा याचे भेटीकरिता निकडीने आलो लिहिले येईल तसे कलऊ नंतर विडे आतर गुलाब घेऊन निरोप पुण्यास जाण्याचा घेऊन आपले वाडियात गेले मल्हारराव चिटणीस व बलवंतराव चिटणीस आलपिष्टन याजकडे आपले सरजाम व ईनाम जत्फ बाजीराव याणी केले तेविसी बोलण्यास गेले आलपिष्टन व ग्राट व बालाजीपंत बसले होते पुसिले नंतरी आलपिष्टन याणी उतर केले आमचा दस्तुर चाल येक यक चालीने चालावयाचे त्यास बाजीराव याणी ज्याचे जत्फ केले आसेल ते जत्फ राहील चालविले ते ईनाम चालेल यैसे चालविले आहे त्याजवर याणी उत्तर केले की बाजीराव याणी आमचे सर्व जत्फ केले त्याजवरून मनात आणिले की साहेबाची दोस्ती व्हावी तरी च आमचे कल्याण त्यावरून बाजीराव आसता तीन वर्षे साहेबाचे दोस्तीचा प्रेत्न चालविला व कुपणी सरकारची व माहाराज सरकारची दोस्ती व्हावी हा यत्न चालविला बाजीराव यास कलते तरी मारले च जातो

कुंपणी सरकारची नौकरी केली साहेबाचे वचन हि आहे बाजीराव याणीच चालविले ते च चालवावयाचे तरी आह्मास फळ काय जाले त्याजवर उतर केले जत्फ ते चालवावे चालते जत्फ करावे येसे यक चालीने चालल्याविना कसे चालेल माहाराज याची बहुत चाकरी करावी मेहनत करावी कृपा करितील तेव्हा उतर केले माहाराजाची सेवा लस्करात प्रसंगीं जी जाली ती केली घोडीवरून उतरून तुरुकाकडे धाऊन साहेबास कलविले हि सेवा जाली तीन वर्षे कुंपणी सरकारची सेवा जाली आसे आसून साहेबाचे हे उतर तेव्हा आणखी सेवा करून फल होणे समजतच आहे साहेब काये करितील नसीब आमचे त्याजवर उतर केले को दोन्ही नौकरी कुंपणी सरकारची जाली बहुत सिपायगिरी केली विलायतेस लिहिली गेली चिंता नाहीं माहाराज सरकारचा बंदोबस्त होईल त्यांत काही महाराज कृपा करतील तुमचे किती आहे चालते किती जमा किती पुसिले ते सांगितले याद आहे काय पुसिले आहे ह्मणून रुमाल सोडिला तो आसूंद्या सांगितले बडोद्याचे वर्षासनाची चकदी दिल्ही परंतु काम झाले नाही सांगितले अद्यापी जाले नाही असे पुसोन पुण्यांत गेल्यावर चकदी देतो आतां लौकर होईल बोलले विडे देऊन निरोप दिल्हा नंतरी वाडियात चिटणीस येऊन वृत्त श्रुत केले रात्रौ वेंकट नरसी गाणे व हिरीचा नाच जाला दावलखान दामोदर गोरे याचे गाणे जाले देविदास याणी सारंगी पखवाज वाजविला नंतरी निद्रा जाली.

वैशाख वद्य ११ एकादशीसह द्वादसी रविवार छ २५ रजब किल्यावर स्वारी गेली सवीस हजार रुपये पैकी सहा हजार रुपये येणे राहिले ते आले.

वैशाख वद्य त्रयोदशी सोमवार छ २६ रजब

वैशाख वद्य चतुर्दसी मंगळवार छ २७ रजब

वैशाख वद्य अमावास्या बुधवार छ २८ रजब

जेष्ठ शु. १ प्रतिपदा गुरुवार छ २९ रजब सुरसन समान अशर मया तैन व अलफ बाजीराव प्रधान अशेरी प्रांतीं झाडींत गेले तेथे चहूकडून इंग्रेज याणी घेरले तेव्हां मलकण साहेब इंग्रेज बहादुर याजकडे बोलणे लाऊन लष्करांत जाऊन तहाचे बोलणे व्हावेसे ठरून खातरजमेस दोन गोरे साहेब आले आणि गेले इंग्रजाचे लष्करात दाखल जाले.

---

# भट पेशवे घराण्याची हकीकत.

## लेखांक ३.

( श्रीशिवाजी ) राज्यांचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी श्रीमंत संभाजी माहाराज त्यांचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी छत्रपती शाहु माहाराज याचे कारकीर्दीस श्रीमंत कैलासवासी विसाजीपंत यांचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब याणी येकनिष्टपणे पराकाष्टेची सेवा केली त्यांजवर कृपादृष्टी ठेऊन त्यांस ( शके १६३३ ) मध्ये सेनाकर्ते असा किताब दिल्हा नंतर त्यास कैलासवासी बहिरोपंत पिंगले याजकडील प्रधानकी काढून प्रधानकीची वस्त्रे सन खमस आशर मया व अलफ शके १६३६ जय नाम संवत्छरी दिल्ही त्यास प्रधानपद प्राप्त जाहाले पुढे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजी विश्वनाथ यांचे घराण्यातील पुरुषास कोणकोणाचे कारकीर्दीस प्रधानकीची वस्त्रे जाहाली ते व श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ यांस प्रधानकीची वस्त्रे जाहाल्या ता त्याचे घराण्यातील श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीराव रघुनाथ पर्यंत कोणकोणाच्या पुरुषाचे कारकीर्दीस काय काय जाहाले त्यातील हासील लिो जाते

वाका श्रीमंत कैलासवासी सिवाजी छत्रपती माहाराज त्याचे जवल श्रीमंत कैलासवासी परशरामपंत उपनाव भट कसबे श्रीवर्धन ताो मार प्रांत दंडा राजपुरी येथील देशमुख हे चाकरीस राहिले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी विसाजीपंत यास दोन हजार फौजेची सरदारी सांगितली

श्रीमंत कैलासवासी सिवाजी माहाराज छत्रपती सिवाजी राजे यास पुत्र दोघे. पहिलें श्रीमंत कैलासवासी मातुश्री सईबाई सौ ही निंबालकर यांची कन्या त्यांचे पोटीं श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती संभाजीराजे यांचा जन्म सन समान खमैन अलफ शके १५७९ हेमलंबी नाम संवत्छरे ज्येष्ट शु॥ १२ द्वादसी गुरुवारी दाहा घटकेस जाहाला ते बहुत खुबसुरत होते दुसरे श्रीमंत कैलासवासी मातोश्री सोइराबाई सौ ही सिर्के यांची कन्या त्यांचे पोटी शके १५८३ प्लवनाम संवत्छरे सन हसने सितैन आलफात चैत्र शु. ९ नवमीस श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती राजाराम सो जाहले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती सिवाजी राजे यांचा काल शके १६०२ रौद्र नाम संवत्छरे चैत्र शु. १५ सु॥ इहिदे समानीन आलफात तिसरे प्रहरी किले रायगड येथें जाहाला नंतर

त्याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती संभाजी राजे याजकडे राज्याची मालकता आली, ते सिव्हांसनारूढ शके १६०२ रौद्र नाम संवत्छरे वैशाख शु. १३ सु॥ इहिदे समानीम आलफात जाहले ते क्रूर त्यास चिरंजीव श्रीमंत कैलासवासी मातोश्री येसुबाई सो। हो शिर्के यांची कन्या त्यांचे पोटी शके १६०४ दुंदुभी नाम संवत्छरे सन सलास समानीन आलफांत श्रीमंत कैलासवासी सिवाजी माहाराज जाहाले त्या समई त्यांचे आजे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती सिवाजी राजे याचे नाव ठेविले श्रीमंत कैलासवासी माहाराज संभाजी राजे ते क्रूर त्याणी आपले पदरचे कितेकाच्या अबरू घेतल्या व काही मारले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती संभाजी माहाराज यास केशवभट कबजी ह्मणोन कोणी हिंदुस्थानी ब्राह्मण मांत्रिक होता त्याणे वस्य केले तो सांगतो तसे करावे असा प्रकार जाहला जिनतमकान आलीशान बुलंद अलका व औरंगजब पातशाहा याचे दिमंत या समई आपला काबू साधेल असे येऊन पदरी इखाची बेग ह्मणोन होता त्याजबरोबर फौज देऊन पाठविले त्याणे फौज मागे ठेऊन काही लोक बरोबर घेऊन कारस्थानाने श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती संभाजी राजे यांस कोकणांत कसबे संगमेश्वर तालुका रत्नागिरी प्रांत राजापूर येथे धरून औरंगजब पातशाहा जवळ सन तिसा समानीन आलफांत शके १६१० विभव नाम संवत्छरे चैत्र मासी नेले त्यास पातशाहा याणी बाटतोस की काय या अन्वये विच्यारिले त्याचा जबाव तुमची बेटी बेगम दिल्यास बाटतो ह्मणोन त्याजवरून गैर अदबी बोलला सबब पातशाहा यास राग येऊन त्याचे डोले काढिले त्याचा + + + फाल्गुन वा। ३० शके + + + म संवत्छरे सु॥ तिसैन आलफांत तुलापूर भिमातीर न + + + शाहाजादी बेगम इचे ह्मणणे पडले की त्याला ब + + + ह्मणोन विचारिले तेव्हा त्याचे जातीवर गोष्ट गुजरती सबब त्याणे मला दिल्ह्यास बाटतो ह्मणोन ह्मणाला यात त्याचा गुन्हा नाही माझे करिता त्याची असी गत जाहली तोच आपला खावंद इतःपर लग्न करावयाचे नाही या प्रो पातशाहाकडे सांगून पाठविले

श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे यांचे चिरंजीव ते व त्याची मातुश्री श्रीमंत कैलासवासी येसुबाई साहेब व श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे यांचे सावत्र बंधु धाकटे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब हे व त्याच्या बायका पहिली बायको श्रीमंत कैलासवासी

मातुश्री सगुणाबाई ही प्रतापजी गुजर परदूर देशमुख याची कन्या ती पुर्वीच आली नंतर तीन लग्ने केली त्या पौ पहिली श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब ही—मोहिते याची कन्या दुसरी श्रीमंत कैलासवासी मातुश्री राजसबाई साहेब ही घाटगे याची कन्या तिसरी श्रीमंत कैलासवासी मातुश्री अहिल्याबाई साहेब ही बारसी पानगावकर—निंबालकर—याची कन्या असे रायगडास होती सर्वांनी येक ठिकाणी राहाणे चांगले नव्हे हा विचार करून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी महाराज यांचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे व त्याची मातुश्री यास तेथे ठेऊन श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब हे आपल्या बायका सुद्धां निघोन पन्हाला किला मजबूत सबब तेथे आले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे व त्याची मातुश्री असी रायगडास होती पादशाहाजवल झुलपुकार ह्मणोन होता त्याजबरोबर फौज देऊन रायगडास पाठविले त्याणे मोर्चे बसविले काही दिवस किला लढला नंतर पातशाहाजादी बेगम इच्या दरम्यानदारीने श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे व त्याची मातुश्री आसी किल्यावरून उतरली त्यास पातशाहा जवल नेले पादशाहाजादी बेगम इणे उभयतास आपले जवल नेले आटक होती श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे याचे पालग्रहण पादशाहाजादी बेगम इणे पुत्र म्हणोन केले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब हे पन्हाळ्यास आले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याणी फौज वगैरा जमा करून पादशाहाचे फौजेसी लढाया केल्या छापा घालून चंदीचंदावराकडे गेले त्याचे वगैरा जाहले प्रकाराचे + + बखरीत आहेत त्यातील हांसील कारणापुरते सदरी लिो आहे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती राजाराम साहेब यांचा काल माघ वद्य ९ शके १६२१ प्रमादीनाम संवत्छरे सुरु मया आलफात सिंव्हगडास जाहला त्याची पहिली बायको किंवा दुसरी बायको श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब यांचे पोटी पुत्र जाला होता त्याचे नांव तिणे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती सिवाजी राजे यांचे ठेविले ते भ्रांत तिसरी बायको श्रीमंत कैलासवासी मातुश्री राजसबाई साहेब तिचे पोटी पुत्र जाहला त्याचे नाव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपती संभाजी राजे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे त्याचे डोले बादशाहाने काढले त्याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजीराजे ते पातशाहाचे

प्रतिबंधात होते ते मालक त्याची मुक्तता व्हावयाची नाहीं हे समजून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब यांचा काल जाहला नंतर श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब याणी आपला लेक श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजीराजे भ्रांत यांस घेऊन सातारेस जाऊन काही दिवस राज्य केले जिनत मकान आवरंगजब पादशाहा याचा अंतकाल होण्याचा समय प्राप्त जाहला बेगम ही पादशाहापासी जाऊन श्रमी होऊ लागली त्या समई जिवतमकान आवरंगजब याणी विच्यारिले कीं श्रमी व्हावयाचे कारण काय तेव्हा बेगम हिणे विनंती केली कीं दो गोष्टी विंसी मी श्रमी होते दोन गोष्टी कोणत्या आपला सारखा सार्वभौम पिता आपणास मृत्यू समय आणि माझा पुत्र बंदीस या गोष्टी विंसी श्रमी हे ऐकून पातशाहा बिछान्यावर निजले होते बेगम इजपासी बोलले कीं आम्हासाठीं तुम्ही श्रमी होता हा मृत्युलोक शत वर्षे वाचले असतां मृत्यू आहेच तुम्ही श्रमी होऊ नये बेगम हिणे अर्ज केला की आपण सार्वभौम दिलीपति आपल्या राज्यात मराठे यास गनिम म्हनतात माझा पुत्र कैदेत आहे त्यास आपल्या मागे गनीमच म्हणतील त्याजवरून पादशाहा बोलले कीं दक्षणेत साडे साहा सुभ्यात याचा घोडा गनीम न म्हणता फिरावा असें करून देतो माझे तिघे पुत्र तू कन्या चवथी चौथाई तुझे हिश्शेची तुझ्या पुत्रास दिल्ही माझे पुत्रास वतन नाहीं म्हणोन बेगम हिणे म्हटल्यावरून साडे साहा सुभ्यामध्यें सर देशमुखी वतन दर शेंकडा रु. १२॥ प्रो अशा सनदा करून त्या सनदेच्यामागे आपले हाताचे पंजे आळत्याचे उठविले त्या सनदा व मुदपाकातून सगळी रोटी आणवून त्या पैकीं अर्धी रोटी आपल्या जवळ ठेऊन अर्धी रोटी श्रीमंत कैलासवासी माहाराज संभाजी राजे याचे पुत्र श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे याची वर्तणूक पादशाहाचे हुकुमाप्रमाणे सबब त्यास पादशाहा साहू म्हणत त्यास बोलावून आणून त्याचे ओझ्यांत घालून मस्तकी हात ठेऊन बहुत दिवस राज्य करसील असा आर्सिवाद दिल्हा आपल्या मागे यास मुक्त करावे याप्रो आपले चिरंजीवास व वजीर यास हुकूम सांगितला नंतर पादशाहा यांचा काल शके १६२८ व्यय नाम संवत्छरे सन सबा मया व आलफांत माघ मासिं नगरात जाहला जिनत मकान जाहले मंतर पादशाहा मागे जिनतमकान बुलंद आलकाब सुलतान महमदशाहा पादशाहा याणी श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचा बहुमान करून लाऊन दिल्हे ते देशी आले श्रीमंत

कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब याजकडून फौजेत धनाजी जाधवराव म्हणोन होते त्याचे लस्करात श्रीमंत कैलासवासी विसाजीपंत याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ यांस नानासाहेब म्हणत ते चाकरीचे इराद्याने आपले लोकानिसी होते मामलतीचा वेव्हार करीत असत श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे देसी आल्यानंतर श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब याणी तिकडे ( भेटीस ) येऊन राजकारण राखले. श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ सो ही साताऱ्यास होती तिणें श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याजवर धनाजी जाधवराव यास फौज सुद्धा पाठविले त्याजबरोबर खंडो बल्लाल चिटणीस हे होते. त्याचा व श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ नानासाहेब यांचा स्नेह त्याजकडून जाधवराव यास धनी याजबरोबर लढावे हे चांगले नाहीं असा उपदेश करविला लौकिकार्थ जाधवराव याचे फौजेची व श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याजकडील फौजेची लढाई जाहली धनाजी जाधवराव याणी तोंड काढले श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ सो याणी आपला लेक श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे भ्रांत त्यासहवर्तमान साताऱ्याहून निघोन पन्हाळ्यास आली श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याणी सातारे वगैरेचा बंदोबस्त केला धनाजी जाधवराव हे येऊन श्रीमंत माहाराज छत्रपति शाहू राजे यांस भेटले त्यास ठेविले त्यांचा काल जाहाल्यानंतर त्याचे चिरंजीव चंद्रसेन जाधव याजकडे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याणी सेनापति पद देऊन वस्त्रे वगैरे दिल्ही श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ नानासाहेब हे चंद्रसेन जाधवराव याजवल आसेत येके समई लस्करचे कुच जाहाले स्व पडली त्यांत हरण उठले त्याचे मागे पिराजी राऊत म्हणोन श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ याजकडील लोकात सिलेदार होता तो लागला पुढे मुकाम होऊन डेरे राहुट्या रोवल्या होत्या त्यात व्यासराव म्हणोन ब्राम्हण चंद्रसेन जाधवराव याजकडील होता त्याचे राहुटीत × × व्यासराव राहुटीचे तोंडी उभे राहिले तो पिराजी राऊत राहुटीचे जवल आला व्यासराव यांस म्हणो लागला की आमची सिकार द्यावी तेव्हा व्यासराव म्हणो लागले आम्ही ब्राह्मण आमचे राहुटीत हरण येऊन पाठसी पडले देत नाही म्हणोन उभयता आग्रहास पडले पिराजी राऊत याणे भाला टाकिला तो व्यासराव यांस लागला पिराजी राऊत निघोन श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ

नानासाहेब याजकडे जाऊन वर्तमान सांगितले असी गोष्ट वडली या उपरी बच्याव करणे आपणाकडे आहे हे वर्तमान जाधवराव यांस समजले ब्राह्मणावर जखम सिकारीसाठी केली हे अयुक्त जाहाले त्याचे पारपत्य करावयाचे असे ठराऊन श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ नानासाहेब यांस सांगून पाठविले कीं तुम्हाकडील स्वाराने ब्राह्मणावर जखम केली त्यास पाठवून द्यावा चौकसी करून सिक्षा करावयाची तेव्हां श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब याणी सांगून पाठविले त्याणे जखम केली हा अपराध खरा परंतु आमचे पाठीस पडला त्या आर्थी क्षमा करावी पारपत्य करणे तैनात बुडिवणे वालवणे ते आम्हीच करितो असे सांगून पाठविले असतां चंद्रसेन जाधवराव हे आग्रहास पडले त्याचे पारपत्य करण्याचे त्यास पाठऊन द्यावे म्हणोन श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब ही आग्रहास आले श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब याणी पिराजी राऊत यास हाती न दिल्हा तरी त्यास लुटावे असा बेत जाधवराव याणी केला हें वर्तमान श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब यास कलताच त्यानी आपले लोकाची तयारी करून कूच करून निघाले ते पुरंदर किल्याचे आश्रयास जाऊन आबाजीपंत पुरंधरे याचे हातून सचिव यांसी राजकारण करून राहिले जाधवराव हे कूच करून बारामतीवरून सुपे येथे येऊन सचिव यांस सांगून पाठविले कीं बालाजी विश्वनाथ यास तुम्ही आश्रा देऊं नये दिल्हा असता तुमचे मुलकाची खराबी होईल त्याजकडून सचिव याणी श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासाहेब यास सांगून पाठविले की तुमचा परिणाम येथे लागणार नाही त्याजवरून आबाजीपंत पुरंधरे या सहवर्तमान कूच करून धुमाल म्हणोन आडनांवाचे सिलेदार होते त्याचे घर परिंचे येथे होते त्या खिंडीने उतरून आणखी जमाव करून नीरेवर आले तो जाधवराव याणी काही लोक आडवे रवाना केले त्याची गाठ नीरेवर पडली लढाई जाहाली जाधवराव याजकडील फौज भारी आपला परिणाम लागणार नाही हा असा विचार चितांत आणून पांडवगडाची माची थोर जागा बिकट तेथे फौजसहीत दमखावा श्रीमंत माहाराजास जाहाल्या माराचे विनंतीपत्र पाठवावे असा मनसबा करून आबाजीपंत पुरंधरे याजबरोबर विनंतीपत्र देऊन पाठविले खंडो बलाल चिटणीस याचा व पुरंधरे याचा स्नेह होता यांचे विद्यमाने श्रीमंत माहाराजास विनंतीपत्र देऊन विनंती केली की बालाजी विश्वनाथ ब्राह्मण कर्ते सिपाई मोठे माणूस याजवर

प्रसंग प्राप्त जाहला स्वामीस शरण आले अभय देऊन रक्षिले पाहिजे त्यावरून श्रीमंत माहाराज याणी बालाजी विश्वनाथ यांजकडून उपयोग बहुत जाला सरकार चाकरीचे उपयोगी हे जाणून त्यास अभयपत्र देऊन हुजूर येणे विशी आज्ञा केली हे वर्तमान चंद्रसेन जाधवराव यास समजले त्यावरून श्रीमंत माहाराजास विनंतीपत्र पाठविले कीं बालाजीपंत यास स्वामींनी आश्रय दिल्हा असतां आम्हास माहाराजाचे पाय आंतरतील आम्हास त्याचे पारपत्य केल्यावाचून राहावयाचे नाही म्हणोन त्याचे उत्तर श्रीमंत कैलासवासी छत्रपति शाहू माहाराजानी लिहून खंडो बलाल चिटणीस यास बहुत प्रकारे पर्याय सांगून त्याजकडे रवाना केले त्याणी जाधवराव यास बहुत प्रकारे बोध केला परंतु त्याचा आग्रह स्वाधीन करणे विसी पडला खंडो बलाल चिटणीस माघारे येऊन श्रीमंत माहाराजास विनंती केली श्रीमंत माहाराजानी हैबतराव निंबाळकर सरलस्कर यास पत्रे पाठविली जे सेनापतीस सरकारासी विरुद्ध करण्याची बुद्धि निर्माण जाहाली आहे तर तुह्मी आपला जमाम असेल तो व नवीन जमाव करून सेनापतीस मोकाबला द्यावा इकडून हुजरातची फौज ही तुम्हापासी येऊन पावेल म्हणून आणि सरदार रवाना केले सरलस्कर फलटणावरी येऊन उतरले हे वृत्त चंद्रसेन जाधवराव यास समजलियावर पांडवगडचा रोख सोडून जाधवराव दहीगाव देऊर याजवर आले सरलस्कर यासी श्रीमंत माहाराजाची आज्ञा घाटावर येण्या विसी गेली ते आदरखीचा घाट चढून कुलकुंजचे मु॥ आले तो जाधवराव हे ही घाट चढून चालून आले ते समई जाधवराव यास पुन्हा श्रीमंत माहाराजानी सांगून पाठविले जे तुम्ही सरकारची अवज्ञा करावी सरकार फौजेसी लढाई करावी हे तुमचे सेवाधर्मास विहित नाहीं तत्राप जाधवराव विच्यारावर न येत लढाई करावी हाच आग्रह पाहून श्रीमंत माहाराज छत्रपति याणी सरलस्कर यास पत्रे पाठविली की जाधवराव लढाईस आलियावरी तुम्हीही लढाई द्यावी आणि सांगून पाठविले की आणखी हुजरात पागा वगैरे कुमकेस रवाना केल्या आहेत जाधवराव यासी लढाई करावी त्याजवरून सरलस्कर याणी लढाई केली त्या समई श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासो याणी जुमामर्दी बहुत केली जाधवराव याजकडील फौजेचा मोड जाहला श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासो हे कर्ते पराक्रमी ही कदर जाणोन त्याजवर नेक निगा मेहरबानगीची ठेऊन त्यास श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहुराजे याणी सेनाकर्ते असा किताब शके १६३२

विकृतीनाम सवत्छरे सुरु इहिदे असर मया व आलफात दिल्हा. चंद्रसेन जाधवराव हे निघोन मोगलाईत गेले राजकारण करून नबाबास भेटले कैलासवासी बहिरोपंत पिंगले याजकडे प्रधानकी होती त्यांस आंगरे सरखेल यांचे बंद तास पाठविले होते पिंगले यांस अंगरे याणी धरून आटकेत ठेविले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याणी श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ सेवाकर्ते यास अंगरे याजवर पाठविले त्याणी अंगरे यास बोध करून कारस्थानाने बहिरोपंत पिंगले यांस सोडून घेतले अंगरे यास आणून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याची भेट करविली अंगरे यास आपलेसा करून त्यास राखले श्रीमंत कैलासवासी छत्रपति शाहू राजे याणी बहिरोपंत पिंगले याजकडील प्रधानकी काढून श्रीमंत कैलासवासी बालाजी विश्वनाथ सेनाकर्ते यास प्रधानकीची वस्त्रे सन खमस असर मया व अलफ शके १६३६ जय नाम सवछरी माघ मासि दिल्ही सिरस्त्याअन्वये बहुमान जाहला त्यास प्रधान पद प्राप्त जाहले सदरी लिहिलेला प्रकार बखरी वगैरे व माहिती समजून घेऊन त्यातील हासील हासील लिहिला आहे श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान बालाजी विश्वनाथ सेनाकर्ते यास प्रधानपद शके १६३६ जय नाम सवत्छरी प्राप्त जाहले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याचे जवल सन आशरीन मया व आलफ शके १६४१ विकारी नाम संवत्छरे सिव्हस्थी आमचे आजे ती॥ कैलासवासी गोविंद हरी उपनाव पटवर्धन ग्रामोपाध्ये मौजे कोतवडे कर्यात नेवरे तालुके रत्नागिरी प्रांत राजापूर चाकरीस राहिले श्रीमंत कैलासवासी नारो महादेव उपनाव जोसी याजकडे म्हापण येथील कुलकर्णीपणाची वृति हे कैलासवासी संताजी घोरपडे सेनापति हे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति याचे पदरचे त्याचे जवल चाकरीस राहिले त्याणी पराक्रम बहुत केला त्यास घोरपडे याणी चिरंजीव ह्मटले ते श्रीमंत नारो महादेव हे दौलत संपादन कर्ते श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजी विश्वनाथ नानासो याची स्त्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री राधाबाई साहेब ही कैलासवासी दादोपंत बर्वे कठोरेकर याची कन्या त्याचे पोटी चिरंजीव दोघे वडील चिरंजीव श्रीमंत कैलासवासी बाजीराव साहेब दुसरे श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासाहेब व कन्या दोघी पहिली श्रीमंत कैलासवासी मातुश्री भिऊबाईसो ही कैलासवासी अबाजी गणेश जोसी बारामतीकर यास दिल्ही दुसरी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनुबाई ही श्रीमंत कैलासवासी नारायणराव घोरपडे इचलकंजीकर हे

दौलतदार सा। त्याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी व्यंकटराव घोरपडे यास दिल्ही तिचे नाव घोरपडे यांचे येथील येसूबाई श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान बालाजी विश्वनाथ नानासो। याणी स्वाऱ्या व पराक्रम बहुत केला व हिंदुस्थानातील राजे रजवाडे व पुंड पालेगार याची पारपत्ये केली खंडण्या घेतल्या व मुलूक सोडविला त्याचा काल सन इहीदे असरीन मया व आलफ शके १६४२ शार्वरी नाम सवत्छरे चैत्रमासी शु॥ ७ पुरंधर नजीक सासवड येथे जाहला नंतर त्याचे वडील चिरंजीव श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान बाजीराव साहेब याजकडे मालकता आली त्यास प्रधानकीची वस्त्रे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचेच कारकिर्दीस सन मजकूर सन इहिदे असरीन मया व आलफ शके १६४२ शार्वरी नाम संवछरे छ २९ जारवर वैशाख शु. १ प्रतिपदा वारी जाहली सिरस्त्या अन्वये दागिने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो। यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री कासीबाईसो। ही कैलासवासी माहादाजी कृष्ण जोसी चासकर याची कन्या त्यास पुत्र तिघे वडील पुत्र याचा जन्म सन शके १६४३ मार्गशीर्ष वद्य १३ सह १४ स जाहला त्यास श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीराव साहेब याणी आपले वडिलाचे नाव ठेविले ते श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासो। दुसरे पुत्र यांचा जन्म शके १६५६ श्रावण शु. १३ शीस जाहला त्याचे नांव श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो। तिसरे पुत्र याचा जन्म सन समान असरीन मया व आलफ शके १६४९ प्लवंगनाम सवत्छरे त्याचे नाव श्रीमंत कैलासवासी जनोबासो। श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपा साहेब याची प्रथम पत्नी श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री रखमाबाईसो। ही कैलासवासी त्रिंबकराव विश्वनाथ पेठे याची बहीण त्याचे पोटी श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसाहेब आधिक भाद्रपद शु. २ भौमवारी शके १६५२ साधारण नाम सवत्छरे सन इहिदे सलासिन मया व आलफात जाहले ते सोनपत पानपतास गारद जाहले व कन्या येक तिचे नाव बयाबाई ती गंगाधर नाईक ओंकार यास दिल्ही श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री रखमाबाईसो। यांचा काल जाहल्यानंतर दुसरे लग्न केले. तिचे नाव श्रीमंत कैलासवासी मातोश्री अन्नपुर्णाबाई ही कैलासवासी मोरो भिकाजी थते यांची कन्या श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीराव साहेब याचे वडील चिरंजीव श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासो। याचे लग्न माघमासी शके १६५१ सौम्य नाम सवत्छरे सुरु सलासीन

मया व आलफात जाहले त्याची पत्नी ही कैलासवासी भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या तिचे नांव श्रीमंत कैलासवासी मातुश्री गोपिकाबाईसो श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान बाजीरावसो याणी आपले वडील चिरंजीव श्रीमंत कैलासवासी बालाजीपंत नानासो याचे खास पथक म्हणोन केले होते त्याचे नावे सिके कटार केली होती त्यात 'राजा शाहू चरणी दृढभाव बालाजी बाजीराव' असी असरे. त्याजकडे प्रधानकी नवती; स्वता श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो दिलीस गेले. हिदुस्थान वगैरा येथील राज रजवाडे पुंड पालेगार याची पारपत्ये केली व खंडण्या घेतल्या व मुलुक सोडविला. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो शके १६५२ साधारण नाम सवत्छरे सन इहिदे सलासीन मया व आलफात सन ११४० छ १८ साखर आश्वीन मासी स्वारीस निघाले बरोबर फौज व पागा व सरदार व सरंजामी मिलोन तिस पसतीस हजार अजमासे फौजेनिसी गुजराथ प्रांती गेले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू माहाराज याचे पदरचे कैलासवासी त्रिंबकराव दाभाडे सेनापति हे चालीस पनास हजार अजमासे फौज घेऊन चालून आले. श्रीमंत पंत प्रधान याजकडील फौज चालून आली. लढाई मातबर जाहली. दाभाडे अंबारीतून तिरंदाजी करीत होते. त्यास गोळी लागोन ठार जाहले. फौज मोडली. श्रीमंत पंत प्रधान याची फते जाहाली. नंतर तह श्रावणमासी जाहला. त्या सालापासून पुण्यात श्रावण मासचे देकारास प्रारंभ. त्याचे दुसरे वर्षी शनवारचे वाड्यास प्रारंभ. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो याचे कारकिर्दीत श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासो याणी सातपुड्यातील पालेगार होते त्यास व दर्यावहादूर यांस बुडविले. बहुत जुमामर्दी करून वसई सन तिसा सलासीन मया व आलफात शके १६६१ सिध्धार्थि नाम सवछरे वैशाख व. २ रविवारी छ १५ सफरी घेतली. उभयता बंधु पराक्रमी होते. त्याणी पराक्रम बहुत केला. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजी विश्वनाथ नानासो याचे जवल कैलासबासी गोविंद हरी उपनाव पटवर्धन हे चाकरीस राहिले. तो प्रकार सदरीं लि॥ आहे. चाकरीस राहिल्याता सरकार हुकुमा बरहुकुम आकरा वर्षे चाकरी येकनिष्टपणे केली. ही कदर जाणोन बारावे वर्षी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो याचे कारकीर्दीस पागा दिल्ही. ती पागा इंद्रोजी कदम याजकडे सरकारांतून होती ती श्रीमंत कैलासवासी पंतप्रा बाजीरावसो याचा काल सन आबैन मया व आलफ शके १६६२ रौद्रनाम सव-

त्छरे वैशाख शु. १३ त्रयोदसीस छ १२ सफर सु॥ काकड प्रांत रावेर रेवातीरी हिंदुस्थानात जाहला. मर्दाना घाट तेथे त्याचे दहन जाहले. नंतर त्याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासो याजकडे मालकता आली. त्यास श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचेच कारकिर्दीस प्रधानकीची वस्त्रे सन इहिदे आरबैन मया व आलफ शके १६६२ रौद्रनाम सवत्छरे श्रावण मासी जाहली. सिरस्त्या अन्वये बहुमान जाहला. त्याच शकीं श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो यांचे कनिष्ट बंधु श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासो यांचा काल छ ९ सवाल सन इहिदे आरबैन मया व आलफ शके १६६२ रौद्रनाम सवत्छरे पौष शु. ११ गुरुवारी पुणे मुकामी जाहला. त्यांची द्वीतीय पत्नी श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री अन्नपूर्णाबाई ही कैलासवासी मोरो भिकाजी थते याची कन्या, तो प्रकार सदरीं लि॥ आहे ती आपले खावंदा सुध्धा पातकापासून मुक्त होऊन चवदा इंद्र होईजे पर्यंत स्वर्गवास हा लाभ जाणोन सहगमन गेली. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासो याणी आपणास प्रधानकीची वस्त्रे जाहल्यावर आपले पथकाची सरदारी व आपले नावाची सिके कटार, त्यांत 'राजा शाहू चरणी दृढभाव बालाजी बाजीराव' असी अक्षरे तो प्रकार सदरी लि॥ आहे, ती॥ कैलासवासी गोविंद हरी यास दिल्ही. गोविंद हरी यास पुत्र च्यार; वडील कैलासवासी गोपालराव दुसरे कैलासवासी वामनराव बाबा तिसरे कैलासवासी पांडुरंगराव तात्या चवथे कैलासवासी गंगाधरराव. श्रीमंत कैलासवासी नारो माहादेव घोरपडे हे दौलत संपादन कर्ते त्याचे येथील पुरोहीतपणाची वृती वेदमुर्ती कैलासवासी हरभट बाबा याणी संपादन केली. श्रीमंत नारो महादेव याचे चिरंजीव श्रीमंत व्यंकटराव घोरपडे याचे जवल कैलासवासी गोविंद हरी याचे धाकटे बंधु कैलासवासी रामचंद्रपंत आपा हे असत. श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासो याणी सन तिसा सलासीन मया व आलफात वसई घेतली तो प्रकार सदरी लि॥ आहे. त्या स्वारीस बरोबर इचलकंजीकर यजमान श्रीमंत व्यंकटराव घोरपडे होते; त्याजबरोबर होते. त्याणी जवामर्दी बहुत केली. पुढे त्यांचे व इचलकंजीकर यजमान याचे बनेनासे जाहले त्यास श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासो यास विनंती करून ती॥ गोविंद हरी याणी × × × × आणीले. त्यास रेवदंडेकर हपसी सिदी सात याचे लढाईत सरकार कामावर उजवेहातास गोळीची जखम लागली.

त्याजकडे पागा दिली. त्याचे निा।स स्वार करून दिलेले सदरी लि॥ अन्वये रामचंद्रपंत आपा याजकडील पागा व निा।स स्वार ते गोविंद हरी याचे निा।स लाऊन दिल्हे. आकलकोटकर भोसले याचे पदरी गोविंद हरी याचे वडील बंधु कैलासवासी त्रिंबकपंत आपा होते. त्याजकडे आकलकोटकर याचे येथील मजमुचे काम त्यास ही सरकार आज्ञेकरून गोविंद हरी याणी सन...आणीले त्यास तैनात करून देत होते. त्याणी आपण भोसले यांचे पदरी तैनात करून घेतली असता बद मामलीपणासबब करून घेतली नाही. स्वार निसबतीस करून देत होते, त्यास त्याणी आपले चिरंजीव कैलासवासी निलकंठराव दादा याचे नाव लाविले. त्यातच त्याचे घरची पागा त्यास जातीस तैनात नाही. निलकंठराव दादा याचे निसबतीस स्वार करून दिले. त्यातच त्याणी आपली पागा केली होती ती त्या सुध्धा त्यास गोविंदपंत नानासो याचे निसबतीस लाऊन दिल्हे. गोविंद हरी याचे चिरंजीव गोपालराव याणी श्रीमंतास विनंती करून कैलासवासी बाळंभट चिपळोणकर याचे चिरंजीव कैलासवासी बाजीपंत हे मर्द सरकार कामास उपयोगी त्यास पागेची वस्त्रे सन तिसा खमसैन मया व आलफांत छ ६ मोहरमी शके १६८० बहुधान्य नाम सवत्छेरे भाद्रपद शु. ८ रविवारी देविली. जसे उभयताचे निसबतीस स्वार करून दिल्हे. त्या सुद्धा त्यास गोविंद हरी याचे निसबतीस लाऊन दिल्ही तसी मा।रनिल्हे बाजी बलाल याजकडील पागा त्या सुध्धा त्यास निसबतीस लाऊन दिल्ही. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब सन आर्बैन साली स्वारी कर्नाटकात गेली. सावनूरास मोर्चे लाविले सावनूरकर नबाब जिनत मकान अबदुल हकीमखान याजकडील मुजाफरखान यांचा मोर्चा सावनूरचे नजीक टेकडीवर होता त्याजवर हला करून टेकडी घेतली त्या समई गोविंद हरी याचे वडील बंधु कैलासवासी कृष्णभट बापाजी त्याचे वडील चिरंजीव कैलासवासी नारायणराव नाना दुसरे चिरंजीव कैलासवासी पुरुषोत्तमराव दाजी यास तीराची जखम लागली व नबाबाकडील तह होऊन त्याजकडील बेवीस माहाल पैकी आकरा महाल घेतले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नानासो याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री गोपिकाबाईसो ती कैलासवासी भिकाजी शामजी नाईक रास्ते यांची कन्या तिचे पोटी पुत्र तिघे वडील श्रीमंत कैलासवासी विश्वासराव सो याचा जन्म शके १६६४ दुंदुभी नाम संवत्छेरे जाहला दुसरे श्रीमंत कैलासवासी माधवराव साहेब याचा जन्म श्रावण शु. २ शके

१६६७ क्रोधननाम संवत्छरी जाहला तिसरे श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो याचा जन्म शके १६७७ युवा नाम संवत्छरी जाहला, श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासो याचे तिसरे बंधु श्रीमंत कैलासवासी जनोबासो यांचा काल शके १६६८ क्षय नाम संवत्छरे जाहला, त्याचे नकल. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याचे पोटी पुत्र नाही शरीरप्रकृति क्षीण जाहली त्यांचा काल जाहला नंतर श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब याणी श्रीमंत कैलासवासी राजारामसाहेब यास आणून शाहू माहाराज याचे दत्त-पुत्र केले, ते कोणाचे कोणते व त्या प्रकर्णी जाहाली व्यवस्था नजरेस यावया-करिता लि॥ जाते. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो याची द्वितीय पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब यांचे पोटी श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजीराजे ते भ्रांत. दुसरी बायको श्रीमंत कैलासवासी मातुश्री राजसबाई तिचे पोटी श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी माहाराज. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब यांचा काल जाहाल्या-नंतर त्याची प्रथम पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊ साहेब याणी आपला लेक श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे भ्रांत यास घेऊन काही दिवस साताऱ्यास राज्य केले. तेथून श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसो हीं आपला लेक श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजीराजे भ्रांत यास घेऊन पन्हाळ्यास आली. याचे सबबेचा प्रकार सदरी लि॥ आहे. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे भ्रांत यांचा काल जाहला, त्याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री अंबिकाबाई साहेब ही दाजीबा घाटगे बुधकर याची कन्या. ती गरोदर होती श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे भ्रांत यांचा काल जाहला नंतर त्याचे सावत्रबंधु श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे याजकडे मालमता आली. त्याची मातुश्री श्रीमंत कैलासवासी राजसबाई-सो ती श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसो याची सवत श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसो याणी आपला चिरंजीव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे भ्रांत हे वारले त्यांची पत्नी गरोदर तिला सवतीचे भयास्तव आपला लेक श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजीराजे भ्रांत यांची कन्या कैलासवासी दर्याबाई निंबालकर इजकडेस बारसी पानगांवास पाठविली. कैलास-वासी उदाजी चव्हाण हे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजीराजे यांचा

आश्रा करून सातारा इलाख्यात स्वाऱ्या करूं लागले. सा सातारे येथून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याणी चव्हाण याचे पारपत्यास श्रीमंत कैलासवासी श्रीपतराव प्रतिनिधी याची रवानगी केली हे वर्तमान श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे यांस कळले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी हे कुटुंबसुद्धा वडगांव तालुके करवीर येथे होते. चव्हाण यांची बातमी राखून श्रीमंत पंत प्रतिनिधि याणी गाठ घातली. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे याणी चव्हाण यांची कुमक केली. लढाई होऊन श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजीराजे यांचा व चव्हाण यांचा मोड जाहला. तेव्हा सडे उभयता निघोन गेले. बुणगे काही लुटले. डेऱ्यांत श्रीमंत कैलासवासी राजाराम साहेब यांची प्रथम पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसो व दुसरी श्रीमंत कैलासवासी संभाजी माहाराज यांची मातुश्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री राजसबाईसो व श्रीमंत कैलासवासी संभाजी माहाराज यांची स्त्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री जिजाऊसो ही सापडली त्याचा बंदोबस्त श्रीमंत पंत प्रतिनिधी याणी राखून जवल जाऊन आपण धनीच आह्मा सातारेस माहाराजाचे भेटीस चलावे ह्मणोन विनंती केली पुढे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यास वर्दी कलविली. श्रीमंत पंत प्रतिनिधि याणी यश संपादून सर्वत्रास सातारेस घेऊन गेले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे हे पुढे सामोरे येऊन भेटले आणि यायोगे तरी उभयता वडिलाच्या व सर्वत्राच्या भेटी जाहल्या म्हणोन बोलून बहुत सत्कार केला. ठिकाणास घेऊन गेले. मेजवान्या होऊन वस्त्रे अलंकार देऊन सांगितले जे, जावयाची मर्जी असल्यास जावे, ही जागा आपलीच आहे. तेव्हा श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसाहेब बोलली जे कोठेही राहिल्यास येकच आहे. ते व तुह्मी मजला सारखेच. मी येथेच राहणार त्याजवरून श्रीमंत कैलासवासी मातुश्री ताराऊसो याच्या खर्चाचा बंदोबस्त करून देऊन ठेऊन घेतली. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजी राजे यांची मातुश्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री राजसबाई साहेब व स्त्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री जिजाऊ साहेब यांस सरंजाम देऊन श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संभाजीराजे त्याजकडे + + + कैलासवासी मातुश्री ताराऊ... लिहिला आहे तिला पुत्र जाहला त्याचें नांव श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब ह्मणोन ठेविले त्यांचे संगोपन श्रीमंत कैलासवासी ताराऊसो

याणी गुप्त रुपे केले तो प्रकार श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांस समजला माहाराज यांची प्रकृति क्षीण जाहाली यास्तव त्यास आणण्याकरितां श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहूराजे याणी खंडेराव कासी न्यायाधीश यास पानगावास पाठविले ते येऊन पोहचले नाहीत श्रीमंत कैलासवासी शाहू माहाराज यांचा अंतकालचा समय प्राप्त जाहाला त्यासमई श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब यांजवल बोलाऊन सर्व निरवानिरव करून सिके कटार हवाली केली आणि मस्तकी हात ठेविला माझा दिवा लागावा राज्याचा बंदोबस्त करून राज्य चालवावे असें आन्वयाची आज्ञा केली नंतर श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचा काल सन ११५९ खमसैन मया व आलफ शके १६७१ शुक्ल नाम संवत्छरे मार्गशीर्ष शु. ९ ते दिवसी सातारे मुकामी जाहला दहन माहुली संगमी जाहले. श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री सकवारबाई साहेब ही पति सहवर्तमान चवदा इंद्र होईजे पर्यंत स्वर्गवास होतो हा लाभ जाणोन सहगमन गेली श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहु राजे यांचा दिवा लागावा याजबदल दर्याबाई निंबालकर याजकडेस पदरच्यातील संभावित याजबरोबर फौज वगैरे सरंजाम देऊन पानगावास पाठविले तो प्रकार सदरी लिहिला आहे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचे आज्ञेवरून श्रीमंत पंत प्रधान नानासाहेब याणी संस्थान राखावे याबदल श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसाहेब यास व त्याची मातुश्री श्रीमंत कैलासवासी आंबिकाबाई साहेब व वहीण दर्याबाई सुद्धा आणिली समारंभ करून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब यास श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे याचे दत केले त्यास राज्याभिषेक करून पौष शु. ८ आष्टमीस सन मजकुरी सन खमसैन मया व आलफ शके १६७१ शुक्ल नाम संवत्छरे तक्तनिषिन केले तोफेची सरबती केली साखरा वाटल्या वगैरा समारंभ केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब याणी संस्थानचा बंदोबस्त राखून राज्याचा कारभार चालविला ते धर्मसील त्याणी धर्म बहुत केला व श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति यांची क्रिया उत्तम प्रकारें करविली. श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नानासाहेब याणी आपले धाकटे बंधु श्रीमंत कैला वासी रघुनाथराव दादासाहेब यांस हिंदुस्थानात मोहिमेस पाठविले ते लाहूर

पर्यंत गेले त्याणी पुंड पालेगार वगैरा याची पारपत्ये केली व खंडण्या घेतल्या व मुलूक ही काबीज केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब यांचे कारकिर्दीस हिंदुस्थान व कर्नाटक वगैरा येथील राजे रजवाडे व पुंड पालेगार याची पारपत्ये व जिनंत सकान नवाब निज्यामन आलीखान याचे फौजेसी लढाया जाहाल्या त्याजपासून वगैरा खंडण्या घेतल्या व मुलूक काबीज केला त्याचे कारकिर्दीस शके १६७२ प्रमाथि नाम संवत्छरी सन इहिदे खमसैन मया व आलफात पुण्याचे नजीक नैरित्येस लहानसा पर्वत त्याजवर श्रीपरवती ह्मणोन देवी त्यास आकृत नाही परवतावर होती. सबब पर्वती असी प्रसिद्धि तेथे श्रीशिव पंच्यायतनाचे देवालयाचे काम लाविले व देकार द्यावयाची जागा रमण्याच्या भिंती घालून आत दरवाज्यास देकार द्यावयाकरितां बसावयास वगैरे सोपे बांधले शके १६७६ भाव नाम संवत्छरी सन खमस खमसैन मया व आलफात श्रीपरवतीचे देवालय तयार जाहाले श्रीसिव पंचायतनाची प्रतिष्ठा सन ... जाहाली देवाचे नाव श्रीदेवदेवेश्वर ठेविले वायव्य दिशेस श्री × × × देवीचे देवालय पंच्यायतनातील त्यात श्रीपरवती देवी ठेविली व सन मजकुरी तोफखाना सरकारात केला त्याचे काम कैलासवासी माधवराव पानशे कुलकर्णी मौजे सोनोरी ता। कडेपठार याजकडे सांगितले व परवतीस श्रीविष्णुचे देवालय बाधिले त्यात श्रीविष्णु मुहूर्तीची स्थापना केली कातरजेस तल्याचा बंद घालून शहरांत नळ आणिला सन सीत खमसैन शके १६७७ युवा नाम संवत्छरे श्रीपरवती नजीकचे तल्याचे काम लाविले तल्यात टापू राखून बाग केला त्याचे नाव सारसबाग त्या बागेत देवालय बाधून श्रीगणपती माहाराजाची प्रतिष्ठा केली श्रीमंत कैसासवासी माधवरावसो। यांस कैलासवासी सिवाजी बलाल जोसी यांची कन्या करावयाचे ठरविले त्याचे लग्न शके १६७५ श्रीमुख नाम संवत्छरे सन ... जाहले त्याचे नाव श्रीमंत कैलासवासी सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेब याचे रमाबाई ह्मणोन ठेविले श्रीमंत कैलासवासी पंत प्रा। बालाजीपंत नानासो। याणी आपले दुसरे लग्न सन इहिदे सितैन मया व आलफा शके १६८२ विक्रम नाम संवत्छरे मार्गसीर्ष वा। ६ वारी राक्षसभुवनास केले ती देशस्त उपनाम वाखरे याची कन्या तिचे पोटी संतान नाही श्रीमंत कैलासवासी पंत प्रा। नानासो। याणी नबाब निज्यामन आलीखान याजवर मोहिम करावी असा मनसबा ठरविला श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासो। याचे चिरंजीव श्रीमंत कैलासवासी सदा-

सिवराव भाऊसाहेब डेरे दाखल जाहाले गारपिरावर मुकाम होता तेथे मुसाफरजंग गाडदी याणे मारेकरी घातले त्याणी श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसाहेब हे कचेरीच्या डेऱ्यात बसले होते तेथे गफलतीने आत सिरून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसाहेब यांचे पाठीमागे जाऊन कटार चालविली तों पाठीस थोडीसी लागली. भारी लागती तर घात होता पाठीस कटार लागली त्या समई श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसाहेब दगा ह्मणोन बोलले त्या समई आमचे कैलासवासी तीा गोपालराव हे तेथे होते त्याचे जवळ कैलासवासी खंडोजी व मराठे ह्मणोन मांडवगणचे पाटील ते होते त्याणी त्याचा हात धरला मारेकरी यास दुसरी कटार चालवण्यास फुरसत पडू दिल्ही नाही मारेकरी यास कैद केला त्याणे मुजाफरजंगाचे नांव घेतले मुजाफरजंग यास बोलावून त्याचे पदरी गुन्हा घालून डोचके मारले नंतर श्रीमंत कैलासावांसी पंत प्रा बालाजीपंत नानासो याणी आपले चिरंजीव श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो याजबरोबर फौज देऊन जिनत मकान नबाब निज्यामनआलीखान हे फौजे सुद्धा लढाईचे इराद्याने आले त्याचे मोकाबल्यावर पाठविले त्याजबरोबर आमचे आजे तीा कैलासवासी गोविंद हरी त्याचे निास तीा कैलासवासी परशरामपंत भाऊ तासगांवकर व तीा कैलासवासी निलकंठराव दादा कुरुंदवाडकर हे आमचे चुलत चुलते याचे निाचे स्वाराची पथके व बाजी बलाल याजकडील पागा निा होती त्या सुद्धा पाठविले श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो याजकडील फौजची व नबाबाकडील फौजेची लढाई तादुलज्याचे मैदानात कार्तीक व. ६ गुरुवारी शके १६८० बहुधान्य नाम संवत्छरे सन तिसा खमसैन मया व आलफांत जाहली त्या लढाईत तीा गोविंद हरी व त्यांचे पुतणे निलकंठराव दादा व मेघःशामराव बापु याणी घोडी घातली मेघःशामराव बापु याचे घोडीस गोल्या लागल्या पतकातील लोक बहुत सरकार कामास आले व जखमी जाहले नबाबाच्या फौजेने सिकस्त खाली श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो यांची फते जाहली नबाबाकडील फौजेची खराबी जाहली त्याजकडील लोक व सरकारचे पदरचे लोक सरकार कामास आले नबाबापासून दौलताबाद* व किले असर वगैरा मकाने साठ लक्षाची जाहगीर सरकारात घेतली कैलासवासी दताजी सिंदे व मल्हारराव होलकर हे उभयता फौज सुध्धा हिंदुस्थानात होते + + +

* येथें " नानासाहेब याणी इंग्रजास पत्र पाठविले " असा शोध घातला आहे.

याची व जिनत मकान अबदल अली गिलज्या याचे फौजेची लढाई दिलीचे बाजूस जाली सिंदे याजकडील फौज सिकस्त जाहली दताजी सिंदे यास जखमा लागल्या ते खतात राहिले ते पाडाव जाहले त्याचा सिरछेद गिलज्याकडील कुतुबशाहा याणे करून डोचके भाल्यावर चढविले आणि शाहाजाने वाजविले दताजी सिंदे याचे पुतणे कैलासवासी जनकोजी सिंदे याणी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासाहेब व श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो यां उभयतास पत्रे पाठविली त्यांत जाहले प्रकारचे सविस्तर वर्तमान लिहिले ते पाहून उभयता बहुत खिन जाहले नंतर विच्यार केला की जर कुमक करून गिलज्याचे पारपत्य न केल्यास लौकिकात चांगले नव्हे फौज जमलेली तयार आहे लक्ष मसलती येकीकडे ठेऊन हिंदुस्थानची मसलत करावी ह्मणोन नंतर श्रीमंत कैलासवासी पंत प्रा बालाजीपंत नानासो याणी आपले वडील चिरंजीव श्रीमंत कैलासवासी विश्वासराव साहेब व चुलत बंधु श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो या उभयतास हिंदुस्थानांत मोहिमेस चैत्र शु. १ शके १६८१ प्रमाथी नाम संवत्छरे सन सितैन मया व आलफात छ २९ जाखरी पाठविले त्याणी राजे रजवाडे याजपासून खंडण्या घेतल्या त्याची स्वारी मजल दर मजल दिलीचे रोखे गेली जनकोजी सिंदे व मल्हारराव होलकर येऊन मिळाले दिलीस मोर्चे बसविले दिलीत ठाणे कायम केले श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो याणी जिनत मकान शाहाज्यादा शाहाआलम ह्मणोन होता त्यास तख्ती बसविला कैलासवासी नारो शंकर राजे बाहादर यास तेथील बंदोबस्तास ठेऊन श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो व श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो या उभयताची स्वारी कुंजपुऱ्याकडे गेली कुंजपुरचा किला हला करून घेतला ठाण्यातील + + + खान रोहिला याचा व्याही व जावई होते ते सापडले कुतुबशाहा लढाईत गाइकवाड याचे फौजेत सापडला त्याणी हतीवर बसवून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो याजकडे पाठविला त्यास हतीवरून खाली उतरविला त्यास आपणास मारतात हे समजले त्याणी श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो यास विनंती केली की मला वाचवावे ह्मणजे गिलज्या व रोहिला याचा सला करून देईन नाही पेक्षा पनास लक्ष रुपये घेऊन मुक्त करावे ह्मणोन नंतर श्रीमंत कैलासवासी सदाशिवराव भाऊसो याणी विच्यारिले की दताजी सिंदे याचा सिरछेद तुह्मीच केला की काय हे ऐकून त्यांणी सांगितले

की आमचे जातीत दुषम न सापडला असता त्याचा सिरछेद करून भाल्यास सिर बांधावे फेरोचे शाहाजाने वाजवावे असे आहे त्या प्रो वर्तणूक केली हे ऐकून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो याणी आज्ञा केली की ढालेपासी नेऊन त्याचा सिरछेद करावा त्याजवरून त्याचा सिरछेद केला व सैदखान कतलखान सापडला त्याचा ही केला कुंजपूर येथे मुकाम करून कुंजपूरचा किला खणून यमुनेत टाकिला श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री सौभावती पार्वतीबाईसो ही स्वारीत बरोबर होती त्यास कैलासवासी सदासिवपंत जोगदंड याजबरोबर फौज देऊन पानपता पासून पंधरा कोसावर ठाणे होते तेथे श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो याणी पाठविली कुंजपूरचा किला खणून यमुनेत टाकिला हे वर्तमान गिलज्या व नजीबखान याणे ऐकून ते उभयता फौज सुद्धा यमुनेचे उतर तीरास आले खा त्याच रोखे श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो व सदासिवराव भाऊसो याची स्वारी सोनपत पानपताकडे गेली श्रीमंताचे फौजेची व गिलज्याच्या फौजेची लढाई पौष शु. ८ शके १६८२ विक्रम नाम संवत्छरे सन इहिदे सितैन मया व आलफात मातबर जाहली श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो व श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो या उभयतानी जवामर्दीची शर्त केली ईश्वर इछे लढाई बिघडली त्या लढाईत श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसो यास गोली लागोन ठार श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो हे लढाईत गारद झाले सरकारचे पदरचे सरदार नामांकित श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीराव सो थोरले याणी मस्तानी ह्मणोन ठेविली होती तिचे पोटी जिनतमकान समसेर बाहद्दर बहुत योग्य जाहले ते व कैलासवासी बलवंतराव गणपत मेहेंदले व जनकोजी सिंदे वगैरा बहुत लोक सरकार कामास आले पुर्वी पुराणांतरी रावण पांडवादिक याच्या लढाया वर्णिल्या आहेत + + + + + + + + + + + + + + + +

आले त्याचा तपसील ल्याहावा तर विस्तार होतो सबब लिहिला नाही जय पराजय ही इछा ईश्वराची तोफखाना वगैरा सलतनत असबाब झाडून शत्रुचे हाती लागला व काही लुटला गेला फौज गारद जाहाली सदरहू वर्तमान ऐकून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो याची पत्नी यास मारनिल्हे जोगदंड वगैरा असे घेऊन श्रीमंत कैलावासी पंत प्रधान नानासाहेब या जवल आले मल्हारराव होलकर ही बरोबर होते श्रीमंत कैलासवासी नानासो यांचे कारकि-

दींस श्रीगणपती माहाराजाचे उछाहास प्रारंभ व सात खणी इमारत बांधली त्याचा काळ सन इसंने सितैनात छ. १९ जिल्काद शके १६८३ वृषा नाम संवत्छरी जेष्ट व. ६ षष्ठी भोमवारी रात्रौ पर्वतीस जाहला नंतर श्रीमंत कैलासवासी माधवराव साहेब यास प्रधानकीची वस्त्रे सन मारी सन इसने सितैन मया व आलफ शके १६८३ वृषा नाम संवत्छरी जेष्ट व. ७ स श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे यांचे दत चिरंजीव कैलासवासी श्रीमंत माहाराज छत्रपति राजाराम साहेब याचे कारकिर्दीस जाहाली सिरस्त्या आन्वये वस्त्रे व दागिने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब व कारभारी मुछदी वगैरा बरोबर होते त्यास वस्त्रे दिल्ही श्रीमंत कैलासवासी माधवरावसो हे पंत प्रधान जाले त्याजकडे खावंदगिरी त्याजकडे सर्वांची लक्षे श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो यांची मुंज श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी शके १६८३ वृषा नाम संवत्छरी केली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो हे लहान असता श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो हे दौलतीचे काम पाहात होते त्याचे मनात माधवरावसो थोर जाहल्यावर त्याचा वेव्हार त्यांचा त्याजकडे जाईल आपले हाती कायम राहणार नाही असे वगैरा वैमनस्य उत्पन्न जाहले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो निघोन नासिकाकडे गेले त्याणी तेथे जमाव केला पुण्यास यावे बंदोबस्त ( करावा ) या इराद्याने आले बखेड्याचा रंग पाहून पुण्याहून श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावासो फौज घेऊन कैलासवासी त्रिंबकराव मामा पेठे व कैलासवासी मोरोबा दादा फडणीस व कैलासवासी गोविंद हरी पटवर्धन हे वृध्ध सा त्याचे वडील चिरंजीव कैलासवासी गोपालरावसो वगैरा खुध्धा मुकाबल्यास गेले घोडनदी नजीक लढाई सन सलास सितैन मया व आलफ कार्तीक व. ११ शके १६८४ चित्रभानु नाम संवत्छरी जाहली लढाई बिघडली त्या समई गोविंद हरी यांचे साऱ्यात वडील बंधु कैलासवासी कृष्णभट बापाजी त्याचे वडील चिरंजीव कैलासवासी नारायणराव यास जखम लागली गोविंद हरी यांचेहून वडील बंधू कैलासवासी त्रिंबक पंत आपा साहेब यांचे चिरंजीव तीा कैलासवासी निळकंटराव दादा याचे पायास गोळीची जखम लागली तीा गोविंद हरी नानासाहेब यांचे धाकटे बंधु तीा कैलासवासी रामचंद्रपंत आपासाहेब यांचे चिरंजीव तीा कैलासवासी परशरामपंत भाऊसो याचे निााचे स्वाराचे पथकचे फडणीस कैलासवासी

श्रीधर केशव काले हे साऱ्यात वडील बंधु कृष्णंभट बापाजी यांचे कन्येचे पुत्र ते ठार जाहले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याजकडील जमेत भारी आपला निभाव पडणार नाही दौलतीची खराबी होईल हे चांगले नव्हे बाजत बरसात जे होणे ते होईल ही दूरंदेसी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो याणी चितात आणिली गोपालराव यांचे लक्ष आपलेकडे याजमुळे ती॥ रघुनाथराव दादासो यांचे चितात गोपालराव याजविसी वाकडे गोपालराव याचा परिणाम लागावयाचा नाही हे समजून ती॥ गोपालराव यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो हे लाह्या खात बसले होते त्यातील लाह्या दिल्ह्या वचन देऊन ती॥ गोपालराव साहेब यांस व मोरोबा दादा फडणीस यास निरोप दिल्हा आपण श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याजकडे गेले त्यास प्रतिबंध केला नंतर कैलासवासी सखाराम भगवत बोकील कुलकरणी मोजे हिवर ता॥ कडेपठार प्रांत पुणे यास सखाराम बापु ह्मणत त्याणी व कैलासवासी निलकंठ माहादेव पुरंधरे याणी ठरविले की यादीवर करार श्रीमंत कैलासवासी पंत प्रा॥ माधवरावसो याचा त्या यादीवर श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी रुजू करीत जावे याप्रमाणे ठरले कारभार चालला श्रीमंत कैलासवासी नारायणराव याचे लग्न शके १६८५ सुभानु नाम संवत्छरे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी केले त्यास कैलासवासी साठे यांची कन्या तिचे नाव श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसो श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यास पुत्र श्रीमंत कैलासवासी भास्करराव ह्मणोन जाहले होते त्यास श्रीमंत कैलासवासी भवानराव प्रतिनिधि याजकडील प्रतिनिधिपणा काढून प्रतिनिधिपणाची वस्त्रे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो याजकडून श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याणी घेतली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो हे प्रतिबंधादाखल श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याजवल होते गोपालराव निघोन गेले बाजत बरसात फंद होईल असे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचे चितात येऊन पिछ्या केला श्रीकृष्णाबाईचे दक्षणचे बाजूस जमखंडी त्याचे नजीक लढाई जाहली गोपालराव याजकडील फौजेचा मोड जाहला त्या समई गोविंदपंत हरी यांचे बंधुत धाकटे बंधु कैलासवासी भास्करपंत आपा याचे दुसरे चिरंजीव कैलासवासी विनोबा आबा यांस भाल्याची जखम लागली व गोविंद हरी यांचे आजे कैलासवासी बालंभट त्यांचे बंधु कैलासवासी रघुनाथ-

भट त्यांचे चिरंजीव कैलासवासी धोंडभट त्यांचे चिरंजीव कैलासवासी बाळंभट त्यांचे चिरंजीव कैलासवासी श्रीधरपंत सुभेदार यांस डाव्याचे आंगठ्यास व उजवे-हाताचे कोपरास व उजवे कानावर व डाव्या बाहुट्यास अशा जखमा लागल्या आंगठ्यास जखम लागली तो आंगठा गेला गोपालराव निघोन मोगलाईत जिनत मकान नबाब निज्याम आलीखान याजकडे गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी ( मिरजे ) चे किल्यास वेढा सन सलास सितैनात घातला सताविस दिवस मिरज लढली नंतर कैलासवासी नारो शंकर व कैलासवासी विठल सिवदेव यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसाहेब यांचा इशारा होऊन त्याचे बाहादरीने गोविंद हरी किल्या × × × × बाहेर छ...... उतरले राहाण्यास जागा पाहिजे ह्मणोन श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यास विनंती करविली त्याजवरून मंगलवेढे किला राहण्यास दिल्हा श्रीमंत भवानराव प्रतिनिधि याजकडील प्रतिनिधिपणा काढला याजमुळे ते ही मोगलाईत नबाबाकडे गेले व कैलासवासी बाबूजी नाईक बारामतीकर व जानाजी भोसले नागपूरकर असे ती × × येऊन ते ही मोगलाईत नबाबाकडे गेले नबाबाकडील फौज येऊन पुणे जालले पदरचे सरदार फुटोन नबाबाकडे गेले हे चांगले नाही असे चिंतात येऊन गोविंद हरी यांस जाहागीर वगैरा द्यावी त्यास आणावे असे ठरले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यांस पुत्र भास्करराव जाहाले होते त्यांस प्रतिनिधिपणाची वस्त्रे घेतली तो प्रकार सदरी लिहिला आहे त्यांचा काल जाहाला श्रीमंत भवानराव यांचा प्रतिनिधिपणा त्यांचा त्यास द्यावा असे बोलण्यात येऊन त्यास आणिवण्याचे ठरले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांणी गोपालराव यांस कैलासवासी पांडुरंगपंत गडबोले याजबरोबर इशारा पाठविला त्याजवरून गोपालराव यांणी व श्रीमंत कैलासवासी पंत प्रतिनिधि यांणी निघण्याचा विच्यार करून निघाले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो फौज सुध्धा नबाब निज्याम आलीखान याजवर चालून गेले नबाबाकडील कैलासवासी विठल सुंदर राजे बाहादर हे पुढे मोकाबल्यास फौज घेऊन आले त्याची व श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांची गाठ राक्षसभुवनाचे मैदानात छ २९ मोहरम सन आर्बा सितैन मया व आलफ श्रावण शु. १ शके १६८५ सुभान नाम संवत्छरी पडली तेथे लढाई मातबर जाहली त्या समई श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो हे हतीचे हौद्यात बसले होते तो हती नबाबा-

कडील विठल सुंदर याजकडील लोकानी फिरविला हे पाहून श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो याणी हुजूरातीचे लोकानिसी चालून घेऊन नबाबाकडील फौज सिकस्त करून हती माघारा आणिला दोहीकडील लोक सरकार कामास बहुत आले व जखमीही बहुत जाहाले नबाबाकडील विठल सुंदर राजे बाहादर हे लढाईत ठार व खंदारकर राजे यास जखमा लागल्या काही नबाबचे पदरचे अमीर पाडाव आले त्यांचा बहुमान करून त्यास नबाबाकडे लाऊन दिल्हे श्रीमंताची फते जाहाली स्वारी पुण्यास आली गोपालराव व मोरोबादादा फडणीस व श्रीमंत पंत प्रतिनिधि हेही आले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो कर्तुत्ववान जुमामर्द आपला व्यव्हार आपण पाहू लागले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो नाशकास गेले श्रीमंत पंत प्रधान माधवरावसो यांची स्वारी कर्नाटकात गेली धारवाड सन सीतासितैन मया व आलफात शके १६८७ पार्थिव नाम संवत्छरी घेतले गोपालराव यास कर्नाटकांत खंडणीचा ऐवज यावयाचा त्या करिता ठेविले खासा स्वारी पुण्यास आली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो नासिकास गेले तो प्रकार सदरी लिहिला आहे ते गोहद पर्यंत जाऊन स्वारी करून नाशकास आले त्याजकडे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांची स्वारी गेली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यांस पंधरा लक्षाची जाहागीर व सतावीस किले द्यावे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी स्नान संध्या करून स्वस्त राहावे असे ठरून जाहागीर व किले देऊन श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवराव साहेब पुण्यास आले गोविंद हरी यास जाहागीर वगैरा द्यावयाचे ठरून सन आर्बा सितैनात याद जाहाली नंतर पुढे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो थोरले यांचे कारकीर्दीस आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता सन खमस तिसैनात ठरऊन दिल्हा त्याची बेरीज रुपये २५४१९०० त्याचे पुरवणीस जाहागीर लाऊन दिल्ही गोविंद हरी याचे धाकटे बंधु रामचंद्रपंत आपा तासगावकर—त्रिंबकपंत आपा याचे चिरंजीव—याजकडील पागा त्याचे निाचे स्वार व निलकंठराव दादासाहेब कुरुदवाडकर यांचे निाचे स्वार ती पथके हुजूरची ती गोविंद हरी यांस आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता ठरवून दिल्हा त्याचे पुर्वी निास लाऊन दिल्ही होती रामचंद्रपंत आपा यांचा काल जाहाल्यानंतर त्याचे निाचे स्वाराची मालकता त्यांचे चिरंजीव परशरामपंत भाऊ याजकडे आली

त्यास वस्त्रे देविली सदरी लिा आन्वये उभयताकडील निाचे स्वाराची पथके ते व बाजी बलाल हे कितुरावर गोली लागोन सरकार कामास आले त्यांचे चिरंजीव कैलासवासी विसाजी बाजीराव याजकडे पागेची मालकता आली ते आपली पागा हुजूरची ह्मणू लागतील गोविंद हरी यांचे हुकमात चालणार नाही असे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसाहेब थोरले यांचे चितात येऊन सदरी लिा आन्वये गोविंद हरी यांस आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता ठरवून दिल्हा त्या समई आज्ञा जाहाली त्यातील भाव परशरामपंत याजकडील पागा व निाचे स्वार मिलोन चविशे त्याची व त्याचे जातीची व निलकंठराव यांचे निाचे स्वार हजार त्याची तैनात व त्याचे निाचे तैनातदाराचे तैनातेचा ऐवज तुह्मी आपले जाहागीर पैकी द्यावा ह्मणजे हुजूरची पथके ह्मणण्याचा अर्थ राहिला नाही तुम्हास आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता ठरवून दिल्हा त्यापौ उभयताकडे निास स्वार तुह्मी लाऊन दिल्हे असे जाहाले मार निल्हे बाजी बलाल यांचे चिरंजीव विसाजी बाजीराव याजकडील पागा आठ हजार स्वारात च मिलविली हुजूरची ह्मणण्याचा समंध तोडला तासगावकर व कुरुंदवाडकर या उभयताचे निाचे स्वाराची पथके व विसाजी बाजीराव याजकडील पागा पेट्यातील असे जाहाले आठ हजार फौजेची खावंदगिरी गोविंद हरी याजकडे मुकरर जाहली + + + + व तैनात जाबत्यास तैनात जाबता निा राजश्री गोविंद हरी असे गोविंद हरी याचे साग्यात वडील बंधु कृष्णभट बापाजी त्याचे वडील चिरंजीव नारायणराव नाना यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवराव साहेब याची व श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यांची लढाई घोडनदीवर जाहाली तो प्रकार सदरी लिा आहे त्या लढाईत जखम लागली त्यांचे धाकटे बंधु पुरुषोतमराव दाजी यांस सावनूरावर तीराची जखम लागली तो प्रकार सदरी लिहिला आहे उभयता बंधु याणी सरकार चाकरी बज्यावली ही कदर जाणोन पो मंगलवेढे पौ आंबेगाव इनाम सन इहिदे सितैन मया व आलफ शके १६८२ विक्रमनाम संवत्छरी दिल्हा तो हाली चालत आहे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याणी स्नानसंध्या करून असावे असे ठरून जाहागीर व किले दिल्हे तो प्रकार सदरी लिा आहे ठरल्या आन्वये त्याणी असावे ते न करिता राजकारणाचा प्रकार चितात आणून कैलासवासी गोविंदपंत भुसकुटे यांचा मुल शके १६८९ सर्वजित नाम संवत्छरी सन समान

सितैनात श्रीमंत कैलासवासी अमृतरावसो यांस दत घेतले श्रीगंगातीरी कुंभारीस जाऊन मुकाम करून फौज ठेविली करारास व्यत्यय बखेड्याचे लक्षण असे चितात येऊन श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवराव साहेब डेरे दाखल जाहाले लोकास बोलावणी पाठविली काही लोक आले गोपालराव कर्नाटकात होते तेही फौज सुध्धा नेऊर गावचे मुकामास येऊन पोह्चले कलम ज्यारी चालली होती फौज जमली धोडपेचे किल्यानजीक सन तिसा सितैन मया व आलफात लढाई जाहाली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचा मोड जाहाला श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो किल्यावर गेले कैलासवासी चिंतो विठल जोसी सापडले फौज लुटली गेली व काही पळाली नंतर कैलासवासी आपाजी हरी किलेदार व गंगोबा तात्या बिा होलकर यांचे विो बोलणे ठरून श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो किल्याखाली आले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांचे स्वाधीन जाहाले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांणी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांस आपले आंबारीत बसवणेविसी आज्ञा केली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांणी गोपालराव यांस इशारा केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो व श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब असे येक आंबारीत बसले गोपालराव हे खवासखान्यात बसले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचे हाती खंजीर होता न जाणो घात होईल असे गोपालराव यांचे चितात येऊन श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचे जवळ खंजीर होता तो पाहावयास ह्मणोन मागून घेतला तो आपल्या जवळ ठेविला श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचे संरक्षणास गोपालराव यांस नेमिले ते समई गोपालराव यांचे ह्मणण्यातील भाव मला ही चाकरी सांगू नये परंतु आज्ञा जाहाली ते पक्षी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांस पुण्यास पोहोचऊन मी निघोन जाईन ह्मणोन श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांस पुण्यास पोहोचविले आपण निघोन नारायण पेठे लगत पंचमाहालात गेले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांचा बंदोबस्त करून वाड्यात ठेविले सन तिसा सितैन मया व आलफ शके १६९० सर्वधारी नाम संवत्छरी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो डेरे दाखल जाहाले गोपालराव रुसून पंचमाहालात गेले त्याणी नरव्यास मोर्चे दिल्हे होते श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान

माधवरावसो याणी मोरोबादादा फडणीस यास पुसिले की गोपालराव रुसून गेले ते कसे येतील तेव्हा मोरोबा दादा फडणीस याणी विनंती केली त्यातील भाव समयास चाकरी विसी अंतर व्हावयाचे नाही त्याजवरून मोरोबादादा याचे पत्र व आपले हातची चिठी पत्र दर्शनी निघोन यावे या आन्वयाची लिहिली ती चिठी व मोरोबादादाचे पत्र असे सांडणी स्वार यास बक्षीस देऊ करून त्याचे जवळ दिल्ही आणि रवाना केला सांडणीस्वार नरव्यास मोर्चे होते तेथे जाऊन पोहोचला नरव्याचे ठाण्यातील लोकाचे बोलणे आले त्याचे बोलणे भिटवून फौज सुध्धा निघाले साडणीस्वार याजवल आज्ञापत्राचे उत्तर आज्ञे आन्वये येऊन पोहोचतो ह्मणून लिहून दिल्हे ते घेऊन साडणीस्वार निघाला तो निबेदेहारेच्या घाटाखाली श्रीमंताचा मुकाम होता तेथे जाऊन पोहोचला त्याणे गोपालरावसो आले या आन्वयाची श्रीमंतास विनंती केली मर्जी बहुत संतोष जाहाली गोपालराव जाऊन पोहचले. स्वारी वराडात गेली कैलासवासी जानोजी भोसले नागपूरकर यांचे चितात वाकुडपणा सबब त्यांचा पिछया केला त्याजकडील तहाचे बोलणे होऊन तह जाहाला श्रीमंत कैलासवासी विश्वासराव साहेब व श्रीमंत कैलासवासी भाऊसो यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नानासो याणी फौज देऊन हिंदुस्तानात मोहिमेस पाठविले त्याची व आबदलआली गिलज्याचे फौजेची लढाई जाहाली त्या लढाईत गारद जाहाले तो प्रकार सदरी लिहीला आहे त्याचा बदला घ्यावा सबब कैलासवासी विसाजीपंत बिनीवाले व कैलासवासी रामचंद्र गणेश याजबरोबर सरकारची फौज व सिंदे होलकर वगैरा देऊन हिंदुस्थानात गिलज्यावर सन सबैन मया व आलफ शके १६९१ विरोधिनाम संवत्छरी पाठविले स्वारी पुण्यास आली कर्नाटकात जावे असा मनसब ठरून श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यांची सन सबैनात सन मारी कर्नाटकात गेली सिऱ्यावर हैदरखानाचे पदरची मीररजा आलीखान याचे फौजेची लढाई जाहाली त्या लढाईत गोविंद हरी यांचे साऱ्यात वडील बंधु कैलासवासी कृष्णभट बापाजी यांचे चौथे चिरंजीव कैलासवासी माधवराव आणा यांस तोफेचा गोळा मांडीस लागला त्या जखमेने त्याचा काल जाहाला त्यांचे चिरंजीव कैलासवासी दामोदरबाबा यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान थोरले माधवरावसो याणी नादोरे ह्मणोन गाव भोसे परगणेतील भिमेच्या उतर तीरी आहे तो सन आर्बा सबैन मया व आलफ शके १६९५ विजयनाम संवत्छरी इनाम दिल्हा दामोदर बाबा

यांचा काल जाहाला त्याची पत्नी सती गेली नंतर माधवराव आणा यांची पत्नी आंबिकाबाई इणे कृष्णभट बापाजी यांचे साऱ्यात धाकटे चिरंजीव कैलासवासी लक्ष्मणराव यास बलवंतरावदादा ह्मणत त्यांचे साऱ्यात धाकटे चिरंजीव राजश्री गोपालराव यास घेतले त्याजकडे नादोरे गाव इनाम दिल्हा तो चालत आहे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवराव साहेब थोरले याणी सिरे घेऊन माघारे येताना निजगलावर हला सन मजकुरी केला त्या समई श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवराव साहेब यांचे धाकटे बंधु श्रीमंत कैलासवासी नारायणराव यास गोलीची जखम मणगटास लागली सरकारचे बहुत लोक कामास आले कैलासवासी त्रिंबकरावमामा पेठे यास कर्नाटकात छावणीस ठेविले त्याचे जवल गोपालराव यास ठेविले स्वारी माघारी आली विसाजीपंत बिनीवाले व रामचंद्र गणेश यास हिंदुस्थानात पाठविले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्या पो काही कारणामुळे रामचंद्र गणेश यास माघारे आणिले बिनीवाले याणी गिलज्याचे पारपत्य केले सरकारची सुलतनत सोनपत पानपतास गेली त्यापैकी काही आणिले श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो पानपतास गारद जाहाले तो मार सदरी लिा आहे त्याचे नाव करून तोतया जाहला त्याची चौकसी करून भाऊसो नव्हेत आसा निश्चय होऊन त्याचे पायात बेडी घालून मिरज किला त्यात ठेवावयास कैलासवासी वामनराव बाबा याजकडे पाठविला तो काही दिवस मिरजेचे किल्यात कैदेत होता नंतर रत्नागिरीचे किल्यात ठेवावयाकरिता कैलासवासी रामचंद्रनाईक पराजपे निसबत कैलासवासी महिपतराव कृष्ण साठे याचे स्वाधीन केला कैलासवासी त्रिंबकरावमामा यास कर्नाटकात छावणीस ठेविले त्याचे जवल ठेविले तो प्रकार सदरी लिहिला आहे गोपालराव यास उदराची भावना जाहाली यांत आपली अखेरी समजून त्याणी आपले धाकटे बंधु वामनरावबाबा यास फौजेत ठेऊन आपण घरी मिरजेस सन इहिदे सबैन मया व आलफ छ २९ रमजान शके १६९२ विकृतिनाम संवत्छरी माघ शु. १ सौम्यवारी आले यांचा काल दुसरे दिवसी माघ शु. २ गुरुवारी जाहला सन मजकुरी त्रिंबकरावमामा याचे फौजेची व हैदरखान याचे फौजेची लढाई मोतीतलावा नजीक श्रीरंगपटणचे मैदानात जाहाली त्या लढाईत त्रिंबकरावमामा यास गोलीची जखम डावे कानास लागली गोली निघोन गेली कैलासवासी गोविंद हरी याचे पुतणे निलकंठराव दादा यास गोलीची जखम लागोन सरकार कामास आले हैदरखान याजकडील फौजेचा

मोड जाहाला हैदरखान याजकडील तोफा व हती व घोडी वगैरा पाडाव आली सलतनत लुटून गेली गोविंद हरी यांचा काल सन इसने सबैन मया व आलफ छ १३ साबान शके १६९३ खरनाम संवत्छरे कार्तीक शु. १४ गुरुवारी जाहाला गोविंद हरी यांचे दुसरे चिरंजीव वामनरावबाबा यास श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो थोरले याचे कारकिर्दीस सन सलास सबैनात सरदारीची वस्त्रे जाहली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यास पुत्र जाहला नाही त्यांचा काल सन सलास सबैन छ २३ साबान शके १६९४ नंदननाम संवत्छरी कार्तीक व. ९ नवमी गुरुवारी थेऊरचे मुकामी श्रीगणपती माहाराजाचे सानिध्य ओहरीत जाहला त्यांची पत्नी कैलासवासी सौवती मातुश्री रमाबाईसो ही सिवाजी बलाल उपनाम जोसी संगमनेरकर यांची कन्या त्याणी सती जाणे हा सनातन धर्म आपला जी स्वधर्माकरिता सती जाते ती आपले खावंदा सुध्धा पातकापासून मुक्त होऊन चवदा इंद्र होईजे पर्यंत स्वर्गवास करते हा लाभ तीस होतो हे जाणून वेदशास्त्र संपन्न कैलासवासी रामशास्त्रीबाबा प्रभृति शास्त्री पंडीत सरकारचे पदरी मोठमोठे ज + ......+ + ... + + दीत त्याच्या अनुमते सती जाणारणीस जे विहित वायनादी दानधर्म सांगितले त्याप्रो दानधर्मादी धर्म बहुत केला आणि सती जाण्यास प्रवृत्त जाहली सती जाणारणीवर जबरदस्ती करू नये सामोपचारे सांगावे तिला राहून घ्यावी असे आहे जी सती जाण्यास निग्रह करिते तिजला न जाण्याविसी जबरदस्ती केल्यास प्राणत्यागाकडे तो दोष जबरदस्ती करणारावर दुसरा धर्मनाशाचे पातक हे समजून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी पार्वतीबाईसाहेब ती व श्रीमंत कैलासवासी जनोबासो याची पत्नी श्रीमंत कैलासवासी सगुणाबाईसो त्याणी जबरदस्ती न केली बहुत प्रकारे सामोपचारे सांगण्याविसी पराकाष्टा केली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो व त्याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसो ही ही जवल होती श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसो व रास्ते कैलासवासी आनंदरावदादा इत्यादि त्यांचे बंधु हे श्रीमंत कैलासवासी पंत प्रा माधवरावसो यांचे मामा व श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री रमाबाईसो यांचे बंधु कैलासवासी रामचंद्र सिवाजी व कैलासवासी त्रिंबकरावमामा व नाना फडणीस व मोरोबादादा फडणीस व सखारामबापु व हरीपंततात्या व वामनरावबाबा व परशरामपंतभाऊ

व रघुनाथरावदादा वगैरा सरकारचे पदरचे सरदार व पागे पथके वगैरा बहुत होते त्याणीही बहुत प्रकारे विनंती केली वडिलांची आज्ञा व श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो यांची व पदरच्याची विनंती मान्य न केली आपले बंधु रामचंद्र सिवाजी यास कंठी दिल्ही व आपली कीर्ती राहावी आत व पदरच्यास स्मरण राहावे यास्तव दागिने व मोहरा वगैरा जसे ज्यास द्यावयाचे ते स योग्यतेनसार दिल्हे त्या समई कितेक प्रकार पदरच्याचे चालविण्याविसी वगैरा बोलणी जाहली त्यात पटवर्धन व अली बाहादर याजविसी बोलणे जाहले त्यातील हसील धर्मसिलेवर जाऊन उभी राहिली ते समई श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो जवल उभे होते त्या वेलेस बामनरावबाबा व परशरामपंतभाऊ या उभयतास बोलाऊन उभयताचे हात धरून नारायणरावसो याचे हातात हात देऊन बोलली की पटवर्धन हे आमचे माहेरघर व तुमचे विश्वासाची जागा याजप्रो आजपावेतो चालत आहे यापुढे चालत आल्याप्रो तुमचे पायासी पटवर्धन याणी येकनिष्टपणे वागावे आणि आपण ही त्याचे तसेच चालवावे असे बोलून आगठी हिऱ्याची आत श्रीगणपतीची मुहूर्त डाकावर ती आगठी बामनरावबाबास दिल्ही व परशरामपंतभाऊ यास माणकाची आंगठी दिल्ही व रघुनाथरावदादा यास पाचेची आंगठी दिल्ही व मोरोबाआबा व पुरुषोतमरावदाजी यास मोहरा दिल्ह्या मग परशरामपंतभाऊ घोड्यावर बसून फौजेत उभे राहिले बामनरावबाबा नारायणरावसो याजवल उभे राहिले त्यासमई श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो याचे लेकवले जिनत मकान समशेरबाहादर याचे चिरंजीव जिनत मकान अली बाहादर याणी खुरनिशा करून उभे राहिले त्यास सांगितले तू आमचा परंतु अन्य ज्यातीत उत्पन्न जाहलास तुझे ज्याप्रो वडिलानी चालविले त्याप्रो नारायणराव चालवितील तुह्मी येकनिष्ट वर्तणूक करून सुखरुप राहावे यात तुमचे कल्याण आहे ह्मणोन सांगितले सदरहू अन्वयेच श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजीपंत नानासो यांचे लेकवले कैलासवासी हैबतासिंगदादा वगैरा सांगितले आणि स्वधर्माकरिता सर्वासहवर्तमान दौलतीचा वगैरा परित्याग करून सहगमन गेली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो यानी कैलासवास केला त्या समई श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो याची मातुश्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री गोपिकाबाई साहेब ही जवल नवती नासिकास गेली ती पंचवटीस होती श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो याणी कैलासवास केल्यानंतर त्याचे

कनिष्ट बंधु श्रीमंत कैलासवासी नारायणराव साहेब याजकडे मालकता आली त्यास प्रधानकीची वस्त्रे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसाहेब याचेच कारकिर्दीस सन मजकूर सन सलास सबैन मया व आलफ शके १६९४ नंदननाम संवछरी जाहली सिरस्त्या अन्वये दागिने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो हे पंत प्रधान जाहले त्याचे कारकिर्दीस वामनराव-बाबा यास पेशजी प्रो आठ हजार फौजेनेसी चाकरीस खर्चाचा तैनात जाबता करून दिल्हा त्या तैनात जाबत्यास फौज देखील नोबतखाना वामनराव गोविंद यांचा असे लिहिले याचे कारण फौजेची फोड होऊ नये सा श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो याजकडे खावंदगिरी आली त्याचा बंदोबस्त करावा असे श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो हे ताबेदार त्याचे चितात येऊन सरकारचे वाड्याचे गिरद नवाईस वगैरा सरकारचे हशमापौ रिसाले त्यांत फितुर केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यांची स्वारी राघोजी आंगरे यास सामोरे जाऊन श्री परवतीस गेली तेथे भोजन केले फितुर जाहल्याचे वर्तमान पदरच्यास समजून त्याणी स्वारी वाड्यात जाऊ नये ह्मणोन विनंती केली वाड्यात न जाता बंदोबस्त करावा ते न केले आज्ञा जाहाली की वाड्यात गेल्या-नंतर बंदोबस्त करावयास येईल ह्मणोन ते तुलाजी पवार हा श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यांचा खिजमतगार तो फितुरात त्याणे ऐकिले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो याणी स्वारी वाड्यात जाऊन बंदोबस्त करावा तो प्रकार अंतकालचा समय प्राप्त याजमुळे न जाहला गाफलाई जाहाली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो हे निजावयास गेले झोप लागली तुलाजी पवार याणे सदरी लिहिले आन्वये श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारा-यणरावसो बोलले ते ऐकिले जागे जाहाल्यावर बंदोबस्त होईल मसलत साधणार नाही हे समजून तुलाजी पवार याणे बातमी कलविली त्याजवरून महंमद इसबा व सुमेरसिंग व खरगसिंग वगैरा फितुरी तयार होऊन सरकारचे वाड्याचे दर-वाज्याजवल आले दरवाजकरी दुहसिंग जमादार याणे जाऊ नका ह्मणोन बोलला त्यास ठार मारला आणि चालून वाड्यात सिरून मारामारी करू लागले तेव्हा कैलासवासी आंबाजीपंत ह्मणोन होता तो उठून दरवाजा लावावयास गेला तो गारदी याणे जाऊन त्यास ही ठार मारला कैलासवासी इछारामपंत ढेरे हुजूरपागे यास गोशालेत ठार मारले त्यासमई गाईवर वार लागले गाय मेली त्या गर्दीत

कैलासवासी नारोपंत फाटक गवईही ठार मारला वाड्यात गर्दी जाहाली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो जागे जाहले आपणास मारतात परिणाम नाही असे समजून श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याजकडे जाऊन पायावर डोचकी ठेऊन मिठी मारली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यांचे पाठोपाठ तुलाजी पवार वगैरा फितुरातील आले जर तुह्मी यास सोडीत नाही तर आह्मी मारले जाऊ ह्मणोन श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याजपासी बोलले आणि तुलाजी पवार याणे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो याचे पाय धरून ओढिले व सुमेरसिंग व खरगसिंग याणी श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो याजवर वार टाकिले त्यासमई त्याजकडे श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याणी हात पुढे केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो याजवर वार टाकिले ते श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांचे हातास व पागोट्याचे पेंच तुटून डोईस आशा हलक्या जखमा लागल्या गणेश गोविंद बारगीर हा जवल होता श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यांजवर वार टाकिल ते समई खिजमतगार च्चाफाजी टिलेकर ह्मणोन होता तो मधे आडवा जाहाला त्या सुध्धा पुण्यात सन आर्बा सबैन मया व आलफ छ ११ जाखर शके १६९५ विजयनाम संवछरी भाद्रपद शु. त्रयोदसी युक्त चतुरदसी इंदुवारी सरकारचे वाड्यात ठार मारले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यांचा कोथळा बाहेर पडला श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यास गाडद्यानी पुढील चौकात आणून घेरून बसले नारोजी नाईक हा जासुदाचा नाईक हा श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांस पुढील सार्थकाचे वगैरे निषेधाचे बोलला त्यास ठार मारला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो यास मारले त्या समई शहरात मोठा आहःकार जाहाला पृथ्वी निराश्रय जाहाली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसाहेब यास मारले त्या समई त्यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसाहेब ही व श्रीमंत कैलासवासी सदासिवरावभाऊसाहेब सोनपत पानपतास गारद जाहाले त्याचा मुडदा सापडला नाही तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याची पत्नी श्रीमंत कैलासवासी सौभती मातुश्री पार्वतीबाईसाहेब ही व श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसाहेब व श्रीमंत कैलासवासी जनोबासाहेब याची पत्नी श्रीमंत

कैलासवासी मातुश्री सगुणाबाईसाहेब ही व श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव-दादासाहेब यांस औरस पुत्र श्रीमंत कैलासवासी भास्करराव ह्मणोन होते ते वारल्यानंतर श्रीमंत कैलासवासी अमृतरावसो यांस दत घेतले ते असे वाड्यात होते श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री पार्वतीबाईसाहेब व गंगाबाईसाहेब व सगुणाबाई साहेब याणी आक्रोश फार केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसाहेब यांची मातुश्री श्रीमंत कैलासवासी मातुश्री गोपिकाबाईसाहेब ही श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसाहेब यांचा काल व्हावयाचे पुर्वी नाशकास गेली ती पंचवटीस होती त्यांचा आक्रोश किती ह्मणोन ल्याहावा श्रीमंत कैलासवासी मातुश्री गोपिकाबाईसाहेब यास पुत्र तिघे वडील श्रीमंत कैलासवासी विश्वासरावसाहेब दुसरे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसाहेब तिसरे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसाहेब असे तिघे ही कर्ते पराक्रमी ते तिघे ही ती असताच गेले त्यांचे दुःखास अंतच नाही सदरी लिहिले अन्वये कृत्य केले ही बातमी श्रीमंत कैलासवासी भवानराव प्रतिनिधी व कैलासवासी त्रिंबकरावमामा व नानाफडणीस व मोरोबादादा फडणीस व सखारामबापु व हरीपंततात्या व पागे पथके वगैरे यास कळून यच्यावत सरकारचे पदरचे बुधवारचे कोतवाल चावडीवर जमा होऊन शहरचा बंदोबस्त केला कैलासवासी भिवराव पानसे याणी वाड्यास तोफा लावण्याकरिता तोफखान्यातून तोफा व सिड्या आणिल्या सर्वत्रानी विच्यार केला की वाड्यातील बातमी कळत नाही जर तोफा लावाव्या तर अनर्थासी कारण तेव्हा कसे करावे या विचारात तो श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याजकडून बोलावणे आलेवरून कैलासवासी बज्याबा पुरंधरे व मालोजी राजे घोरपडे मुधोलकर असे वाड्यात गेले त्यास सांगितले की शहरचा बंदोबस्त करावा त्याजवरून ते बाहेर येऊन सर्वास जाहाला मजकूर सांगितला नंतर श्रीमंत कैलासवासी भवानराव प्रतिनिधि हे दीडशे लोकानिसी दिली दरवाज्याजवल गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याणी प्रताप मिरधा यांस दरवाज्याचे बंदोबस्तास ठेविले होते त्यांस सांगितले की मी आलो आहे हा मार कानावर घालून परवानगी घ्यावी त्याजवरून प्रताप मिरधा याणे श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यास विनंती केली येऊ द्यावे ह्मणोन आज्ञा जाहाली त्याणे येऊन श्रीमंत कैलासवासी भवानराव प्रतिनिधियांस येका खिजमतगारानिसी वाड्यात घेतले प्रतिनिधि हे श्रीमंत कैलासवासी

रघुनाथराव दादासो होते तेथे गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यास वेढून गाडदी बसले होते प्रतिनिधि आले हे पाहून श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव-दादासाहेब याणी ताजीम घेतली उभयता बसले प्रतिनिधि याणी आमचे लोक बाहेर आहेत ते आत घेण्याची परवानगी सांगावी ह्मणोन बोलले श्रीमंत कैलास-वासी रघुनाथरावदादासाहेब याणी परवानगी सांगितली लोक घेतले ते श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब व प्रतिनिधि बसले होते तेथे गेले ताजिमेबरोबर उभयतास वेढा घालून बसले प्रतिनिधि याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव-दादासाहेब यांस सांगितले की काही आपल्यासी बोलावयाचे आहे येकीकडे चलावे असे सांगून श्रीमंत कैलासवासी सदासिवरावभाऊसो यांचा दिवाणखाना हजारी कारंज्याच्या हौदाकडे आहे तिकडे उभयता गेले आणि प्रतिनिधि यांणी आपल्याकडील लोक दरवाज्यावर ठेविले प्रतिनिधि याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांस बहुत निषेध केला जाहाला मार बाहेर सर्वत्र मंडळी चावडीवर जमा झाली होती त्यास कलविला कैलासवासी त्रिंबकरावमामा यास बोलावणे आल्यावरून वाड्यात गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब व प्रतिनिधि उभयता होते तेथे गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांणी त्रिंबकरावमामा यांस सांगितले की तुह्मी तिकडे जावे त्याजवरून त्रिंबक-रावमामा हे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसाहेब यांचे प्रेत पडले होते तेथे गेले पुढील विधि जाहाला पाहिजे यास्तव श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री पार्वतीबाईसाहेब याजकडे गेले त्याचे मुखे श्रीमंत कैलासवासी नारायण-रावसाहेब याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसो ही महिना दीड महिन्याची गरोदर हे समजले तेव्हा विधि करावयाचा प्रकार राहिला श्रीमंत कैलासवासी नारायणरावसाहेब यांचे प्रेत त्रिंबकरावमामा हे वाड्यातून बाहेर नेऊ लागले ते समई गाडदी याणी आड घातला की आमचे तलबेची वाट काय तेव्हा प्रतिनिधि याणी जिंमा घेतला गाडदी याजकडील येकदोन जमादार व कारकून याजबरोबर आपले पदरच्यातील देऊन प्रतिनिधि याणी आपले घरास पाठवून ऐवज पदरी घातला इतके कृत्य होईपर्यंत आस्तमानचा दोन घटका दिवस आजमासे राहिला श्रीमंत कैलासवासी नारायणरावसाहेब यांचे प्रेत प्रहर रात्रीचे सुमारास त्रिंबकरावमामा याणी वाड्यातून बाहेर आणिले आपले घरचे साहित्य आणवून श्री वोंकारेश्वरासांनिध्ध दहन केले दशांत कर्म जाहाल्या नंतर

श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याणी पदरच्यातील संभावित यांस श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसाहेब याजकडे सातान्यास पाठवून प्रधानकीची वस्त्रे सन आर्बा सबैनात शके १६९५ विजयनाम संवछरी सन मारात आणून घेतली सिरस्त्या अन्वये दागिने वगैरा बहुमान जाहला सदरी लिो अन्वये आपला खावंद मारला हे अनुचित याचा विच्यार करणे प्राप्त असे सरकारचे पदरचे त्रिंबकराव मामा व नाना फडणीस व मोरोबादादा फडणीस व सखारामबापु व हरीपंत तात्या मुछदी व सरकारचे पदरचे सरदार तोफखानेवाले पानसे व पुरंधरे व रास्ते व वामनरावबाबा इत्यादि पटवर्धन मंडळी व पागे पथके वगैरा व श्रीमंत कैलासवासी पंत प्रतिनिधि सुध्धा सर्वांनी चितात आणून श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसो ही गरोदर तिकडे लक्ष राखून राजकारणाचे पैरवीवर नजर ठेविली श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांणी आपण फौजबंद व्हावे जिंनत मकान नबाब निज्यामन आलीखान याजवर मसलत करावी असा मनसब चितात आणून त्रिंबकराव मामा व नानाफडणीस व सखारामबापु वगैरा यांस सलाह विच्यारली श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब हे पुण्यात राहिल्यास राजकारण सिध्ध होण्यास अवघड पडेल हे चितात आणून सलाह दिल्ही कैलासवासी वामनरावबाबा व कैलासवासी परशरामपंतभाऊ व कैलासवासी रघुनाथरावदादा हे घरी होते त्यास येणेविसी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी पत्रे पाठविली त्याजवरून उभयताकडील निााचे स्वाराची पथके त्या सुध्धा वामनरावबाबासो फौज घेऊन गेले त्रिंबकरावमामा वगैरा याजविसी श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांचे चितात संदेह भोसले हे फौजबंद त्यास आनकूल करून घ्यावे त्याजकडे पाठवावयाजोगे त्रिंबकरावमामा यास्तव त्याचे जवळून खातरजमा करून घेऊन बरोबर फौज देऊन भोसले याजकडे रवाना केले सन मारी दसऱ्याचे मुहूर्ते श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो डेरे दाखल होऊन नबाबासी गाठ घालावी या इराद्याने बेदराकडे गेले माहंकाली वगैरा तोफा आशा बरोबर होत्या श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसो ही बरोबर होती श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याचे दत्त चिरंजीव श्रीमंत कैलासवासी दादासो हे ही बरोबर होते नबाबानी सिके कटार आपले कारभारी याजबरोबर देऊन पाठवून दिल्ही नबाबाकडून खंडणी व कांही मुलूक

काही घ्यावयाचा ठरून तह होऊन भेटी जाहाल्या नबाब येऊन भेटले सबब खंडणीचा यैवज घ्यावयाचा तो माफ करून श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब हे कर्नाटकात श्री कार्तीकस्वामीचे दर्शनास ह्मणोन गेले हैदरखान यास अनकूल करून घ्यावे हे चितात आणून त्याजकडे + + + ले + + + कैलासवासी बाजीराव बर्वे यास पाठविले सरकारचे पदरचे मुछदी याणी नबाब निज्यामन आलीखान याजकडील संधान त्याचे पदरचे जिनत मकान रुलामत-दौला याचे विद्यमाने करून अनकूल करून घेतले त्याजकडील फौज कुमकेस यावी असे ठरले त्रिंबकराव मामा यास भोसले याजकडे पाठविले तो प्रकार सदरी लिा आहे त्याणी त्यास अनकूल करून घेतले नाना फडणीस व सखारामबापु व हरीपंत तात्या व त्रिबकराव मामा यांचा व मोरोबा दादा फडणीस व सरका-रचे तोफखानेवाले पानसे व पुरंधर व रास्ते व श्रीमंत कैलासवासी भवानराव प्रतिनिधि व वामनराव बाबा व पांडुरगराव तात्या व परशरामपंत भाऊ व रघु-नाथराव दादा वगैरा यच्यावत करून थोर सरदार पागे पथके यांचा येकविच्यार जाहला नाना फडणीस याणी आर्षांचा उपद्रव जाहला हवा ही सोसणार नाही असी विनंती करून निरोप घेऊन पुण्यास आले व सखाराम बापु यांणी चिरं-जीवाचे मुंजीचे निमित्य करून निरोप घेऊन सासवडास आले हरीपंत तात्या याणी पोटशुळाचे निमित्य करून आठ च्यार दिवस हैराण जाहल्यासारखे दाख-वून सिध्धटेकास श्रीगणपतीचे जवल जातो असी विनंती करून सिद्धटेकावरून पुण्यास आले मागाहून मोरोबादादा फडणीस हे ही आले श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसो यास प्रतिबंध होता त्यास श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो हे आबदल आली गीलज्या याचे लढाईत सोनपत पानपतचे मैदानात जाहली त्या लढाईत गारद जाहले त्यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री पार्वतीबाई साहेब यांचे विच्यारे श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसाहेब यांची मातुश्री कैलासवासी ताई साठी ही दुखण्याने अत्यावस्थ आसा बाहाना करून खोलीत ठेविली त्यांचे समाचाराकरिता ह्मणोन श्रीमंत कैलासवासी सोवती मातुश्री पार्वतीबाईसाहेब ही व श्रीमंत कैलासवासी मातुश्री गंगाबाईसाहेब असी साठे यांचे घरी गेली श्रीमंत कैलासवासी जनाबा साहेब याची पत्नी श्रीमंत कैलास-वासी मातुश्री सगुणाबाईसाहेब ही त्या समई वाड्यात नवती वडुधास श्रीकृष्णा तीर तेथे स्नानाकरितां गेली होती उभयता बाईसाहेब ताई साठी ज्या खोलीत

होती तेथे गेली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याजकडील कारकून वगैरा लोक बरोबर होते ते खोलीचे बाहेर राहिले पालख्याची व स्वारी बरोबर कैलासवासी जनार्दन राम आ + + + यांची पागा व स्वार जावयाचे त्याची + + ................................ + + + + + + ........................... + + + + + + ............... ..................................... + + + वाटेने काढून पालखीत बसवून शहराबाहेर आणिली तेथे आणखी स्वार उभे केले होते ते मिळाले तेथून बाबादेवचा घाट चढून वर आले तेथे ही स्वार ठेविले होते ते मिळाले शहरात बातमी कळून पिछा व्हावयाचे पुर्वी नाना फडणीस व सखाराम बापु याणी छ १८ जिलकाद सन आर्बा सबैन मया व आलफात पुरंधरास नेली तेथे जाताच तोफा जाहल्या नंतर शहरात कलले आसा बंदोबस्त केला होता मसलत सिद्ध जाहली सदरी त्रिबकराव मामा याजकडून खातरजमा करून घेऊन फौज देऊन भोसले याजकडे पाठविले त्याणी भोसले यास संधान करून आनकूल करून घेतले याचे लिहिले आहे त्याणी पुण्याचा रोख धरला हे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब यांची स्वारी कर्नाटकात श्रीकार्तीकस्वामीचे दर्शनाकरिता ह्मणोन गेल्याचे सदरी लिा आहे त्यांस समजला बंदोबस्ताकरिता ह्मणोन स्वारी माघारी फिरली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाो याजबरोबर सरकारची हुजरात वगैरा यास निघोन येणे विसी पत्रे गेली श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाो याजबरोबर लोक होते त्याचे घरी जप्त्या पाठविल्या कलमज्यारी सुरवात जाहली त्रिबकराव मामा सरकारचे फौजेत मुखत्यार जाहले त्याजकडे जंगी सामान व हशमाचे रिसाले व सरकारचे पागे पथके वगैरा येऊन मिलाले हरीपंत तात्या पुण्यास होते ते पुण्याहून निघाले वामनरावबाबा हे परशरामपंतभाऊ व रघुनाथरावदादा याजकडील निाचे स्वाराची पथके त्या सुद्धा श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाो याजवळून निघाले वामनरावबाबा त्रिबकरावमामा यास सामील व्हावयाकरिता गेले त्याची व हरीपंत तात्या याची गाठ बारामतीचे असपास त्या सुमारास पडली असे ऐकण्यात त्या सुद्धा त्रिबकरावमामा यास सामील जाहले नबाब निज्यामन आलीखान याजकडील राजकारण करून त्यास अनकूल करून घेतले त्याजकडील फौज कुमकेस यावी असे ठरले तो प्रकार सदरी लिा आहे त्याजकडील फौज येऊ द्यावी ते न केले सदरी लिहि-

लेले यच्यावत येक होऊन फौजेचा जमाव जाहला इतक्याने काम होईल हा इरादा त्रिंबमरावमामा याणी चितात आणून श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याजबरोबर लढाई द्यावी असा मनसबा ठरला जंसरपूरनजीक कोसगावचे मैदानात सन मजकूर सन आर्बा सबैनात लढाई छ चैत्र शु. १५ शके १६९५ विजय नाम संवत्छरे जाहली ईश्वरइछे लढाई बिघडली त्रिबकरावमामा यास सरकार कामावर जखमा कहरी लागोन पाडाव गेले सरकारचे फौजेत हरीपंततात्या प्रमुख जाहले नबाबाकडील फौज येऊन पोहचली त्रिबकरावमामा यास जखमा लागोन पाडाव गेले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याचा जखमानी त्यांचा काल लस्करात चैत्र मासी सन मजकुरी जाहला श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याजबरोबर सरकारची हजुरात वगैरा लोक होते ते फुट्टन निघोन हरीपंत तात्या यास सामील जाहले सरकार फौजेची जमीयत अधिक जाहली सर्व येक दिल जाहले आपला परिणाम लागणार नाही हे समजून श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याणी उतर पथ धरला त्याचा पिछा हरीपंततात्या हे फौजेत प्रमुख ते आदीकरून सर्वांनी केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो यांचा जन्म पुरंधरी शके १६९६ जयनाम संवत्छरी सन मजकुरी सन आर्बा सबैन मया व आलफात अधिक वैशाख शु. ७ सप्तमी इंदुवारी माध्यांनी जाहल्याचे वर्तमान सरकारचे फौजेत हरीपंत तात्या वगैरा सरदार होते त्यास समजले लस्करांत गुडया उभ्या केल्या तोफाची सरबती केली हतीवरून साखरा वाटल्या दुष्टाचे शासन व साधुचे पाळण करावे या करिता पुर्वी देवानी अवतार घेतले त्या समई जसा प्रजेस संतोष जाहला तद्वत प्रजेस संतोष जाहला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसाहेब हे ईश्वरी अवतारच्च त्याच शकी गोविंद हरी पटवर्धन यांचे तिसरे चिरंजीव कैलासवासी पांडुरगराव तात्या यास दुसरे चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा यांचा जन्म पौष शु. ४ बुधवारी किले मिरज येथे जाहला श्रीमंत कैलासवासी सवाई माधवरावसो यास प्रधानकीची वस्त्रे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो यांचेच्च कारकिर्दीस सन मजकूर सन आर्बा सबैन वैशाखमासी जाहली सिरस्त्या अन्वये दागीने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत कैलासवासी सवाई माधवरावसाहेब हे पंत प्रधान जाहले हरीपंततात्या सरकारची फौज पागे पथके वगैरा घेऊन श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब × × ... ... ... × × त्याचे नि।।चे

स्वाराची पथके त्या सुध्धा होते नव ×× ... ... ... ×× ज सुध्धा कुमके बा निघाले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसाहेब ही स्वारी बरोबर होती ती ++ ... ... ++ ली आपण घाटाखाली उतरून गुजराथेत गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावसो यांणी इंग्रजी सरकारचा आश्रा केला हरीपंततात्या बराणपूरचे आसपास आले नवाब बेदराहून निघाले ते खानदेशात आले त्यांचे भेटी करिता नाना फडणीस व सखारामपंत बापु हे पुरंधराहून फौज सुध्धा निघोन बराणपूरचे सुमारास गेले नबाबाच्या भेटी देऊन नाबीजंग घोसे पंधरा वीस हजार अजमासे फौज व गाडद तोफखाना सुध्धा कुमकेस येऊन बेदवाडचे मुक्कामाहून नबाबा माघारे गेले नाना फडणीस व सखारामबापु पुरधरास आले हरीपंत तात्या फौज सुध्धा तिकडे होते केसोपंत दातार राजे बाहादर याजकडील जंबूसरचा मामलेदार मर्द होता तो श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याजकडे मिळाला त्याजवल इंग्रजाचे पलटणचे लोक व ++++ पैकी काही लोक होते तो खानदेशात नंदुरबार सुलतानपूर नेर वगैरे मुलकास उपद्रव करून ठाणी बसऊ लागला त्यांचे बंदोबस्तास हरीपंततात्यानी गणेशपंत बेहरे याजबरोबर फौज व गाडदी मिळून दाहा हजार पावेतो सरंजाम व तोफखाना देऊन पाठविले हरीपंत तात्या हे हुजरातची फौज वगैरा घेऊन देसी आले मागे केसोपंत दातार राजेबाहादर व गणेशपंत बेहरे यासी सिल सिका चालला होता पुढे कैलासवासी माहादजी सिंदे याणी इंद्रसेन वकील इंग्रजाकडील याचे विो तह केला नंतर दातार यास पुण्यास आणिले व बहरे ही पुण्यास आले इंग्रजाकडील पलटणे घेऊन श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो हे पुण्यास येणार ह्मणोन समजले त्याजवरून हरीपंत तात्या यास पुन्हा तिकडे पाठविला त्याजबरोबर जाण्याकरिता वामनरावबाबा हे परशरामपंत भाऊ व रघुनाथरावदादा हे उभयता पेठ्यातील त्या सुध्धा घराहून निघोन गेले ते त्यास सामील जाहाले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यास औरसपुत्र श्रीमंत रो बाजीरावसाहेब यांचा जन्म धोरस शके मजकुरी पौष शु. १० जाहला हे वर्तमान हरीपंत तात्यास समजले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याणी इंग्रज सरकारची पलटणे घेऊन आले त्याचे मोकाबल्यास हरीपंत तात्या सरकारची फौज हुजरात वगैरा घेऊन गुजराथेत गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो याणी इंग्रजी सरकारचा आश्रा केला सरकारचे फौजेचा जमाव

पाहून ही फौज कोणाकडील ह्मणोन श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांचा शागिर्द कैलासवासी हरीपंत भिडे यास इंग्रज बाहादूर याजकडील पलटणचे सरदार याणी विच्यारिले त्याणी फौज आपली ह्मणोन सांगितले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो इंग्रजी सरकारची पलटणे वेऊन आले त्याजवर हरीपंततात्या याणी सरकारची हुजरात फौजेविसी घोडी घातली महीचे किनाऱ्यास अनंद मोगऱ्याचे मैदानात लढाई जाहली त्या समई वामनरावबाबा याणी पेस्त्यातील परशरामपंतभाऊ व रघुनाथरावदादा सुध्धा घोडी घातली कैलासवासी मालोजी राजे सुधोलकर यास जखमा लागल्या इंग्रजी सरकारचे लोक कांही मारले गेले कांही लोक बच्यावले ते दुसरी पलटणे पिछाडीस होती त्यात श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो होते त्यास येऊन मिळाले हरीपंत भिडे यांचे त्याचेच तोंडांत घालून जबे केले आणि आपण व श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो असे खंबाईतास जाहजात बसून भावनगरावरून सुरतेस गेले इंग्रजी सरकारानी त्यास महमुदी बागेत ठेविले ह्मणोन ऐकण्यात वामनरावबाबा हे व परशरामपंतभाऊ व रघुनाथरावदादा हे पेस्त्यातील त्या सुध्धा हरीपंततात्या याजबरोबर होते त्याणी सरकार चाकरीविसी कसूर केला नाही त्यांचा काल बराणपूर नजीक बरणगाव तापी कीनारा त्या मुकामी सन सित सबैन मया व आलफात छ ७ रमजान शके १६९७ मन्मथ नाम सवंत्छरे कार्तिक शु. ९ गुरुवारी जाहला श्रीमंत कैलासवासी सदा सिवरावभाऊसो यांचा तोतया ह्मणोन पुर्वी सन सलास सबैन मया व आलफात श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो थोरले याचे कारकिर्दीस जाहला होता त्याची चौकसी करून श्रीमंत कैलासवासी सदासिवराव भाऊसो नव्हेत असा निश्चय होऊन त्याचे पायात बेडी घालून मिरज किला त्यात ठेवावयास वामनरावबाबा याजकडे पाठविला तो काही दिवस मिरजेच्या किल्यात कैदेत होता नंतर रत्नागिरीचे किल्यात ठेवावयाकरिता कैलासवासी रामचंद्र नाईक पराजपे नि॥ कैलासवासी महिपतराव कृष्ण साठे याचे स्वाधीन केला तो प्रकार सदरी लिहिला आहे त्यास रामचंद्र नाईक अनकूल होऊन त्यास मोकळा करून पायदल व स्वार जमाव करून कोकण प्रांती आमल बसविला पुण्यास येण्याचा इरादा हे समजल्यावरून कैलासवासी माहादजी सिंदे व कैलासवासी तुकोजी होलकर कैलासवासी विसाजी कृष्ण यांचे स्वारी बरोबर होते ते उजन व इंदूरास छावणीस आले त्याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव

दादासो याजकडे मिलो नये या राजकारणास माहादाजीपंत गुरुजीस पाठविले त्याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासोकडे मिळू न देता त्यास घेऊन पुण्यास सन सित सबैनचे अखेरीस आले सिंदे यास तोतयाचा बंदोबस्त करणे ह्मणोन आज्ञा जाहाली सिंदे राजमाचीस गेले त्याणी तोतयाचा पिछा केला तोतया तेथून निघोन त्याच घाटाने उतरोन तरांड्यात बसोन मुंबईस जात होता तरांडी वाऱ्याने हाटली ती खापेटीचे बंदरास गेली तेथे राघोजी आंगरे याचे आरमार होते त्याणी धरला त्याजपासून माहादजी सिंदे याणी पुण्यास आणिला नंतर पुण्यात त्याची चौकसी होरून श्रीमंत कैलासवासी सदाशिवरावभाऊसो नव्हेत असा निश्चय करून तोतयास उंटावर बसवून शाहारात फिरवून कुंभार वेसीच्या वाटेवर चुन्याचे चाकाजवळ मेकसु डोईत घालून मार्गसीर्ष शु. ७ मंगलवारी शके १६९८ दुर्मुख नाम संवत्छरी सन सबा सबैन मया व आलफात ठार मारला पुढे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो यांचा काळ सातारे मुकामी सन समान सबैन मया व आलफात शके १६९९ हेमलंबी नाम संवछरे मार्गसीर्ष मासी जाहला त्यास पुत्र नाही त्यास दत श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसाहेब याचे कारकिर्दीस सरकारचे कारभारी कैलासवासी नाना फडणीस वगैरा होते त्याणी त्रिंबकजी भोसले बावीकर यांचे दुसरे पुत्र यांस शके १७०० विलबी नाम संवत्छरी दिल्हे त्याचे नाव श्रीमंत कैलासवासी शाहू माहाराज यांचे ठेविले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संस्थान पन्हाळा याचे पदरचे कैलासवासी येसाजी सिंदे व सटवाजी भोसले याणी फौज ठेऊन सरकारचे माहालात सील सिका करू लागले त्याचे पारपत्यास माहादजी सिंदे यास माईकाली तोफा बरोबर देऊन पाठविले त्याणी करवीरास मोर्चे लाविले हरीपंत तात्या यांस हैदर नाईक याणे कर्नाटक माहाली आमल बसविला सबब त्याचे पारपत्यास फौज सुद्धा पाठविले होते मागे पुरंधरास फौज नाही ही संधि पाहून शके १६९९ हेमलंबी संवत्छरी कैलासवासी मोरोबा दादा फडणीस याणी श्रीमंत कैलासवासी मातुश्री पार्वतीबाईसाहेब याजपासून जरीपटका घेऊन होलकर यास सामील करून घेऊन शंकराजी घोरपडे वगैरा हुजरात ठेऊन पुरंधराखाली कोढीतावर जाऊन राहिले किला व श्रीमंतास हवाली करावे असे बोलणे सखाराम बापु ही फितुरात नाना फडणीस याणी प्रतिनिधीचे पथक गणेशपंत कात्रे वगैरा असे पुरंधराखाली ठेविले होते नाना फडणीस याणी हरीपंततात्यास पत्र माघारी

येण्याविसी लिहिले व कैलासवासी गोविंदभट निछुरे यांस माहादजी सिंदे याजकडे पाठवून करवीरकराचा समेट करून माघारे आणिले दोनी फौजा मिलाल्या मोरोबा दादा यांचे व तुकोजी होलकर आसे येक विच्यारे होते सिंदे फौज सुद्धां तयार जाहाले होलकर यास बोलाऊ पाठविले ते ही फौजसुद्धा आले सिंदे व होलकर असे बोलण्याकरिता येक ठिकाणी बसले होलकर यांस नरम गरम गोष्टी सांगितल्या मोरोबादादा व त्याजकडील आपाजीपंत गोधलेकर व केसोपंत पालंदे गोपालपंत तांबेकर आनंदराव खासगीवाले वगैरे मंडली यांस केले संक्राजी घोरपडे हे मोरोबादादा याजकडे होते त्यास निरोप देऊन काढोन दिल्हे मोरोबादादा याणी बहुल भिमातिरी त्यांचा गांव तेथे राहावे फंद फितूर करू नये असे ठरावात आणून तेथे शके १६९९ हेमलंबी नाम संवत्छरे ठेविले वरकड मंडली यांस कैदेत ठेविले होलकराची दिवाणगिरी येशवंतराव गंगाधर यांस सांगितली शके १७०० विलंबी नाम संवत्छरे सु॥ तिसा सबैन मया व आलफ सिंदे जामगावास गेले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याणी सखारामबापु याजकडे संधान केले श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासाहेब याणी इंग्रजाची पलटणे घेऊन पुण्यास यावे असा बेत करून मुंबईहून इंग्रजी सरकारची पलटणे घेऊन त्याजकडील सरदार इष्टुर फाकडा बोर घाट चढोन कारल्यावर आले पुण्यास येणार हे वर्तमान समजल्यावरून सिंदे यांस पुरंधराहून सरकारची आज्ञापत्रे गेली त्याजवरून ते फौज सुध्धा जांबगावाहून निघाले ते येऊन पोहचले पुरंधराहून नाना फडणीस व सखाराम बापु असे व सिंदे होलकर सुध्धा दाभाड्याचे तळेगाव नजीक मुकाम जाहाला तलेगावात कडबा भरून आग लाविली पुण्यात घरोघर कडबा भरून आग देण्यास तीन हुकूम आले वस्ती वोस होऊन कडबे भरले नारो आपाजीनी इंग्रज दोन कोसावर येई तोपर्यंत आग द्यावयाचे थेपून धरले इष्टुर फाकडा याजबरोबर दोन पलटणे तो बरांड्याहून कारल्यावर मुकामास आला त्याने सांगोन पाठविले की तुमचा आमचा खिस्सा रयतेस काय ह्मणोन जालीता आणि करल्याहून कूच होऊन तलेगावावर येणार हे समजून तलेगावस आग दिल्ही त्याणे तल्याजवल उभे राहून बंब लावून गाव विझविला सरकारच्या फौजा त्यांचे लस्करात रसद न जावी सबब भवताल्या फिरत सरकारचे तोफखान्यातील सैद गोलंदाज याणे दुर्बीण लावून इष्टुर फाकडा बसला होता तेथे सबसिकल तोफेचा गोळा मारला तो गोळा इष्टुर फाकडा यांस लागोन ठार जाहाला पलटणे फिरोन

माघारे जाऊ लागली ते समई श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांस हवाली करावे असे सांगून पाठविले त्याणी कबूल केले माद्दादाजी सिंदे यांचे विो इंग्रजी सरकारचा तह जाहला श्रीमंत रघुनाथरावदादा यांस स्वाधीन करून घेतले पलटणे मुंबईस माघारी गेली श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याजकडील खर्चाचे नेमणूकेस झासी पौ। भाडी तालुका साडे च्यार लक्षाचा व करेरा किला सरकारातून घेऊन श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांस आपलेकडील च्यार हजार फौज व कैलासवासी हरी बाबाजी केतकर यांस बरोबर देऊन हिंदुस्थानात रवाना केले ते होंड पर्यंत नर्मदा तीरी गेले नदी उतरताना हरी बाबाजी घोड्यास पाणी पाजीत उभे होते जवळ श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब व अमृतराव व आनंदीबाई होती संधि पाहून श्रीमंत कैलासवासी आनंदीबाई अमृतराव यास बोलली की रांड्या जाहाला नवतास तुझा काका उभा राहिला आहे यांस मारून निघोन जाऊ असे ह्मणताच श्रीमंत कैलासवासी अमृतरावसाहेब सरंजामानिसी तयार होते ते त्याजवर चालून जाऊन जिवे मारले श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब आपले फौजेनिसी पुन्हा सुरतेस गेले सिंदे यांचे फौजेनी पाठलाग केला नाही सखारामबापु यांचा व कैलासवासी नानाफडणीस यांचा मधे मधे कारभारात खटला होत होता त्याजविसी त्यांचा यांचा ठराव होऊन चौदा कलमे ठरली त्यांत बापुनी ह्यावे करावे व नानानी देवावे करावे असे चालले होते परंतु बापुनी मोरोबादादासी फितूर करून उभे केले व श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासोसी फितूर करून त्यांस आणिले त्याची फितुराची चिठी नानाफडणीस यास सापडली होती व कैलासवासी धोंडभट कटके व जोतीपंत याणी मृदंगात कागद फितुराचे घालून मुंबईस नेत होते ते नानाफडणीस याणी धरले हरीपंततात्या सरकारची फौज घेऊन मुकामी होते सिंदे अनकूल त्यासी बोलोन सखारामबापु यांस कैद करणेचा बेत ठरला तो प्रकार सखारामबापु आपले कन्येचे लग्नाकरिता वसईस गेले होते ते माघारे आले त्यास सिंदे याणी निरोप घेऊन जावयाचे ह्मणोन सखारामपंतबापु व नानाफडणीस यांस मेजवानीस बोलावून निराले बोलावयाचे आहे ह्मणोन सांगितले सखारामबापु व सिंदे असे बोलावयाकरिता दुसरेकडे गेले मोरोबादादाचे व श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब याच्या फितुराच्या चिठ्या सखारामबापु यांस दाखऊन त्याचे पदरी अपराध घालून सिंद्याचे हातून कैद करून सिव्हगडास नेले दुसरे

दिवसी प्रतापगडीस कैलासवासी जयरामपंत बापट याचे हवाली केले तेथून काढून रायगडास गद्रे यांचे हवाली केले तेथे मृत्य पावले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसाहेब यांची मुंज्य पुरधराहून पर्वतीस येऊन चैत्र शु. ५ इंदुवारी शके १७०१ विकारी नाम संवत्छरी सन समानीनात छ ३ रजबी जाहाली समारंभ मोठा जाहाला इंग्रजानी बावामलंगास मोर्चे लावून वसई कल्याण वगैरे तालुके घेतले ह्मणोन कैलासवासी रामचंद्र गणेश फौज सुध्धा वसईकडे पाठविले मशारनिल्हे सन ... ठार जाहले गोविंद हरी यास आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता ठरवून दिल्हा तो प्रकार सदरी लिहिला आहे त्यांचा काल जाहल्यानंतर त्यांचे दुसरे चिरंजीव कैलासवासी वामनरावबाबा यास सरदारीची वस्त्रे सन सलास सबैन मया व आलफात दिल्ही त्यांचे नावे पेशजी प्रो आठ हजार स्वारानिसी चाकरी करण्याचा तैनात जाबता सन आर्बा सबैनात करून दिल्हा त्याचा काल जाहल्यानंतर त्यांचे धाकटे बंधु कैलासवासी पांडुरंगरावतात्या यास सरदारीची वस्त्रे सन सबा सबैन मया व आलफात दिल्ही त्याचे नावे पेशजी प्रो तैनात जाबता व्हावयाचा परंतु मसलतीचे कारणामुळे न जाहाला पांडुरंगराव तात्या हे सरकार हुकमावरून हैदरखान याचे पारपत्याबद्दल कर्नाटकांत गेले हैदरखान यांचे फौजेची लढाई सन सबा सबैनात पौष व. ३० अमावास्येस कर्नाटकात गेले कोलवाड नजीक सावसी तालुके कुंदगोलचे मैदानात जाहाली ईश्वर इच्छे लढाई बिघडली त्यासमई पांडुरंगराव तात्या यांस सरकार कामावर जखमा कहरी लागल्या व कैलासवासी कोन्हेररावकाका कुरुंदवाडकर हे ठार जय पराजय ही इछा ईश्वराची पांडुरंगराव तात्या पाडाव गेले त्यास कैदेंत ठेविले सरकार चाकरी बदल बेडी बंदखाना त्यांतच त्याचा शेवट जाहला पांडुरंगराव तात्या हे सरकार कामास आले ही कदर जाणोन त्याचे वडील चिरंजीव कैलासवासी हरीहरराव यास सरदारीची वस्त्रे सन जाहाली त्याचे नावचा तैनात जाबता त्या समई व्हावयाचा परंतु मसलतीचे कारणामुळें न जाहला मुतालकेची सिके कठार दिल्ही सरकारचे दरबाराकडील नि॥चे कारकून हे किर्दीस वि॥ हरीहरराव पांडुरंगराव ह्मणोन लिहू लागले इंग्रजी सरकारची पलटणे पुण्यास येण्याचे इराद्याने मुंबईहून निघाली त्याजवर सन इहिदे समानीनात हरीपंततात्या फडके याजबरोबर सरकारची हुजरात व तोफखाना वगैरा सरदार व हरीहरराव याजकडे आठ हजार फौजेची

मालकता सदरहू आठ हजार पौ परशरामपंत भाऊ व रघुनाथरावदादा याचे निाचे स्वार ते त्या सुध्धा जाणेविसी आज्ञा जाहली त्याजवरून गेले त्याणी इंग्रजी सरकारचे पलटणात रसद भरून जात होती ते बैल लुटून आणिले बोर-घाटाखाली चौकावर सरकारचे फौजेची व इंग्रजी सरकारचे फौजेची लढाई जाहाली त्या समई गोविंद हरी याचे चुलत बंधु कैलासवासी अंताजीपंततात्या यांचे वडील चिरंजीव कैलासवासी बलवंतराव दिक्षित व दुसरे जनोबा सुभेदार या उभयता बंधुस जखमा लागल्या दोही सरकारची ज्याहानगिरी जाहाली इंग्रजी सरकारची पलटणे वगैरा मुंबईस गेली नंतर फौजा माघाऱ्या आल्या श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसाहेब यांचे लग्न करावयाचा निश्चय सन सलास समानीनात ठरला कैलासवासी केशव बहिरवनाईक थते केतकी बिबली तो आंजनवेल नजीक श्री परशाराम येथील जोसी उपाध्येपणाची वृति आलिकडे औरंगाबादेस राहात होते त्याची कन्या वधू नेमिली लग्नपत्रे श्री देवास व श्री शंकराच्यार्य व चिंचवडकर देव व जयरामस्वामी वडगांवकर वगैरा व साधूची संस्थाने व सिष्टास व श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम-साहेब संस्थान सातारा यास दत दिल्हे ते श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहूराजे हे तक्तनिषीन होते त्यांचे शेवेसी विनंतीपत्र लिहून संभावित ग्रहस्थ आमंत्रणास पाठविले श्रीमंत कैलासवासी महाराज छत्रपति संस्थास पन्हाळा यांचे शेवसी विनंतीपत्र व दोन्हीकडील पदाधिकारी पंत प्रतिनिधि वगैरा यांस व जिंनत मकान नबाब निज्याम आलीखान यांस वगैरा व राजेरजवाडे व संस्था-निक दक्षण व हिंदुस्थानचे व पदरचे सरदार सिंदे भोसले होळकर व आली बाहादर व पटवर्धन व रास्ते व विंचूरकर व ओढेकर वगैरा मानकरी व पानशे तोफखानेवाले पागे पथके आंगरे व धुलप वगैरा पैकी पुण्यात होते त्या खेरीज त्यास पत्रे सिरस्त्या आन्वये लिहिली लग्नाचे समारंभाची तरतूद नानाफडणीस याणी सरकारचे वाड्यात जागोजाग मंडप केले होते त्यांत कारंजी व आरशे व बिलोरी झाडे वगैरा लाविली होती त्यांत बैठका सदरहु आन्वयेच थते याज-कडील मंडपाची ही तयारी जागोजाग बैठका व मेजवानीची व ब्राह्मण भोजनाचे मंडप व भोजनाची तरतूद व रस्तोरस्ती चिराखदान श्रीमंताचे अंबारीपुढे तक्त-रावा त्याजवर कलावंतीणीचा नाच व बागशाई कागदी दोहो बाजूने स्वारी बरो-बर चालावयाची व नक्षत्रमाळा व्यालछत्रे व तोरणे व हतीचे वगैरा रथ व हत्ती-

वरील अंबाऱ्या ऐन्याच्या वगैरा व हवदे असे मिळोन अजमासे चालीस पनास व अंबारी बरोबर दुशाब व हतीवर महताफा व जिलीबीत चालावयाचे जंबुरे व रंगाची तरतूद गुलाल गोटे व रंगाची कारंजी व अतषबाजी वगैरा असी बहुत च तारीफ लायक केली होती व कामाचे नेमणूकीची याद केली त्यात कामगार याणी आपआपले कामाची तरतूद राखण्याचा तपसील लिहिला आहे त्या यादीची नकल आमचे जवल आहे ती बार करावी तर विस्तार फार होतो सबब आलाहिदा नेमणूक कोणाकडे काय ते व त्याणी आपआपले कामाची तयारी कसकसी ठेवावी ते नजरेस यावयाकरिता आलाहिदा सदरहूचे पुरवणीस लाविली आहे यादीबरहुकूम ज्याची त्याणे कामे दुरस्त राखिली होती लग्नाचे समारंभ स श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो यांस दत दिल्हे ते श्रीमंत कैलासवासी शाहूराजे धाकटे त्याची स्वारी साताऱ्याहून आली होती व नबाब निज्याम आलीखान याणी आपले चिरंजीव जिनत मकान पोलादजंग व त्याजबरोबर कारभारी तहवरजंग देऊन पाठविले ते आले होते व रास्ते व पुरंधरे वगैरा व राजश्री चिंतामणराव आपासाहेब त्याचे बंधु कैलासवासी विठलराव बापुसह परशरामपंत भाऊ व रघुनाथरावदादा व राजश्री चिंतामणरावआपा याचे चुलते ती॥ गंगाधररावकाका वगैरा पटवर्धन मंडली असे यच्यावत आले होते माहादजी सिंदे मात्र हिंदुस्थानात होते लग्न शके १७०४ माघ शु. ९ इंदुवारी सन मार सन सलाम समानीनात जाहाले साड्याचा समारंभ जाहाला श्रीमंत कैलासवासी सौवती मातुश्री बाईसाहेब यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसो थोरले त्यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी सौवती—मातुश्री रमाबाईसाहेब यांचे नाव ठेविले नंतर साखरा वाटल्या सिष्टाच्यार गोपा वगैरा समारंभ जाहला व खुषी बदल तोफाची सरबती बहुत जाहाली जसा ज्याचा दरजा तदारूक त्यांचा सन्मान ब्राह्मणास देकारही मोठाच जाहला रंगाचा व परवती नजीक मोठी अतसबाजीचा समारंभ जाहला अतषबाजीचे समारंभास पोलादजंग आले होते लग्न समारंभाचा तपसील किती ह्मणोन ल्याहावा श्रीदेवाच्या येथील स्वयंवराच्या गोष्टी पुराणांतरी ऐकिल्या तदोपन समारंभ जाहला समारंभास सरकारचे पदरचे वगैरा आले होते त्याजबरोबर फौज त्यांचा अदमास येकंदर चालीस पनास हजाराचा सुमार काही जाजतीच होईल खेरीज पायदल चौक्या वगैरा बंदोबस्तीचे कैलासवासी पांडुरंगरावतात्या हे सरकार हुकूमावरून हैदरखान यांचे पारपत्याबद्दल

कर्नाटकात गेले हैदरखान यांचे फौजेची लढाई सन सबा सबैनात पौष व. ३०. अमावास्येस कर्नाटकात कोलवाड नजीक सावसी तालुके कुंदगोलचे मैदानात जाहाली ईश्वर इछे लढाई बिघडली त्या समई पांडुरंगराव तात्या यास सरकार कामावर जखमा कहरी लागल्या येश अपेश ईश्वराचे हाती पांडुरंगराव तात्या हे पाडाव गेले त्यास कैदेत ठेविले सरकार चाकरीबदल बेडी बंदखाना त्यातच त्यांचा सेवट जाहला पांडुरंगराव तात्या हे सरकारकामास आले ही कदर जाणोन त्यांचे वडील चिरंजीव हरीहरराव यास सरदारीची वस्त्रे सन तिसा सबैन मया व आलफ छ ९ रमजान शके १७०० विलंबी नाम संवत्छरे आश्विन शु. १० गुरुवारी दसरेचे दिवसी किले पुरंधरचे मुकामी पूर्वरात्रीस जाहाली त्यास मुतालकीची सिके कठार दिल्ही त्यांचा काल सन सलाम समानीन मया व आलफ छ २४ जाखर ज्येष्ट व. ११ सौम्यवारी शके १७०४ शुभकृत नाम सवत्छरे मिरजेत जाहला नंतर त्यांचे धाकटे बंधु राजश्री चिंतामणराव आपासो यास सरदारीची वस्त्रे सन सलाम समानीन मया व आलफ छ ३ रोवल शके १७०४ शुभकृत नाम सवत्छरे माघ शु. ५ गुरुवारी प्रातःकालचे प्रहर दिवसाचे सुमारास पुणे मुकामी जाहली सरकार कीर्दीस वि॥ चिंतामणराव पांडुरंग ह्मणोन लिहू लागले राजश्री चिंतामणराव आपासो यास वस्त्रे जाहल्यानंतर त्याचे नांवचा तैनात जाबता व्हावयाचा परंतु जाहला नाही हिंदुस्थानात माहादजीसिंदे याजकडे ग्वालेरीस इंद्रसेन वकील इंग्रजी सरकारातून मुखत्यार होऊन तहाकरिता आले सिंदे याणी नाना फडणीस यांचे समत घेऊन तह केला नंतर इंग्रजी सरकारचे विच्यारे श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो सुरतेहून निघोन गंगा तीरी कचेश्वरासानिध्य सितापखेड येथे आले त्यांस हरीपंततात्या फडके जाऊन भेटून आले तेथे खर्चाची नेमणूक करून बंदोबस्त करून कोपरगावास ठेविले श्रीमंत कैलासवासी नारायणरावसो यांस मारण्याचे कृत्यांत तुळाजी पवार व सुमेरसिंग व खरकसिंग असे होते त्यास धरून आणून त्यांच बोटात सुया टोचून चिंध्या बांधून आग लावून हाल करून मारले पुढे काही दिवसानी श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासाहेब यांचा काळ शके १७०५ शोभकृत नाम संवत्छरी सन आर्बा समानीनात मार्गसीर्ष व. ३ त्रितीया गुरुवारी कोपरगावनजीक सितावखेडास गंगा तीरी जाहला त्या समई त्याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसाहेब ही गरोदर पांचा महिन्याची होती ती सन आर्बा समानीन शके १७०६

चैत्र शु. ९ नवमी क्रोधननाम संवत्छरी भोमवारी प्रसूत जाहली पुत्र जाहाला त्याचे नाव श्रीमंत कैलासवासी चिमाजी आपासो यांचे ठेविले पुढे सन......
कैलासवासी समशेर बाहादर सोनपत पानपतास गारद जाहाले तो प्रकार सदरी लिहिला आहे त्याचे चिरंजीव कैलासवासी आली बाहादर बाबा यांस फौजेतून माहादजी सिंदे यांचे कुमकेस पाठविले नबाब निज्याम आलीखान याजकडे सरकारी जाबसाल बोलण्यात येऊन उलगडावयाचे यास्तव सन.........सरकारचे कारभारी कैलासवासी नाना फडणीस व हरीपंततात्या फडके असे फौज देऊन पाठविले नबाब हैदराबादेहून यादगिरीस आले तेथे सरकारचे कारभारी नाना फडणीस व हरीपंततात्या यांच्या भेटी जाहल्या सरकारी जाबसाल बोलण्यात येऊन उलगडले नंतर कर्नाटकात कारभारी नाना फडणीस फौज सुध्धा गेले कैलासवासी तुकोजी होलकर व चिमणा बापु भोसले नागपूरकर व परशरामपंतभाऊ तासगावकर असे बरोबर होते बदामीचा किला व रणमंडल ह्मणोन बदामी नजीक किला घेतला नंतर माघारे आले ते मिरजेस आले तेथे मेजवानकी होऊन तासगावास गेले तेथून पुण्यास गेले सन तिसैन मया व आलफात जिनत मकान टिपू सुलतान याजवर मसलत करण्याचे विच्याराकरिता परशरामपंतभाऊ तासगावकर यास सरकारचे बोलावणे आल्यावरून पुण्यास गेले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो व सरकार कंपणी इंग्रज बाहादूर व जिनत मकान नवाब निज्यामन आलीखान याचे विच्यारे टिपूवर मसलत करावी असे ठरले सरकारातून राजश्री चिंतामणराव आपासो याचे नावे साहेब सुभा कर्नाटकात जाणेविसी आज्ञा जाहली इंग्रजी सरकारची दोन पलटणे बरोबर घ्यावी असे बोलण्यास येऊन ठरले हुजरातीकडील फौजेत सरकारातून नि॥स हतीवरील नौबत दिल्ही सरकारातून तोफखाना व पागा वगैराची नेमणूक जाहली परशरामपंतभाऊ हे पुण्याहून आले नंतर सरकार हुकुमाबरहुकूम कर्नाटकात जाणेकरिता सन मजकूर अखेरीस राजश्री चिंतामणराव आपासो मुहूर्ते बाहेर छ निघाले परशरामपंतभाऊ व रघुनाथरावदादा असे आपले नि॥चे स्वार घेऊन मुहूर्ते बाहेर निघाले राजश्री चिंतामणराव आपासो हे आपले इलाख्यातील मिरजप्रांतातील मौजे कुमटे कर्यात मनेराजुरी हा गाव घाटगे याजकडील सरंजामाचा त्या मुकामास गेले परशरामपंतभाऊ वगैरे असे त्या मुकामी आले सरकारचा तोफखाना व बाणाच्या कैच्या वगैरा जंगी सामान बरोबर यावयाचे ते घेऊन कैलासवासी माधवराव

कृष्ण पानसे व सरकारच्या पागा व हशमाचे रिसाले वगैरा असे त्या मुा आले व इंग्रजी सरकारची पलटणे दोन बरोबर असावी असे बोलण्यात ठरले ती याव-याची ती ही त्याच मु॥ इंग्रजी सरकारचे पदरचे लिटलीसाहेब बाहादुर घेऊन आले राजश्री चितामणराव आपासो याची प्रकृत आशक्त पर्जन्य कालचे दिवस निभावणी पडणार नाहीं यास्तव त्याचे खास पथक व त्याचे पेट्यातील परशराम-पंतभाऊ व रघुनाथरावदादा याचे नि॥चे स्वाराची पथके ती व सरकारचा तोफ-खाना व पागा व इसमाचे रिसाले वगैरा असे बरोबर घेऊन परशरामपंतभाऊ सन इहिदे तिसैन मया व आलफात कर्नाटकात गेले धारवाडास मोर्चे सन मज-कुरी छ ३० जिलहेन शके १७१२ साधारण नाम संवत्छरे भाद्रपद शु. २ गुरुवारी बसविले धारवाडचे पेठेवर हला सन मजकुरी छ राखर मार्गसीर्ष शु. ८ इंदु-वारी केली त्या समई गोविंद हरी याचे सान्यात वडील बंधु कृष्णभट बापाजी याचे तिसरे चिरंजीव मेघःशामराव बापु याचे प्रथम पत्नीचे चवथे चिरंजीव जनोबा भाऊ यास गोळा लागोन सरकार कामास आले लिटली साहेब बाहादुर याजबरोबर पलटणे आली त्या सिवाय दोन पलटणे घेऊन कर्नेल फेद्रीसो बाहा-दुर धारवाडचे मुकामी आले त्याच मुकामी त्याचा काल जाहला धारवाडचे किल्यात पाण्याची कमती जाहली किल्यात बंद्रीजमालखान होता त्याजकडून सल्याचे बोलणे आले त्याजवरून सन मजकुर सन इहिदे तिसैन मया व आलफ छ २९ रजब शके १७१३ विरोधिकृत नाम संवत्छरे चैत्र शु. १ इंदुवारी त्यास लोका सुध्धा कौल देऊन उतरविले ठाणे सरकारचे स्वाधीन जाहले बंदरीजमाल-खान पोहोचऊन द्यावयाचा करार त्याप्रो त्यास पोहोचऊन द्यावयाकरिता कैला-सवासी जनोबा सुभेदार वगैरा बरोबर दिल्हे त्यांणी त्यास लुटले त्याजकडील तोफा वगैरा घेतल्या बंद्रीजमालखान यास जखमा लागल्या त्याचा कारभारी कैलासवासी हरीदासपंत ह्मणोन होता त्याचे कानात कुंडले होती ती लोकानी वेढून घेतली कान तुटले उभयतास माघारे आणिले जखमा बऱ्या जाहल्यानंतर बंद्रीजमाल-खान याचा कांही खासगत विषय होता तो दिल्हा त्यास लाऊन दिल्हा असे ऐकण्यात तोफा वगैरा काही दिल्हे नाही इंग्रजी सरकारची फौज घेऊन + + + कारनवालीस वगैरा सरदार सुध्धा श्रीरंगपटणास गेले माहागाई बहुत जाहली परशरामपंतभाऊ व हरीपंततात्या व नबाबाकडील फौज जाऊन पोहोचली नंतर लस्करात सुभता जाहली पुढे बरसातीचा मोसुम याजमुळे सरकारची व इंग्रजी

सरकारची व नबाबाकडील फौज अशा आपले हद्देस छावणी करून राहिल्या बरसात आखेर जाहल्यानंतर तिनी फौजा पटणास गेल्या टीपूकडील खंडणी व त्याजकडील मुलूक घ्यावयाचा ठरून तह जहला टिपूचे लेक ओलीस घेतले तीनी सरकारच्या फौजा आपले मकानास जावयाकरिता माघारे फिरल्या परशरामपंतभाऊ याची स्वारी कर्नाटकातून सन हसने तिसैन मया व आलफ अखेरीच्या सुमारास मिरजेस येऊन तासगावास गेले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याचे कारकिर्दीस हवदाच्या चौकाच्या उतरेकडील सोपा व मजघर त्याच्यावर आरसे माहाल व पुढील चौक पहिला ज्यात जवाहिरखाना होता तो उकलून नवा केला व कात्रजेच्या तलावाचा पहिल्या बंधाच्या उतरेस दुसरे बंधाचा पाया घातला होता त्याजकडील काम तयार केले कोठी व सातखणी जलाली परवतीस श्रीदेवदेवेश्वराचे पंच्यायतन त्याचे दक्षणेस सरकारचा वाडा त्याचे नैरित्येचे कोपऱ्यास श्री कार्तीकस्वामीची मुहूर्त स्थापावयाकरिता देऊळ तयार होत होते त्याजवर वीज पडली याजमुळे ते काम तितकेच राहिले कार्तिकस्वामीची प्रतिष्ठा जाहाली नाही श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याचे कारकिर्दीस हिंदुस्थानातील राजे रजवाडयांची व कर्नाटकातील हैदरखान याचा लेक टिपू सुलतान वगैरा याची पारपत्ये पदरचे सरदार याणी केली व खंडण्या घेतल्या व मुलूक ही काबीज केला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधात माधवरावसाहेब यास जिंनत मकान अलीशाब बुलंद अलकाब सुलतान आली गोहर पादशाहा याणी मोठी मेहरबानगी करून दिलीहून वकील मुलतालकीचा खिताब व महीमरातब व नालकी वगैरा व जहागीरीच्या सनदा कैलासवासी माहादजी सिंदे याजकडे गुमास्तगिरी मुकर करून त्यास दागिने वगैरा द्यावयाचे ते आसे शाहा निजामदिंन फकीर याजबरोबर व सिंदे याजकडे पाठविले ते घेऊन सिंदे श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो श्रीमंताचे हुजूर पुण्यास आले किताब वगैरा खिलत आली त्याचा तपसील कलमी केला जातो:—

वकीलमुतलकअमिरुलउमरामुख तारुलममालिकमदारुलमहामेसलतनतउमदै

आराकीनाखिलाफतयारवफादारसिपासालारसाआदतमंदबजां

पयवदंफरजंदखासुलखासवालांजाहांमहाराजाधिराजरावपंडतपरधान सवाईमाधोरावनारायणबाहादूर

खिताबवअतायजागीरबमोजीबजैलबरसाना प्रांताचे नाव १ मथुराप्रांत १ बंदकानूप्रांताचे नाव १ गोकुलबिंदराबन १

खिलआत वगैरा पोषाख

चारकोबनिमआस्तीनतोकामदार निमआस्तीन १ जामा १ दस्तारसरबस्ता १
दुषाला दुपटा कमरबंद बालाबंद चिरा जवाहीर वगैरा

जेगा १ सरपेच मालामरवारीदमयपदक १ कलमदान षमषेर सिपर कलगी-परीदामयलढक नालकीरोगनीजरकारसायेबांदार अस्यरास फिलयकजंजीर सिकेद-बातमयसिका मोरचालदुपालकीजरताबझालरदार

निषाननगीनेमयाफिलान तोमन आलमझंडा तोगा मरातब माही आस्पसं-वारीरास फीलसंवारीजंजीर

गुमास्तेमाहादजीमुकररयात्फ

सदरी लि॥ अन्वये किताब वगैरा आणिले त्या मजकूराचे विनंतीपत्र श्रीमंत कैला-सवासी माहाराज छत्रपति शाहूराजे धाकटे हे तक्तनिषीन होते त्यास लि॥ तेथून आज्ञा आल्यानंतर शहराबाहेर फर्मानवाडी करून सन सलास तिसैन मया व आ-लफ छ १ जिलकाद शके १७१४ परिधावी नाम संवछर आषाढ शु. ३ शुक्र-वारी तिसरे प्रहरी मोठ्या समारंभाने श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माध-वरावसो॥ याची खासा स्वारी तिसरे प्रहरी गेली स्वारीचे बरोबर कैलासवासी नाना फडणीस व हरीपंततात्या वगैरा मुछदी व सरदार होते सिंदे याणी सदरी लि॥ अन्वये आणिली ती घेतली नंतर श्रीमंताची खासा स्वारी पालकीत बसून सर-कार वाड्यात आली श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बाजीरावसो॥ यांचे दिवाण-खान्यात कचेरी जाहाली नजराणा जाहला माहादजी सिंदे याजकडे गुमास्तगिरी मुक्रर करून त्यास दागिने वगैरा द्यावयाचे ते सिंदे याजबरोबर पाठविले ते त्यास वस्त्रे देऊन दिल्हे पुढे श्रीमंत कैलासवासी सौभाग्यवती मातुश्री रमाबाईसाहेब याचा काल माघ व. ४ गुरवार प्रहर रात्रीचे सुमारास छ १८ जमादिलाखर शके १७१४ परिधावी नाम संवछरी थते यांचे घरी जाहाल्यानंतर श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो॥ यांचे दुसरे लग्न शके मा॥र सन सलास तिसैन फाल्गुन शु. ९ भोमवारी छ ७ रजबे शके १७१४ परिधावी नाम संवत्छरी जाहाले कैला-

सवासी गणेश जिवाजी गोखले यांचे घर होलीकुवेसी कर्यात मीठगवणे तालुके विजयदुर्ग प्रांत राजापूर यांची कन्या श्रीमंत कैलासवासी मातुश्री बाईसो याचे येशवदाबाई ह्मणोन नाव ठेविले तो ही समारंभ चांगलाच जाहाला सन मारी माहादजी शिंदे याणी रंगाचा समारंभ करण्याचा तरतूद केली शहरात ही रस्तोरस्ती रंगाचे बंबाची वगैरा तयारी जाहाली सिंदे यांची स्वारी बरोबर आदजमासे दाहा पंधरा हवदे रुप्याचे व रंगाचे बंबाच गाडे व गुलालाचे छकडे असे बरोबर घेऊन आली सिंदे सरकारचे वाड्यात गेले श्रीमंताची स्वारी नाना फडणीस व हरीपंततात्या वगैरा मुछदी व सरदार मानकरी सुद्धा निघाली यच्यावत लोकाचे पोषाख समेत श्रीमंत आंबारीत बसले नाना फडणीस हे दुसरे आंबारीत बसले वरकड हवद्यातून खासा स्वारी दिली दरवाज्याचे बाहेर आल्यानंतर फौज वगैरा होती त्याजवर बंबास नेच्या लाविलेला माहादजी सिंदे याणी हातात घेऊन रंग उडविला श्रीमंताचे आंबारीपुढे तख्तरावा त्याजवर कळावंतीणीचा नाच श्रीमंताची स्वारी सरकार वाडा डावा घेऊन मेहुणपुऱ्यातून ती॥ परशरामपंत भाऊसाहेब यांचे वाड्याचे पुर्वेच्या रस्त्याने आपा बलवंत यांचे घराकडून बुधवारच्या रस्त्यास मिळून कैलासवासी गोविंद सिवराम खासगीवाले यांचे वाड्यापुढे चावडी आहे त्या वाटेने शुक्रवारातून वेताल पेठेकडून आदितवारातून कुंभारखाणी कडून नदीचे पलिकडे भांबवडे यांचे अंगास सिंदे यांचे डेऱ्यास गेली श्रीमंतास वस्त्रे दिल्ही शहरातून स्वारी गेली त्या समई रस्तोरस्ती स्वारीवर बंबाने रंग उडविला व गुलाल याप्रो रंगाचा समारंभ जाहाला पुर्वी श्री कृष्णावतारी रास जाहाला ते वर्णन भागवती केले आहे तद्वत समारंभ जाहाला नंतर दुसरे वर्षी माहादजी सिंदे यांचा काळ वानवडी नजीक पुणे येथे माघ शु. १३ बुधवार शके १७१५ सन आर्बा तिसैन मया व आलफात जाहाला नंतर त्याचे पत्नीचे वोट्यात कैलासवासी दौलतराव सिंदे हे माहादजी सिंदे याचे नातु यांस घालावे असे ठरून दत दिल्हे त्यास सरदारीची वस्त्रे सन मारी दिल्ही श्रीमंत कैलासवासी रघुनाथराव दादासो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री आनंदीबाईसो त्यांचा काल फालगुण व. ११ शके १७१५ प्रमादीनाम संवछरे सन आर्बा तिसैन मया व आलफांत जाहला व हरीपंततात्या फडके यांचा काल सन खमस तिसैन मया व आलफ आवल साल जेष्ट शु. ७ गुरुवार शके १७१६ आनंद नाम संवत्छरे छ ६ जिलकादी सिद्धटेकास जाहला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधव-

रावसो यांचे व नबाब निज्यामन आलीखान याचे दोस्तीत किलाफ मसरिन-मुल्क याच्यामुळे आला यास्तव नबाब याजवर मसलत करावयाची याजकरिता पत्रे आली त्याजवरून राजश्री चितामणराव आपासाहेब हे आपले पस्यातील कैलासवासी परशरामपंत भाऊसो असे पुण्यास गेले राजश्री चितामणराव आपासो याजबरोबर त्याचे चुलते कैलासवासी गंगाधरराव काकासो याणी स्वार आज-मासे पनासाचे आत दिल्हे व आपले चिरंजीव राजश्री माधवरावबाबा याजबरो-बर बापुजी केशव जोसी यास देऊन राजश्री चिंतामणराव आपासो याजबरोबर पाठविले कैलासवासी रघुनाथरावदादा हे पुण्यात होते सदरी लिहिले अन्वये स्वार बरोबर दिल्हे तितक्यानिसी पुण्यास श्रीमंत कैलासवासी पंत प्रा सवाई माधव-रावसो याचे जवल होते संन खमस तिसैनान नबाब निज्यामन आलीखान याज-वर खासा स्वारी जाण्याचा मनसबा + + + ......................

+ + + + + + + ..................................वगैरा जंगी सामानाची तयारी कर्णे विसी सांगितले व हुजरातीकडील लोकास तयारी विसी ताकीद केली व पत्र ही पाठविली कलम ज्यारी सुरवात जाहली कैलासवासी दौलतराव सिंदे अलिजा बाहादर हे पुणे मुकामी होते त्यास तयारी विसी आज्ञा जाहली त्यांणी हिंदुस्थानात लिहून आपले पदरचे कैलासवासी जिऊबादादा बक्षी यास फौज व कंपु सुद्धा आणविले कैलासवासी तुकोजी होलकर व रघोजी भोसले नागपूरकर व अक्कलकोटकर व श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि परशरामपंत श्रीनि-वास व गाईकवाड बडोदेकर व मानकरी घोरपडे व दरेकर व सरलस्कर व नाईक निंबालकर व फलटणकर व आकळीजकर व दहीगावकर व पलटणकर व चव्हाण व धुमाल व ढमढेरे व भापकर व पवार व मोहिते व रणदिवे व भोईटे व जाधव व सितोले व घाटगे व थोरात वगैरा यास व सदरहू सिवाय सरकारचे पदरचे सरदार वगैरा जे पुण्यात नव्हते त्यास येणे विसी सरकारची पत्रे गेली राजे बाहादर व रास्ते व विंचूरकर व वोढेकर वगैरा सरदार व पागे पाथके पौ पुण्यात होते त्यास आपआपलेकडील जमीयेत आप आण-विण्याविसी सागितले सरकार आज्ञा राजश्री चिंतामणराव आपासो याजकडील फौज आणविणे विसी परशरामपंत भाऊसो व रघुनाथरावदादा याचे नि॥चे स्वारा पौ कांहीं स्वार त्याज बरोबर होते त्याणी भरतीचे आणविले उभयताचे स्वार खेरीज करून बाकी आठ हजारचे भरतीची फौज पाठविणे विसी गंगाधर-

रावकाका सो यास पत्र रो श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याची स्वारी डेरे दाखल होण्याचा मुहूर्त छ ६ जोवल शके १७१६ अनंदनाम संवत्छरे मार्गसीर्ष शु. ८ रविवारी प्रातःकालचे दाहा घटका दिवसाचा ठरला गारपिरानजीक शहरचे बाहेर डेरे दिल्हे त्या दिवसी राजश्री चिंतामणराव आपासो यांचे रासीस तो मुहूर्त प्रशस्त नव्हता खासा आगोदर मुहूर्ते निघोन नदी पलिकडे भांबवड्याचे आंगास मुलेमुठेच्या संगमाजवल उभे राहिले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो यांची स्वारी सुमुहूर्ते निघावयाचे पुर्वी स्वारी ज्या वाटेने डेऱ्यास जावयाची त्या वाटेस जाऊन राजश्री चिंतामणराव आपासो उभे राहिले श्रीमंताची स्वारी मोठ्या समारंभाने सुमुहूर्ते निघोन शहराबाहेर आली राजश्री चिंतामणराव आपासो याणी नमस्कार केला स्वारी गारपिरानजीक डेरे दिल्हे होते त्या डेऱ्यास दाखल जाहली नजराणा जाहला पागे पथके वगैरा असे जमा जाहाले कैलासवासी तुकोजी होलकर व कैलासवासी रघोजी भोसले नागपूरकर व आकलकोटकर कैलासवासी शाहाजी राजे व श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि परशरामपंत श्रीनिवास हे ही आले सरकार आज्ञा राजश्री चिंतामणराव आपासो यास फौज आणविणे विसी जाहली त्याजवरून मिरजेस गंगाधरराव मामासो यास भरतीचे स्वार पाठविणे विसी लिहिले तो प्रकार सदरी लि॥ आहे गंगाधरराव मामासो याणी कैलासवासी निलोपंत पोक्षे हे परशरामपंतभाऊ यांचे जवल असत त्यास आपले चिरंजीव कैलासवासी नारायणराव याजबरोबर फौज देऊन पाठविले त्याजबरोबर परशरामपंतभाऊसो याचे नि॥चे स्वाराचे पथक पेट्यातील ते घेऊन त्याचे चिरंजीव तिसरे कैलासवासी माधवरावदादा व रघुनाथरावदादा याचे नि॥चे स्वाराचे पथक घेऊन त्याजकडील कारकून कैलासवासी सदासिव रामचंद्र जोसी उतूरकर असे आले त्यात गेले श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याची खासा स्वारी गारपिराहून कूच करून थेऊर कोलवाड मध्ये मुळामुठाचे किनाऱ्यास मुकाम जाहला तेथून कूच करून मौजे पैठण खामगाव या दोही गावाचे मधे मुळामुठाचे किनाऱ्यास मु॥ जाहला तेथून कूच करून मौजे पारगाव सालेमालेचे ह्मणतात त्या गावाचे व वालमी या दोनी गावाचे मध्ये श्री भिमा व मुळामुठा याचा संगम जाहला आहे तेथे मुकाम जाहला तेथून कूच करून मौजे मांडवगणावरून मौजे काष्टी तांदळी या दोन गावाचे मधे घोडनदीचे किनाऱ्यास मुकाम जाहला तेथून कूच करून मौजे आडळगाव

नजीक वोढयाचे किनाऱ्यास मुकाम जाहला तेथून कूच करून मौजे भौसे नजीक मौजे नागलवाडी व सांगवी मधे सिना नदीचे किनाऱ्यास मुकाम जाहला तेथून कूच करून फकराबाद धानोर नदी विचरनावर जाहला त्याचे सुमारे हिंदुस्थानातून कैलासवासी जिऊबा दादा बक्षी नि॥ दौलतराव सिंदे अलिजा बाहादर हे फौज व तोफखाना व पलटणे कंपु सुध्धा आजमासे वीस पंचवीस हजार फौजनिसी मौजे खाडकतगाव आहे तेथे आले सिंदे याणी आपले येकंदर फौजेचा मोहला श्रीमंतास दाखविला येकंदर जमेयत सवा लक्ष दीड लक्षाचा आदमास पायदल वगैरा काही जाजतीच होईल नबाब निज्यामन आलीखान भागानगराहून डेरे दाखल झाले ते मोहरीच्या घाटाने आले त्याचा मुकाम खर्ड्याचे उतरेस खर नदीचे पाण्यावर मौज तलसंगी ह्मणोन गाव आहे तेथे जाहला नबाबा बरोबर फौज व पायदल वगैरा सुध्धा येकंदर जमीयत कमकसर लाख सवा लाखाचा आदमास व तोफा व गरनाळा मिळोन १४५ येकसे पंचेचाळिस व बाण पाच सहा हजार श्रीमंताची खासा स्वारी फौज सुध्धा नबाबाचे राखै गेली फौजेस छठा थोडा राहिला सरकारचे हुजरातीत कैलासवासी रामचंद्रबाबा फडके हे कैलासवासी हरीपंततात्या यांचे दुसरे चिरंजीव ते मुख्त्यार सरकारचे पदरचे सरदार व पागे पथके व सरकारचा तोफखाना व बाणाच्या कैच्या वगैरा जंगी सामान व पायदलचे रिसाले व सिंदे होलकर व प्रतिनिधि व भोसले नागपूरकर व आकलकोटकर व राजश्री चिंतामणरावआपासो वगैरा यास नबाबाचे मोकाबल्यास जाणे विसी आज्ञा जाहली दौलतरावसिंदे खासा काही लोकानिसी व सरकारचे पदरच्या पैकी काही फौज वगैरा व नानाफडणीस असे श्रीमंताजवळ राहिले बाकी तमाम फौजा नबाबाचे मोकाबल्यास गेल्या परशरामपंतभाऊसो सरकार कामामुळे श्रीमंताजवळ राहिले त्याणी आपले चिरंजीव कैलासवासी रामचंद्रपंतआपा यास आपले निसबतीचे स्वार घेऊन राजश्री चितामणरावआपासो याजकडे जाणेविसी आज्ञा केली असता बाहना करून राहिले राजश्री आपासो याजबरोबर भाऊसो याणी आपले तिसरे चिरंजीव माधवराव दाजी याजबरोबर आपले नि॥चे स्वार देऊन पाठविल व रघुनाथरावदादा हे आपले नि॥चे स्वार घेऊन आले नबाबांचे फौजेस च्यार साडेच्यार कोसाचे छस्याने नाव जवलपास मुकाम जाहला परशरामपंत + + .................. + + हिल्या त्याचे विचारे हुजरात वगैरा याणी चालावे असे ठरून भाऊसो यास फौजेत जाणे विसी आज्ञा जाहली त्याजवरून

मागाहून भाऊसो हे मुक्काम मजकुरी आले त्या मुकामी फाल्गुन शुद्ध पौर्णिमा जाहाली दुसरे दिवसी धुलवड जाहली नबाबास मोहला दाखवावा असा नकसा ठरला धुलवडीचे रात्रौ आपआपली बुणगी मागे ठेऊन सडे होऊन सरदार मंडळी आपआपली फौज घेऊन चालते जाहले द्वितीयेचे दिवसी नबाबाचे फौजेचा मोकाबला जाहला गोला गोली जाहली संध्याकालचा च्यारसाहा घटका दिवस आजमासे राहिला लोक उपासी खासा सरकारच्या फौजा माघाऱ्या निघाल्या नबाबाकडील फौज चालून आली सूर्यास्तमानचा समय नबाब फौज सुध्धा घोडेगावचे माळापावेतो येऊन माघारे आपले मुकामास गेले सरकारचे फौजेचा मुकाम घोडेगावावर जाहला जिऊबादादा नि॥ दौलतराव सिंदे अलिजा बाहादर याचा मुकाम घोडेगावचे उतरेस ठाणे पिंपळगांव आहे तेथे जाहला दक्षणेकडील बाजूस वेधगाव तेथे होलकराचा मुकाम जाहला भोसले यांचा ही मुकाम तेथे च जाहला त्रीतीयेच्या दिवसी सरकारचे फौजेचा मुकाम जाहला नाही चतुर्थीचे दिवसी नबाबाचे कूच जाहल्याची बातमी आली त्याजवरून सरकारची फौज व तोफखाना तयार होऊन गेला दुरून तोफाचे गोले नबाबाकडील बुणग्यावर तिसरे प्रहरचे सुमारास टाकिले ते दिवसी नबाबाचा मुकाम मौजे वाकी खरनदीचे कडेस खर्ड्यांचे पश्चमेस आर्धकोश तेथे जाहाला सरकारच्या फौजा माघाऱ्या आल्या लढाई जाहली नाही पंचमीचे दिवसी सरकारचे फौजेचा मुकाम मोकाबला जाहला नाही फाल्गुन व. ६ बुधवारी छ १० साबानी नबाबाचे कूच परांड्याचे राखे जाहल्याची बातमी आली परांड्याचे आश्रास गेल्या मसलत लांबेल हा विच्यार करून सरकारच्या फौजा व तोफखाना वगैरा यच्यावत सरदार लहान थोर तयार होऊन गेले मौजे तरडगावचे रानात टेकडी त्याजवर राजश्री चिंतामणराव आपासो व परशरामपंत भाऊसो असे जाऊन उभे राहिले नबाबाकडील फौजेस छटा अजमासे पाऊणकोश राहिला फौज व बहिर दृष्टीस पडली त्याजवर तोफा सुरु करावयाची जागा पाहून तिकडे तोफा आणविल्या त्या येऊन पोहोचल्या नाहीत व सिंदे याजकडील ही फौज पलटणे तोफा येऊन पोहोचल्या नाहीत भोसले व होलकर हे फौज सुद्धा दक्षणेचे बाजूस सरकारचे फौजेचे उजवे आगास लढाई मातबर जाहली परशरामपंतभाऊ व राजश्री चिंतामणरावआपासो अस बरोबर होते परशरामपंत भाऊसो याचे पस्त्याचे मेण निघेना ते राजश्री आपासो याणी काढले सरकारचे फौजेची लढाई बिघडली त्या समई भाऊसो

यास जखम कपाळावर लागली राजश्री आपासाहेब याजवर ही नबाबाकडील सवाराने हात टाकिला परंतु रोखल्यामुले जखम कारागार न जाहली त्या समई राजश्री आपासो याचे वय येकूणीस वर्षाचे भाऊसो याचे दुसरे चिरंजीव कैलासवासी हरीपंतबाबा हे ही बरोबर होते व बालाजी गणेश नासीं हिरपरगीकर हे गंगाधरराव काकासो याजकून नारायणराव याजबरोबर आले होते ते ही होते गोविंद हरी यांचे सान्यात धाकटेबंधु कैलासवासी भास्करपंतआपा याचे वडील चिरंजीव धाडोबादादा याचे चिरंजीव विठलराव धोंडदेवबाबा हे बरोबर होते त्यास छातीत गोली लागोन सरकारकामास आले त्यांचा मुडदा राजश्री चिंतामणराव आपासो याजकडील फकीरचंद चोपदार याणे काढून आणिला गोविंद हरी याचे सान्यात वडील बंधु कैलासवासी कृष्णभट बापाजी याचे वडील चिरंजीव नारायणरावनाना त्यास पुत्र नाही सा त्याचे धाकटे बंधु पुरुषोतमराव दाजी याचे दुसरे चिरंजीव कैलासवासी कृष्णराव नाना यास दत दिल्हे होते त्याचा काल जाहल्यावर त्याचे चवथे बंधु कैलासवासी सदासिवरावभाऊ यास दत दिल्हे त्यास गोविंद हरी यांचे चुलत बंधु अंताजीपंततात्या त्यांचे चिरंजीव जनोबा सुभेदार यांस बोर घाटाखाली चौकावर श्रीमंताचे फौजेची व इंग्रजी सरकारचे फौजेची लढाई जाहाली त्यासमई त्यास जखम लागली कैलासवासी विसाजीपंत वाडदेकर हे वकिलीचे कामावर त्यास जखम पोटाचे बाजूस भारी लागली व आणखी पदरचे ब्राह्मण मंडली बालाजी गणेश जोसी व कैलासवासी हरी सदासिव भिडे हे गोपालराव यांचे मेहुवणे व कैलासवासी बलवंतराव आपाजी सिलेदार कारकून यांस जखमा लागल्या व सिलेदार वगैरा ही जखमी जाहले व कैलासवासी चिंतामणभट खाडिलकर हे आमचे देवाची पुजा करीत होते त्यांचे नरड्यास गोलीची जखम लागून ते व सिलेदार वगैरा असे ठार जाहले परशरामपंतभाऊसो यांचे पदरचे कैलासवासी गोपाल अनंत सोनी व अंताजी गोपाल फडके वगैरा सिलेदार जखमी व काही ठार जाहले व रघुनाथरावदादा यांचे पदरचे सदासिव रामचंद्र जोसी त्याचे पथक घेऊन आले ते त्यास जखम लागली वगैरा ही त्यांचे पथकातील लोक जखमी ठार जाहले नबाबाकडील फौजेची जूट भारी भाऊसो जखमी तशा प्रसंगातून त्यास राजश्री चिंतामणराव आपासो याणी आणिले समयास जे त्याचे हातून जाहले ते भाऊसो याचे समक्षच जाहले सदरहूची माहिती भाऊसाहेब याचे पदरचे वो राजश्री बालंभट बरवे पुरोहित वगैरा यास आहे भाऊ-

साहेब याणी सरकार चाकरी विसी कसूर केला नाही विठलराव धोंडदेव बाबा याचा मुडदा राजश्री आपासो याजकडील फकीरचंद चोपदार याणे काढून आ-णला लढाई बिघडली नंतर सिद्याकडील फौज व पलटणे तरडगावचे रानात टेकडी त्याजवर राजश्री चिंतामणरावआपासो व भाऊसो असे उभे राहिले तो मार सदरी लि॥ आहे त्याचे उतरेस लवण त्याचे उतरेस माल तेथे येऊन पोचली + + + + + + + ........................... + + + उठावणी सायंकालचे प्रहर सवा प्रहरचे सुमारास जाहली भोसले याणी बाणाची मारगिरी केली दोही कडील बहुत लोक सरकार कामास आले नबाबाकडील फौजेचा मोड जाहला त्याजकडील सरदार लालखान हा हावद्यात होता त्यास गोली लागोन लढाईत ठार नबाब खर्ड्याचे आश्र्यास गेले तोफा वगैरे सलतनत लुटली गेली परशरामपंतभाऊसो जखमी त्यास सडे फौजेचे बुणग्याचा मुकाम नानजवल यास होता तेथे डेऱ्यास आणिले रात्रौ जखमेस टाके दिल्हे त्या समई राजश्री आपा-साहेब जवल होते नबाब खर्ड्याचे आश्रयास गेल्याचे सदरी लि॥ आहे त्यास घेरोन सरकारची हुजरात वगैरा पागे पथके सुध्धा मौजे हरळचे रानात व भोसल होलकर मौजे चिंचपूर दोन गाव आहेत तेथे दक्षणेकडील रानात राहिले उतरे-कडे घोडेगावचे रानात सिंदे याजकडील जिऊबादादा राहिले भाऊसो याचे जखमेस रात्रौ टाके दिल्हे तेच दिवसी पाहाटेस सूर्योदयाचे सुमारास भाऊसो व राजश्री आपासो असे सडे फौजेत जावयाकरिता निघोन चालते जाहले फौजेचा मुकाम जाहला होता तेथे गेलो लालखानाचा मुडदा नबाबाकडे भाऊसो याणी हतीवर घालून पाठवून दिल्हा दौलतराव सिंदे याचे पदरचे जिऊबादादा बक्षी हे भाऊसो याचे समाचारास आले त्या समई भाऊसो हे मला ज याणे हटले त्यास हरीपंत बाबाने हटले ह्मणोन बोलले राजश्री आपासो व भाऊसो असे बरोबर होते हरीपंत बाबाजी हटलेले राजश्री आपासाहेब याणी पाहिले नाही बालाजी गणेश जोशी हिपररगीकर यास गंगाधरराव काकासो याणी आपले चिरंजीव नारायणराव याजबरोबर पाठविले होते तो प्रकार सदरी लि॥ आहे ते जवल होते भाऊसो यास हटले त्यास हरीपंत बालाजी हटल्याचे त्याचे मुखे निघाले नाही भाउसो यास जखम लागली त्या समई त्याचे पत्याचे मेण निघेना ते राजश्री आपासो याणी काढिले वगैरा समयास जे त्याजकडून जाहले ते भाऊ-साहेब याचे समक्ष च जाहले परंतु राजश्री आपासो याचे नाव जिऊबादादा

बक्षी याचेजवल भाऊसो याणी घेतले नाही याचे कारण आपासाहेब उज्याडास येऊ नये किंवा कसे ते ज्याचे ते जाणत गुड्याचा पाडवा नानजवल्याचे मुकामी जाहला नबाबाकडील कारभारी मसीरनमुल्क याणी स्नेहात आंतर आणिले सा त्यास हवाला करावे असे बोलण्यात येऊन हवाला करून घेतले त्यास घेऊन कैलासवासी गोविंदराव काले आले ते परशरामपंत भाऊसाहेबास भेटून श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याजकडे गेले परशरामपंत भाऊसाहेब यांचे समाचाराकरिता नबाबाकडून राजश्री राव रंभा आले त्याची मुदारत करणे कजम अजी सबब त्याचे डेऱ्यास राजश्री चिंतामणराव आपासो व रामचंद्रपंत बाबा फडके असे गेले विडे पान होऊन नंतर त्या सुद्धा परशरामपंत भाऊसो याजकडे आले परस्पेर मुदारत गौर जाहाला रावरंभा याणी नबाबाचे हुजरात जाहाल्या माराचे खत लिहिले नंतर पुढे मुकाम गेला त्या मुकामी रामनवमी जाहाली त्या च मुकामी श्रीमंताची स्वारी परशरामपंत भाऊसाहेब यांस जखम लागली सबब समाचारा करिता आली हे वर्तमान कलताच राजश्री चिंतामणराव आपासो व ती॥ रामचंद्रपंतआपा असे श्रीमंताचे स्वारीकडे गेले श्रीमंताची स्वारी सडे, फौजेत परशरामपंतभाऊसाहेब यांचे येथे दोन प्रहरचे सुमारास आली रात्रौ भोजन करून श्रीमंताची स्वारी माघारी गेली नाना फडणीस ही बरोबर होते तहाचे नमुद्यात आले सरकारच्या फौजा माघे फिरल्या खरड्यांत पाण्याची व वैरणीची तंगच्याई सबब नबाबाचे कूच होऊन मागे गेले त्या मुकामी बोलण्यात आल्या आन्वये जाब साल उलगडावा नंतर कूच करून जावयाचे वैरणीची तंगच्याई सबब आणखी येक मुकाम नबाब मुंगीच्या घाटाचे रोखे गेले मुगीचा घाट चढून वर जाणार अस समजते घाटावर गेल्यास सरकारचे फौजेस छटा फार बोलण्यात आल्याअन्वये जाबसालाचा उलगडा जाहाला पाहिजे सबब सरकारचा हुकूम नबाबाचे पिछावर जाणेविसी आला त्याजवरून सरकारच्या फौजा व राजश्री चिंतामणराव आपासाहेब हे भाऊसो व रघुनाथरावदादा सुध्धा नबाबाचे रोखे गेले त्या मुकामाहून विसाजीपंत वाडदेकर वकील जखमी त्यास बुणग्यात पाठविले त्या मुकामी येकंदर फौजेची गणती सरकारातून जाहली तहत खंडणी सरकारात घ्यावयाची ठरली ते रुपये ६०००००० साठ लक्ष पौ तीस लक्षाचा मुलूक व तीस लक्ष रुपये असे नबाबाकडून सरकारात घेतले श्रीगणपती माहाराजाचे कृपे श्रीमंताची जोत जाहली श्रीमताचा मुकाम पिंपलखेडावर

होता तेथून कूच करून मौजे आवटी गावावर जाहला सरकारच्या फौजा माघाऱ्या फिरल्या त्याचा मुकाम संगमेश्वरानजीक सिनेचा व खर नदीचा संगम आहे तेथे जाहला तेथून कूच करून सरकारच्या फौजा आवटीचे मुकामी श्रीमंतांस मिळाल्या तेथून कूच करून मौजे करडीमोगावावरून सोनारीवर मुकाम जाहला तेथून रुई दुधी गावावर मुकाम जाहला तेथून कूच करून आंजन डोहावर मुकाम जाहला तेथून कूच करून सिद्धटेक + + + + + + + + .......... + + + तेथून पुढे कूच करून मौजे आलेगावावरून खोरेवाडीवर मुकाम जाहला तेथून गारडोरचे दक्षणेकडून स्वारी गेली मुकाम मौजे नानगाव तवळण श्री भिमा तीरी जाहाला तेथून कूच करून खलेवाडीवरून टेकचे खामगावावर मुळामुठा नदीवर मुकाम जाहला तेथून कूच करून थेऊर कोलेवाडीवर मुकाम जाहला तेथून पुण्यास सरकारचे वाड्यात खासा स्वारी दाखल होण्याचा मुहूर्त छ ११ सवाल वैशाख शु. १३ त्रयोदसी भृगुवारी पुर्व रात्रीचा ठरला राजश्री चिंतामणराव आपासो याचे रासीस तो मुहूर्त प्रशस्त नवता सबब पुर्वी मुहूर्ते घरास गेले श्रीमंताची स्वारी शहरात यावयाची त्या दिवसी प्रदोष परशरामपंतभाऊसो हे प्रदोषाचे पारण्याकरिता पुण्याचे लगत शहरचे पूर्वेस राजश्री आपसाो याचे मातुश्रीचे चुलते कैलासवासी बालाजी नाईक भिडे यांची बाग भवानी पेठेच्या उतरेचे आंगास आहे त्या बागेत येऊन संध्या व श्री लिंगार्चन इत्यादि करून भोजन केले तेथे राजश्री आपासो गेले त्यांच्या आंबाऱ्या स्वारी बरोबर नसल्यास व काही समारंभाचे कारण आंबारी पाठविणेचे पडल्यास राजश्री आपासो याजकडे यावी. सरकारच्या आंबाऱ्या कोतवाल असल्यास भाऊसाहेब व रघुनाथरावदादा याजकडे असा प्रकार असता सरकारातून आंबारी विस्मृतीमुळे राजश्री आपासो याजकडे न पाठविता भाऊसो याजकडे पाठविली त्या समई भाऊसो याणी सांगून पाठविले कीं चिंतामणराव याजकडे आधी पाठवावी ह्मणोन ते न केले श्रीमंताची स्वारी शहरालगत आली श्रीमंताचे स्वारीकडे जाण्याकरिता भाऊसाहेब आंबारीत बसले त्या समई कैलासवासी अंतोजीपंत ताल्या यादवाडकर याचे दुसरे चिरंजीव कैलासवासी जनोबा सुभेदार बोलले की आंबारीत बसावे तेव्हा आपासो याणी उतर केले की ज्या समई सरकारातून आंबारी येईल त्या समईच बसेन ह्मणोन भाऊसो आंबारीत बसोन श्रीमंताचे स्वारीकडे गेले स्वारी शहरात आली ते वेळेस शहरच्या बायका आरत्या घेऊन

रस्तोरस्ती दुमजल्या तिमजल्या वरून उभ्या होत्या सोन्या रुप्याची फुले उधळी व चिराखदान केले होते श्रीमंताची स्वारी भवानी पेठेतून कैलासवासी गोविंद सिवराम खासगीवाले यांचे वाड्याचे पूर्वेस बुधवारच्या रस्त्यास मिळून नानाफडणीस याच्या वाड्यापुढून सरकार चावडी उजवी घेऊन दिली दरवाज्याने सरकारवाड्यात दाखल जाहाली सरदार व मुछदी वगैरा याणी नजराणा केला खुसीच्या तोफाची सरबती जाहली मोठा समारंभ जाहला पुराणांतरी श्रीरामचंद्रजी लंका घेऊन आयोध्येस आले ते समई समारंभ जाहला तद्वत जाहला राजश्री आपासाहेब याचे तीर्थरुप पांडुरंगरावतात्या हे सरकार कामास आले व आपासो याजकडून खर्ड्यांचे स्वारीस सरकार चाकरी बजावण्यात आली ही कदर जाणून जावगीर पैकी तुंगभद्रे पलीकडील माहल टिपू सुलतान याचे तहत गेले त्याचे मोबदला द्यावा असे ठरून सनसित तिसैन मया व आलफात राजश्री चिंतामणराव आपासाहेब याचे नावे साडे नऊ हजार स्वारानिसी चाकरी कर्ण्याचा तैनात जाबता मुकरर जाहला सन मजकूरीच सन सित तिसैनात आधि शु. १२ द्वादसीस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो हे गणपती माहाराजाचे उछाहाचा दिवाणखाना त्याचे दुमजल्यावरून दक्षणेचे आगांस खाली कारंड्याचा हऊद आहे त्याजवर पडले दाताची कवली जाया जाहली व मांडीचे हाड मोडून बाहेर पडले हे वर्तमान श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान नारायणरावसो मारले गेले त्या समई चाफाजी टिलेकर हा मारला गेला तो प्रकार सदरी लिा आहे त्याचा लेक हणमंता टिलेकर याणे नानाफडणीस यास जाऊन सांगितले त्याजवरून नानाफडणीस वगैरा सरकार वाड्यात जमा आले जखम बांधावयास तबीबास बोलावून आणिला त्याणे हरणाची पायाची नली काढून अत बसवून जखम बांधली सदरी जाहल्या प्रकारचे पुण्याहून लिहून आले त्याजवरून भाऊसो पुण्यास जावयाकरिता तासगावहून निघाले राजश्री चिंतामणरावआपासो व त्याचे चुलते गंगाधरराव काकासो असे निघाले तो श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याणी आश्विन शु. १५ मंगलवारी छ १३ रोखर अस्तमान घटका दिवस आदमासे ते समई कैलासवास केला ह्मणोन वर्तमान आले पृथ्वी निराधार जाहली हलीमाजीचा समय आणोन कसा प्रसंग प्राप्त होईल सा गंगाधरराव काकासो किल्याचे बंदोबस्ताकरिता ह्मणोन राहिले भाऊसो पुण्यास जावयास आश्विन व. १ प्रतिपदेस चालते जाहले राजश्री आपासो गेले नाही

त्याचे बयानाची येथे जरुरी नाही साान लिहिले परशरामपंत भाऊसाहेब पुण्यास गेले त्यास नानाफडणीस याणी श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याचे चिरंजीव श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब व चिमाजी आपासो यांस आणावयास जुनरास पाठविले त्याणी उभयता श्रीमंतास आणिले खडकीस पुलानजीक मुकाम जाहाला फाल्गुन व. ५ पंचमी शनवारचे वाड्यात दाखल जाहाले मसलदीस वंदन करून श्रीमंत राजश्री बाजीरावसो मसलदीवर बसले लोकास विडे दिल्हे नजरा करावयास लोक आले तो नजरा मना केल्या घेतल्या नाहीत दोन दिवस वाड्यात राहून निशाण व जरीपटका व श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो यांची सिकेकठार असे घेऊन फाल्गुन व. ७ गारपिरावर डेरे दाखल जाहाले नानाफडणीस याणी निरोप घेऊन सातारेस गेले श्रीमंत राजश्री बाजीरावसो व चिमाजी आपासो असे थेऊरास जाऊन मुकाम केला बरोबर परशरामपंत भाऊसो व तीा रघुनाथरावदादा व बाबा फडके व हुजरात व दौलतराव सिंदे व तुकोजी होलकर असे फौज सुध्धा होते त्या मुकामी सिंदे याजकडील कारभारी कैलासवासी बालोबा पागनीस व धोंडीबादादा व सदासिव मल्हार वगैरा याचे विद्यमाने सिंदे यांचे विच्यारे श्रीमंत राजश्री बाजीरावसो यांस प्रतिबंध करावा श्रीमंत राजश्री चिमाजी आपासाहेब यांस श्रीमंत कैलास-वासी पंत प्रधान सवाई माधवरावसो यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री येशवदाबाईसो यांचे वोट्यात घालावे असे बोलण्यात येऊन ठरले श्रीमंत राजश्री बाजीरावसो याजकडे रघुनाथरावदादा यांचे लक्ष त्यास कळले असता मनसब फुटेल सबब त्यास कलविले नाही श्रीमंत राजश्री बाजीरावसो यांची स्वारी सिंदे यांचे येथे जाऊ लागली त्या समई परशरामपंत भाऊसो याणी रघुनाथरावदादा यांचे पदरचे याजबरोबर आज स्वारीबरोबर जाऊ नये ह्मणोन रघुनाथरावदादा याजकडे सांगून पाठविले तो निरोप त्यास पोहोचला नाही तीा रघुनाथरावदादा स्वारी बरोबर गेले बोलण्यात आल्या आन्वये श्रीमंत राजश्री बाजीरावसो यांस प्रतिबंध जाला परशरामपंत भाऊसो याणी आपणास कलविले नाही याजमुले परशरामपंत भाऊसो याजविसी रघुनाथरावदादा यांचे चितात वाकुडपणा आला श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यास सोडून रघुनाथरावदादा निघोन कुरुदवाडास आले श्रीमंत राजश्री बाजीरावसो यांस प्रतिबंध जाहाला त्याची रवानगी सिंदे याणी हिंदुस्थानात केली सिंदे यांचे विच्यारे श्रीमंत राजश्री

चिमाजी आपासो यास परशरामपंतभाऊसो घेऊन पुण्यास आले सन मारी संन सित तिसैन शके १७१८ वैशाख शु. ५ ते दिवसी श्रीमंत राजश्री चिमाजी आपासो यांस श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादासो याचे माऊस बंधु कैलासवासी विठलराव गोले याजकडून श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवरावसो याची पत्नी श्रीमंत कैलासवासी मातुश्री येशवदाबाईसो यांचे वोट्यात दतविधान पूर्वक घातले श्रीमंत राजश्री चिमाजी आपासो हे चिमणाजी माधवराव जाहाले त्यावख्ती श्रीगणपती माहाराज पुळे तालुके रत्नागिरी येथे चौघडा ठेविला दौलतराव सिंदे यास अलिज्या बाहादर ह्मणोन किताब दिल्हा ह्मणून ऐकण्यात त्रिंबकरावमामा पेठे यांचे नातु कैलासवासी अमृतराव विश्वनाथ हे बहुत योग्य जाहाले होते त्यांचे पुत्र राजश्री त्रिंबकराव यांस सातान्यास पाठवून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहूराजे धाकटे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजाराम साहेब यांस दत दिल्हे ते त्याजकडून प्रधानकीची वस्त्रे संन मार संन सित तिसैन शके १७१८ वैशाख मासी आणून श्रीमंत राजश्री चिमणाजी माधवरावसाहेब यांस दिल्ही सिरस्त्या आन्वये दागिने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत राजश्री चिमणाजी माधवरावसो हे पंत प्रधान जाहाले तीर्थरुप कैलासवासी पांडुरंगरावतात्या सो सरकार कामास आले ही कदर जाणोन श्रीमंत कैलास वासी पंत प्रधान सवाई माधवरावसो यांचे कारकिर्दीस राजश्री आपासो याचे वडील बंधु कैलासवासी हरीहररावसो यांस सरदारीची वस्त्रे जाहाली सरकारातून मुतालकीची सिके कठार दिल्ही हुजरातीकडील लिहीण्यास सरकारचे फडणीसीकडील कारकून वगैरा सरकारचे दरखदार वि॥ हरीहरराव पांडुरंग ह्मणोन बंधुचा काल जाहला नंतर राजश्री चिंतामणराव आपासो यास सरदारीची वस्त्रे दिल्ही नंतर सरकारचे किर्दीस वि॥ चिंतामणराव पांडुरंग असे लाऊ लागले तो प्रकार सदरी लि॥ आहे वस्त्रे जाहली त्या समई त्याचे वय आठ वर्षांचे दौलतीचे काम पाहावयाजोगे नवते त्याचे चुलते गंगाधरराव काकासाहेब घरचा वगैरा दौलतीचा वेव्हार पाहत सरकारास मधे हुजरात वगैराचा वेव्हार परशरामपंतभाऊसो पाहत त्याचे जवल मुतालकीची सिके कठार व दरकदार असत राजश्री आपासो सरकार चाकरी बजावयाजोगे जाहले खर्ड्यांचे स्वारीस नबाबाकडील फौजेची व सरकारचे फौजेची लढाई जाहली त्या समई भाऊसो व राजश्री आपासो असे बरोबर होते भाऊसो याचे पथ्याचे मेण मिधेना ते राजश्री आपासो यांणी का-

ढिले भाऊसो यास जखम लागली तशा समयास त्यांस सांभाळून आणिले समयास जे जाहले ते श्रीगणपति माहाराजाचें कृपे व श्रीमंताचे अन्नप्रतापे व वडिलाचे पुण्ये जाहाले राजश्री आपासाहेब सरकार चाकरी बजावयाजोगें जाहाले सरकार चाकरी बज्यावली राजश्री आपासो याचे काम आपासो करू लागतील आपले घरी कारभार राहणार नाही आपासो याजवल जमयत जाहाली असता मोठेपणा आपले तेज पडणार नाही हे परशरामपंतभाऊसो यांचे चिरंजीवाचे व त्याचे + + + ............... + + + + + .....................

+ + + यांचे दिलास वाटून परशरामपंतभाऊसो यांचे चिरंजीवानी व पद-रचे लिमये वगैरा याणी परशरामपंतभाऊसो यांस उपदेश करून सरकार किर्दीस त्रि॥ परशराम रामचंद्र असे लाविले त्या समई आपासो पुण्यात नव्हते घरी प्रतिबंधादाखल होते त्याजकडे कोणी येत नसत त्याची माहिती सर्वांस आहे नबाब अनकूल असावे त्याचेकडील फौज आपले उपयोगी पडावी या बदल भाऊसो याणी नबाबाकडील कारभारी मसिरनमुल्क हे प्रतिबंधात होते त्यास सोडावे असे बोलणे ठरून सोडले त्याणी नबाबाकडील फौज आपल्याजवळ आण-वून घेतली मसिरनमुल्क याजकडे नाना फडणीस याणी संधान करून अनकूल करून घेतले कैलासवासी सखाराम घाटगे सर्जेराव हे दौलतराव सिंदे अलिज्या बाहादर याच सासरे त्या उभयताचे अंतःकरण जुगले नाना फडणीस याचे विच्यारे दौलतराव सिंदे याचा व नबाबाचे कारभारी याचा येक विच्यार जाहला सिंदे याणी आपला कारभारी बालोबा पागनीस व धोंडिबादादा व सदासिव मल्हार वगैरा यास कैद केले परशरामपंतभाऊसो यांस धरावे असी मसलत जाहली तो प्रकार परशरामपंत भाऊसाहेब यास समजला त्याजवरून संन सबा तिसैनात छ २५ रोखर अश्विन व. १२ द्वादसीस श्रीमंत राजश्री पंत प्रधान चिमाजी आपासो यांस घेऊन जुनराकडे गेले त्याचे पिछावर सरकारची हुजरात वगैरा फौजा गेल्या परशरामपंतभाऊसो श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान चिमाजी आपा-साहेब यास घेऊन गेले ते जुनर नजीक सिवनेरीच्या किल्यावर गेले सरकारची हुजरात वगैरा पिछावर गेली त्याची व भाऊसो याजकडील फौजेची लढाई जाहली सिंदे याजकडील फौजेत कारभारी होते व विंचूरकर याजकडील फौजेत कैलासवासी चिमणाजी खंडेराव याजकडून कैलासवासी माधवराव रास्ते याणी खातरजमा करून घेऊन नंतर आपले बहादारीने भाऊसो किल्यावरून उतरले

भाऊसो याची सिके कठार त्याच साली तालमीचे सिके कठारीचे सिके असत ती सिके कठार व चवरी सरकारात गेली श्रीमंत राजश्री पंत प्रधान चिमाजी आपासो यास घेऊन सरकारची हुजरात वगैरा पुण्यास आले हे वर्तमान आले-वरून भाऊसो याचे चिरंजीव रामचंद्रपंतआपा व गणपतराव बापु असे कुटुंब सुध्धा सन सबा तिसैनात छ १२ जोवल कार्तीक शु. १३ ते दिवसी मध्यरात्री निघोन उजडावयास मिरजेस आले पुढे तासगाव मोकळे ही संधि पाहून श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति सिवाजी राजे पन्हालेकर हे तासगावास आले त्यासमई त्याचे जवल जमयेत विशेष नव्हती छत्रपति याणी च्यार दिवस तास-गावास राहून जाते दिवसी कार्तीक व. ४ चतुर्थीस तासगावचे वाडयाचा कार-भार आग्न लाऊन ऊरकून गेले श्रीमंत राजश्री बाजीरावसो यास सिंदे याणी प्रतिबंध केला तो प्रकार सदरी लि॥ आहे सिंदे यांचे व श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे संधान जुगले सिंदे याणी श्रीमंत राजश्री बाजीरावसो यास माघारे आणिले भाऊसो यास प्रतिबंध होऊन माडवगणास नेले ते कार्तीक व. ३० अमावास्येस तेथे पोहोचले नाना फडणीस याजकडे माहडास रायाजी पाटील वाडीकर यास सिंदे याणी पाठवून पुण्यास आणिले ते श्रीमंत राजश्री पंत प्रधान चिमाजी आपा-साहेब यास श्रीमंत कैलासवासी मातुश्री येशवदाबाईसो याचे वोट्यात दतविधान पूर्वक घातले तो प्रकार सदरी लि॥ आहे श्रीमंत राजश्री बाजीरावसो याणी आपले कडे मालकता यावी ह्मणोन परत विधान केले दताचे परत विधान कर्णे हे शास्त्रात नाही प्रभुत्वेकरून आशास्त्र परत विधान केले असे शास्त्री पंडीत याचे ह्मणे सदरी लिहिल अन्वये परत विधान केले नंतर श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहू राजे श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसो याचे चिरं-जीव दत दिल्हे त्याजकडून प्रधानकीची वस्त्रे आणवून सन सबा तिसैनात छ मार्गशीर्ष शु. ५ पंचमीस हडपसरचे मुकामी श्रीमंत राजश्री बाजीरावसो याणी घेतली सिरस्त्या अन्वये दागिने वगैरा बहुमान जाहला श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो हे पंत प्रधान जाहले नंतर पुण्यास येऊन लग्न केले कैलासवासी हरीपंततात्या फडके याचे वडील चिरंजीव कैलासवासी चिंतामण हरी फडके यास दाजी ह्मणत याची कन्या श्रीमंत कैलासवासी सौभाग्यवती मातुश्री बाईसो याचे नाव राधाबाई ठेविले श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीराव साहेब यांचे व सिंदे व त्याचे कारभारी सर्जेराव घाटगे यांचे अत्यंत रहस्य जाहले त्रिवर्गाचा येक विच्यार

जाहला त्याचे विच्यारे सन...नाना फडणीस यास कैद करून नगरास पाठविले घाटगे याणी कैलासवासी जिऊबा दादा बक्षी याचे चिरंजीव कैलासवासी नारायणराव यास बाण वांधून उडविले व कैलासवासी गंगाधरपंत भानु यास तोफावर बांधले उन्हाले दिवस तोफ तापल्यामुले आंग पोळून मेले आसा आनाहूत वेव्हार जाहला त्याचे तपसीलाचे कारण नाही सबब लिहिले नाही कैलासवासी तुकोजी होलकर यांचे वडील चिरंजीव ( कासीराव ) दुसरे मल्हारराव होलकर हे उभयता पौ कासीराव वडील होलकर हे सिंदे यास मिळून त्याजकडून आपला भाऊ मल्हारराव यास दगा करवून मारविला सन...श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति संस्थान सातारा याणी बंड केले त्याचे स्वाधीन सातारा जाहला भाऊसाहेब मांडवगावात प्रतिबंधात ते प्रकार सदरी लि॥ आहे भाऊसो मांडवगावचे बंदोबस्ताचे उदेशे सरकार आज्ञेवरून सन तिसा तिसैन मया व आलफात शके १७२० कालयुक्त नाम संवत्छरी माडवगावाहून निघाले ते जेष्ट वद्य १३ स चंदनवदन नजीक मालगाव त्या मुकामास आले श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहूराजे याचे फौजेची लढाई सातान्या नजीक आषाढ व. १२ छ २५ सफरी जाहली छत्रपतिचा मोड जाहला सातान्याचा व श्रीमंत कैलासवासी महाराज छत्रपतिचा बंदोबस्त करून कर्नाटकात गेले नाना फडणीस यास सोडून पुण्यास आणिले सिंदे याणी आपले कारभारी यास कैद केले होते त्यास सोडले नाना फडणीस व सिंदे याचे कारभारी याचे जुगले काही दिवस कारभार चालला नंतर नाना फडणीस यांचा काल सन मयातैन व आलफात फाल्गुन व. ४ शके १७२१ सिध्धार्थी नाम सवत्छरी जाहला पुन्हा घाटगे मार यांणी सिंदे याचे कारभारी यास कैद केले श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो याचे कारकिर्दीस सरकारचे पदरचे सरदार वगैरा व धोंडजी वाघ वगैरा बंडे याणी सरजामी वगैरा ताल्लुक्यातून खंडण्या घेतल्या तालुके तारात जाहाले सरंजामी लोकात हाल बाकी राहिली नाही दाद लागेना बंदोबस्त होईना सरकारची व कारभारी यांची दृष्टी पैक्यावर सरकारचे पदरचे सरदार यांचे मानमरातबात कमी याजमुळे माणूस बेदील श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीराव रघुनाथ यांचे कारकिर्दीस टिपूची दौलत सन...इंग्रजी सरकाराने घेतली पटणातील बंदीवानात धोंडजी वाघ हा होता येकंदर बंदीवान सोडले त्याजबरोबर धोंडजी वाघ सुटला त्याणे बंड करून तुंगभद्रे पलीकडे काटकाई केली सन मयातैनात त्याचे पारपत्या करिता पुर्णया व

विष्ठे लिंगो बादामीकर हे आले त्याणी त्याची गाठ घालून दाऊणग्याची झांबडी झांबड केली धोंडजी वाघ निघोन तुंगभद्रे आलीकडे उतरून आला त्यास कैलासवासी धोंडो बलाल गोखले याणी लुटला नंतर जाहलेला प्रकार व सन इहिदे मयातैनात धोंडजी वाघ फौज घेऊन चालून आला आह्मी व धोंडोपंत गोखले असे बरोबर होतो वाघाची गाठ हल्यालाचे मैदानात पडली लढाई मातबर दोही कडून माणसे जाया जखमी बहुत जाहाले ईश्वर इछे आह्माकडील फौजेचा मोड जाहाला त्या वख्ती धोंडोपंत गोखले व त्याचे पुतणे आपाजी गणेश गोखले हे लढाईत ठार जाहाले त्याचा बयान व मेहेरबा कदरदा बुलंद आलकाब जनराल वसलीसो बाहादुर मुख्त्यार सरकार दौलत मदार कंपणी इंग्रज बाहादुर हे पलटणे व तुरुक स्वाराची रिजिमिटे वगैरा सरंजाम घेऊन धोंडजी वाघ याचे पारपत्याबा॥ आले त्यास सामील व्हावया करिता श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो यांची आज्ञा पत्रे आह्मांस वगैरा आली त्याज-वरून आह्मी व बापुजी गणेश गोखले असे मेहेरबाकदरदा वसलीसो यांस जाऊन सामील जाहालो ती॥ परशरामपंत भाऊसो यांचे चिरंजीव ती॥ रामचंद्र-आपा याणी आपले बंधु ती॥ हरीपंत बाबा यांस पाठविले नबाबाकडील फौज घेऊन नूर महंमदखा पन्ही व मुजाफरखान असे फौज घेऊन आले धोंडजी वाघ यांचे फौजेसी लढाई कैतालभंनूचे मैदानात सन मा॥रि जाहाली वाघ ठार सदरहू प्रकर्णी ता॥ जाहाला मजमुन बयानवार ल्याहावा तर विस्तार फार होतो सबब हासील सदरी कलमी केला आहे पुढे बयान कलमी करण्यात येईल तुकोजी होलकर यांचे चिरंजीव कासीराव व मल्हारराव होलकर हे उभयता पौ॥ वडील कासीराव होलकर हे सिंदे यांस मिळोन त्याजकडून आपला भाऊ मल्हारराव यास दगा करून मारविला तो प्रकार सदरी लिहिला आहे त्यांचा लेक तो धणी त्याचे होऊन तुकोजी होलकर यांचे लेकवले येशवंतराव व विठोजी होलकर याणी बंड केले त्यांचे पारपत्याबा॥ सरकारातून फौजा पाठविल्या त्याणी विठोजी होलकर यास धरून पुण्यास आणला त्यास हतीचे द्यावा इतका अपराध नवता त्या काली बालोजी कुंजर हे सरकारचा कारभार करीत होते त्याणी हतीचे पायी देण्याविसी सलाह दिल्ही त्याजवरून विठोजी होलकर यांस हतीचे पायी दिल्हे येशवंतराव होलकर निघोन हिंदुस्थानात गेले त्याणी तिकडे जमेत केली सिंदे याणी आपला खावंद मारला या वैमनस्यामुळे सिंदे यांच्या व होलकर

यांच्या लढाया जाहाल्या उभयताचा समेट करून द्यावा हे जाहीरीत पोटात बालोजी कुंजर याणी भावास मारण्याविसी सलाह दिल्ही त्यास हवाली करून घ्यावे हे किंवा कसे ते ज्याचे ते जाणत येशवंतराव होलकर हे पुण्याचे रोखे आले बालोजी कुंजर यांचे पोटात आपण विठोजी होलकर यांस मारिविला हो दर्द त्याणी होलकर हे बदनजरेने येतात त्याचे पारपत्याबा सरकारच्या फौजा पाठविण्या विसी श्रीमंत पंत प्रधान बाजीरावसो यांस विनंती केली त्याजवरून सरकारातून कैलासवासी नाना पुरंधरे याजबरोबर जरी पटका व + + + + ................. + + + + + + +......................+ फखाना पागे पथके व + +.........+ + +त्याची व होलकराची लढाई बारामती नजीक + + + + + + + +नात जाहाले सरकारचे फौजेची लढाई बिघडली कैलासवासी मालोजी राजे घोरपडे मुधोलकर यांस ++++ ++ त्या पाडाव गेले होलकर हे पुण्याचा रोख धरून आले त्याणी श्रीमंतास बहुत प्रकोर सागून पाठविले य + + + + + समेटाची गोष्ट व्हावी ते न होता बालोजी कुंजर यांचे सल्यावरून लढाईचा मुकदमा नमूद जाहाला सिंदे याजकडील पलटणे व सरकारची फौजा त्यासुध्धा होलकर यांचे फौजेची लढाई आश्विन व. १४ छ .........तारखेस वानवडीचे मैदानात मातबर जाहाली सिंदे याजकडील पलटणाची खराबी बहुत जाहाली सरकारचे फौजेचा मोड जाहाला त्या वख्ती पुणे शहर लुटले जावयाचे परंतु होलकर यांणी मोठ्या शरतीने वाचविले श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो श्री परवतीवर गेले त्याजकडे मर्यादेने सांगून पाठविले परंतु भरवसा वाटेना सबब श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो निघोन वसईस गेले श्रीमंताची पत्नी श्रीमंत सौवती कैलासवासी राधाबाई ताईसाहेब ही पुण्यात होती त्याजकडे होलकर येऊन आदब बज्याऊन मी आपला चिरंजीव आहे असे वगैरा सामोपच्यारे बोलणे जाहाले तो प्रकार वसईस श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब याजकडे लिहिला गेला श्रीमंतास भरवसा येईना श्रीमंत कैलासवासी अमृतरावसाहेब यांचा व होलकर यांचा येकोपा जाहाला श्रीमंत कैलासवासी अमृतरावसो याणी होलकर यांस रुपये......देऊ केले त्यांचा उगावा होईना सबब पुण्यात होलकर याजकडील हरी रघुनाथ भावे व हरनाथबाबा याणी श्रीमंत कैलासवासी अमृतराव साहेब यांच विच्यारे संभावित वगैरा अहस्त याची आबरू घेऊन पैका घेतला बहुत अंधाधुंदी जाहाली

श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब वसईस गेले त्यांचे व इंग्रजी सरकारचे राजकारण जमून इंग्रजी सरकारची पलटणे कुमकेस यावी असे ठरून तहनामा सन.........जाहाला इंग्रजी सरकारची पलटणे घेऊन मेहेर बाकदरदा बुलंद अलकाब जनराल वसलीसो बहादुर हे कर्नाटकातून चेनापटनाहून निघोन श्री तुंगभद्रा श्री कृष्णाबाई उतरोन मिरज प्रांतातून पुण्यास दाखल जाहाले होलकर व श्रीमंत कैलासवासी अमृतरावसाहेब निघोन गेले नंतर श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब यांची ( स्वारी ) इंग्रजी सरकारचे बाहादरीने पुण्यास येऊन दाखल जाहाली इंग्रजी सरकारची पलटणे घेऊन मेहेर बकादरदा वसली साहेब मवसुफ हे येशवंतराव होलकर यांचे पिछावर गेले हिंदुस्थानात सिंदे व भोसले यांच्या फौजेच्या लढाया जाहाल्या गायलगडचा किला घेतला नंतर इंग्रजी सरकारचे व सिंदे व भोसले यांचे तहनामे जाहाले त्याचा व श्रीमंत पंत प्रधान यांचे पदरचे सरदार आंह्मी वगैरा याणी बंडाची पारपत्ये केली त्याचे बयान कोण कोणी कोणाची पारपत्ये केली त्याचा कलमी करावा तर विस्तार फार होतो सबब कलमी न केला श्रीमंत पंत प्रधान बाजीरावसो यांचे कारकिर्दीत श्रीमंत कैलासवासी रघुनाथरावदादा साहेब यांचे दिवाणखान्याचे दक्षणेस नवी इमारत केली ती जलाली व परतीस श्रीविष्णुचे पाठीमागे ईमारत केली ती जलाली व तुकोजी होलकर व रघोजी भोसले नागपूरकर यांचा काळ जाहाला सिंदे हिंदुस्थानात गेले नंतर

..............................................................................

..............................................................................

सन......श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो यांची स्वारी श्रीपंढरीस पांडुरंगाचे दर्शनास गेली स्वारीचे हमराह कैलासवासी गंगाधर शास्त्री होते त्यास यात्रेचे दाटीत कोणी दगा करून मारिले त्याची चौकसी सरकारातून जाहाली नाही दुसरा प्रकार यात्रेचे लोकाचे ह्मणे त्रिंबकजी डेंगले याणी मारला असे याजमुळे गुमानी येऊन त्रिंबकजीस हवाली करावे असे इंग्रजी सरकारचे ह्मणे पडले दोस्तीचे जागा लाहान माणसामुळे किलाफ न यावा हे समजून त्रिंबकजीस इंग्रजी सरकारचे हवाली केले त्यास साष्टीचे किल्यात कैदेत ठेविला तो तेथून पळून श्री शंभुमाहादेवाचे वगैरा असपास डोंगरात राहून बंड केले त्यांचे बंदोबस्तास सरकारातून फौज गेली असता बंदोबस्त न जाहाला तो निघोन नाशकाकडे गोडवाणात गेला सरकारचे तालुक्यात आसून बंदोबस्त होत नाही तेव्हा त्यास सर-

कारचा आश्रा असी गुमानी येऊन पुण्यास सन इंग्रजी सरकारचे पलटाणाचा घेरा बसून पुरंधर व सिंव्हगड व रायगड व कर्नाटकातील धारवाडचे किल्या सुध्धा मुलकाच्या सोडचिठ्या घेतल्या बापु गोखले व बालोबाबाबा नि॥ विंचूरकर याणी पुण्याहून निघोन जावे किल्याच्या सोड चिठ्या दिल्ह्या त्या किलेकरानी गोल्या माराव्या असी सलाह श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो यांस इंग्रजी (सरकार) सी बिघाड करण्याविसीची दिल्ही आह्मास बोलावून नेऊन विचारिले की तुमचे विच्यारास कसे त्याजवरून विनंती केली त्यातील हासील स्वामीनी **पुणे** सोडून जाऊ नये लढाईचा प्रसंग करू नये ह्मणोन बहुत बहुत प्रकारे विनंती केली त्याचा जबाब इंग्रजानी कैद केल्यास कसे त्याजवरून विनंती केली की कैद करितात असे जाल्यांस घोडे चालवून मरून जाऊ परंतु पुणे सोडू नये ह्मणोन तेव्हा ही रांगडी मसलत ह्मणोन आंह्मी सदरी लिहिले आन्वये विनंती केली त्या बैठकेस बालोबाबाबा नि॥ विंचूरकर व बापु गोखले व त्यांचे पदरचे अंताजीपंत गद्रे असे होते गोखले यांचे व बालोबाबाबा यांचे दिलात बिघाड करून लढाई करावी असे परंतु त्या समई न जाहले इंग्रजी सरकारचा व श्रीमंताचे सरकारचा तह......जाहला परंतु गोखले वगैरा यांचे उमेदी मुळे श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो यांचे पोटात मैल जाहीरात दोस्ती तह जाहाल्यानंतर श्रीपांडुरंगाचे दर्शनाकरिता खासा स्वारी आषाढ मासी पंढरीस गेली आंह्मी ही बरोबर गेलो श्री पांडुरंगाचे दर्शन घेऊन स्वारी माघारी जाताना श्रीशंभुमाहादेव नजीक मुकामास गेली त्या मुकामी आंह्मी निरोप घेतला श्रीमंताची स्वारी माहुलीस गेली तेथे मेहेर बकादरदा मालकम साहेब बाहादुर मुखत्यार सरकार दौलत मदार कंपणी इंग्रज बाहादुर आले त्याची व श्रीमंत पंत प्रधान बाजीराव साहेब यांची मुलाकत होऊन बोलणी जाहाली साहेब महसुफ याणी नेक सलाह च सांगितली असे ऐकण्यात त्या वख्ती आंह्मी घरी होतो तबेतीस बेआराम श्रीमंताची स्वारी माहुलीहून पुण्यास गेली नंतर पेंढारी याणी सरकार तालुक्यात वगैरा बंड केले त्यांचे बंदोबस्ताकरिता फौज पाठवावे असे इंग्रजी सरकारचे विच्यारे ठरून फौज सुध्धा पुण्यास येणेविसी सरकारचे आज्ञापत्र छ २४ शवलचे तारखेचे आले व बापु गोखले व सरकारचे कारभारी मोर दिक्षित व बालोबा बाबा नि॥ विंचूरकर या त्रिवर्गाचे पत्र भाद्रपद व. ८ आष्टमीचे आले व सदरहू मा॥राचे मेहेरबा अलफिंष्टनसाहेब बाहादूर नि॥ कंपणी सरकार यांचे खत छ २८ जिल्कादचे तारखेचे

आले आमची + + + + ................................+ ++
कैलासवासी अंताजी हरी कानिटकर याजबरोबर फौज देऊन ++++ + + + + +
फौज जमली सन समान अशरात कार्तीक शु. ११ ते दिवसी श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो यांची स्वारी श्री परवतीस देवदर्शनास गेली सरकारच्या फौजा पुण्याचे पलीकडे उत्तरेस......नदी उतरून भांबरडे याचे आंगास गेल्या श्रीमंताचे सरकारचे फौजेची व इंग्रजी सरकारचे पलटणचे फौजेची लढाई सुरु जाहली त्या लढाईत सरकारचे कारभारी कैलासवासी मोर दिक्षित हे व सरकारचे हुजरातचे लोक वगैरा सरकार कामास आले आह्माकडील वकील कैलासवासी पांडुरंग रामचंद्र सहस्रबुध्ये हे त्या लढाईत ठार वगैरा लोकही नामी नामी कामास आले आह्मांकडील फौजेत अंताजी हरी कानिटकर हे होते त्यांचे आंगावर घोडी पडून दुखावले गेले व त्यांचे चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत कानिटकर यांस गोली लागली दिलगुरुब होण्याचा वख्त जाहाला सरकारची फौज मागे हटून आपले मकानास जावयास निघाली इंग्रजी सरकारचीही पलटणे आपल्या मकानास गेली आह्मास सरकारचे आज्ञापत्र निकडीने येणेविसी आले आमचे तबेतीस काहीसे आराम जाहाले होते सरकार आज्ञा येणेविसी सबब तसाच निघालो तो कार्तीक व. ६ ते दिवसी श्रीमंताचे कदमाजवल पुण्यास जाऊन पोहोचलो सप्तमीचा दिवस येक मध्ये गेला आष्टमी रविवार ते दिवसी संध्याकालचे प्रहर साहा घटका दिवसाचे सुमारास गेलो गोली होऊ लागली दिलगुरुबा जाहाला इंग्रजी सरकारची पलटणे चालून आली रात्रीचा वख्त येकास येक जमू पावले नाहीत सरकारची फौज मागे हटली श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो पुणे सोडून रात्रौ निघाले ते सासवडास आले दुसरे दिवसीं तेथून निघोन जेजुरीचे मुकामास आले तेथून पुलावरून तावळ्याचे मुकामास आले तेथून घाट चढून देऊरचे आंबराईत स्वारी आली तेथे मेहेरबा आलपिष्टिन साहेब बाहादुर यांचे खत श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब यांस आले त्यातील हासील मतलब इंग्रजी सरकारचे साहेब लोक पाडाव जाहाले त्यास गली दिल्हे इतःपर असे होऊ नये असे भाव लिहिण्यातील त्याजवरून आह्मी श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब यांस विनंती केली की ही गोष्ट चांगली न जाहाली सरकारचे पदरचे कोणी पाडाव सापडल्यास त्याणी गली द्यावे असे जाहाले नंतर स्वारी पाडलीचे मुकामी कार्तीक शु. ११ येकादसीस आली श्री तुलसीचे लग्न त्याच

मुकामी जाहाले आलपिष्टिन साहेब बहादुर मुख्त्यार सरकार दौलत मदार कंपणी इंग्रज बाहादुर यांचे चितात तह करावा असे होते परंतु गोखले यांची उमेद त्यांणी भर दिल्हा याजमुळे तह करण्याचे श्रीमंताचे खातरेस न आले पाडलीहून पुन्हा देऊरचे मुा स्वारी गेली इंग्रजी सरकारची पलटणे पिछावर आली हे समजून तेथून कूच करून न्हावीचा घाट चढून ×××××× चे मुकामास आली तेथून कूच होऊन मुकाम हिंगणगाव व कलेढोण व दिगोंची व पिंली व भालवणी व गुरसाले व करकंब व कालठण व कुशां व कलासी व राजोरी व जिंती बाबलगाव वरून छ २ मारी सिध्धटेकचे मुा स्वारी आली श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति बुबाजी साहेब संस्थान सातारा हे साताऱ्यास राहिले असता बंड होईल असे श्रीमंताचे दिलास वाटून श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति बुबाजी राजे यांस आणावयांस राजश्री नारो विष्णु आपटे यांस पाठविले होते त्याणी श्रीमंत माहाराज छत्रपति बुबाजी साहेब व त्यांचे उभयता बंधु श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति भाऊसाहेब व श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति आपासो व त्याची मातुश्री श्रीमंत कैलासवासी माईसो यास घेऊन सिध्ध टेकचे मुकामास आले श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसो दर्शनास जावया करिता निघाले आह्मास स्वारी बरोबर येणेविसी आज्ञा केली आह्मी स्वारी बरोबर गेलो कैलासवासी माधवराव रास्ते ही बरोबर होते दर्शन जाले नजरा केल्या श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी व श्रीमंताची स्वारी कवठे व पारगाव व तलेगाव ढंमढेरे यांचे व जोणी नजीक पांबल व को नारायणगाव व वेतुराकडून ब्राह्मणवाड्याचे मुकामास गेली तेथे बापु गोखले यांचे चिरंजीव गोविंदराव यांचा काळ जाहला. त्याची पत्नी सहगमन गेली. नंतर कूच होऊन स्वारी आली तेथून कूच होऊन कोतूल व वेलूर व मनचर व वाकी व फुलद्दार व राजेवाडी व इरवले व देऊर व पाडली व मनगिरी व वांगी व तुरचीवाली व बोलवाड व चंदुर व नागनूर व गोकाका व हेलवाक व येडुरईगली व कोनूर व भाती व अथणी व उगार व कुरुदवाड व सिगाव कोरेगाव व कराड व पटण व सातारा व लाणद व राजोरी व खुडुस व पंढरपुरचे मुास गेली तेथे आमची तबेत बिघडली आंव पडु लागली याजमुळे पंढरपुरचे मुकामास राहिलो श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब हे भिमा उतरून सो + + + + + + + ड गेले तेथून माघारे फिरून गोपाल आष्टिचे मुा आले तेथे इंग्रजी सरकारचे

पलटाणची व तु + + + + + + राची गाठ पडली लढाई जाहाली सरकारचे पदरचे बापु गोखले वगैरे असे ठार जाहाले व कांही जखमी जाहाले सरकारचे फौजेची फुटाफूट होऊन खराबी जाहाली श्रीमंत माहाराज छत्रपति बुवाजीसाहेब हे मातुश्री व बंधुसहवर्तमान जाग्यावर राहिले ते इंग्रजी सरकारचे स्वाधीन जाहाले श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब निघोन हिंदुस्थानांत गेले श्रीमंताचे राज्यावर कंपणी सरकारची हुकमत जाहाली श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांची स्वारी हिंदुस्थानात गेल्यानंतर मेहेरबा कदर गौरनर मालकम सो बहादूर यांचे विद्यमाने तह जाहला श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान बालाजी विश्वनाथ यांस नानासाहेब ह्मणत तागाईत श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान सवाई माधवराव साहेब यांचे अखेर पर्यंत व आलीकडे श्रीमंत राजश्री पंत प्रधान बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दीत जाहाली व्यवस्था सदरी लिहीली आहे.

# लेखांक ४.

# कंपणी सरकारचा जाहिरनामा.

शिका

पार्टिंजर साहेबाची सही इंग्रजी.

जाहीरनामा सरकार दौलत मदार कंपीणी इंग्रज बाहादूर सुा समान अशर मयातैन व अलफ तमाम लोकानीं जाहीरनामा समजून त्या प्रमाणें वर्तणूक करावी याजकरितां लिहिलें जाते जें बाजीराव साहेब राज्यावर आल्यापासून नाना प्रकारचे बखेडे व बंडे होत होती राज्यांत व मुलुकावर हुकमत कधीं चालली नाहीं पुढें होळकरांचा दंगा जाहाला तेव्हां राज्य सोडून पळून वसईस जाऊन खंडेराव रास्ते यांचे मदतीनें गुजराण करून राहिले नंतर कंपीणी सरकारची दोस्ती केली त्याजवरून कुंपीणी सरकारची फौज येऊन बाजीराव साहेब यांसी गादीवर बसवून तमाम बंडे व बखेडे होते ते मोडून मुलुकांत बाजीराव साहेब यांचा हुकुम सुरळीत चालू करून दिल्हा पहिल्या दंग्यामुळें व पुढें दुष्काळ पडल्यामुळें मुलूक बहुतेक उद्वस्त जाला होता तो कुंपीणी सरकारच्या भरवंशावर आबाद जाला बाजीराव साहेब याणीं मामलती मक्त्यानें लाविल्या ते मक्तेदार रयतेपासून जाजती ऐवज घेत गेले तत्रापि बहुत आबादी जाली जे मुलकाचा ऐवज जमा जाहला त्याजवर बाजीराव साहेब याणीं दौलतीचा खर्च व ऐषआराम करून खजिना बहुत जमा केला मराठे सरदार याजवर बाजीराव साहेब यांचा दाब बहुत दिवसापासून नवता तो लागू करावा असें कुंपीणी सरकारातून कबूल केलें नव्हते जे वाजबी असेल तें चालतें करून द्यावें असें कंपीणी सरकारची खायष होती त्याजवरून गायकवाड. यांजकडील जाब सालाचा ठरावयाकरितां गायकवाड याणीं आपले कारभारी गंगाधरशास्त्री कंपीणी सरकारचे बाहादरीवर पुण्यास पाठविले ते येऊन बहुतेक जाब साल लौकर उलगडावा असें जाहाले होते त्यांत बाजीराव साहेब यांची किफायत बहुत होती इतकियात गंगाधरशास्त्री यांस बाजीराव साहेब यांचे कारभारी याणीं पंढरपुरचे

क्षेत्री मारिले त्या वेळेस तमाम रयत व यात्रेकरू वगैरे सर्व ह्मणत होतें कीं शास्त्री यांस त्रींबकजीनें बाजीराव साहेब यांचे हुकुमासिवाय मारिलें नाहीं असें असतां बाजीराव साहेब दोस्त मोठे दौलतदार असें करवीतील हा गुमान मनांत न आणता ज्या त्रिंबकजीनें मारिले त्यास हवाली करून द्यावा असा कंपीणी सरकारचा विचार होऊन त्रिंबकजीस हवाली करावा असें बोलणें पडलें तेव्हांच हवाली करावा तो न केला याजकरितां कंपणि सरकारची फौज बहुत जमा जाली नंतर त्रिंबकजी हवाली केला त्या समई कंपीणी सरकारास खर्च बहुत जाला तो दोस्तीवर नजर देऊन न मागतां त्रिंबकजीस हवाली करून घेतला आणि दोस्ती पहिली चालत होती त्याप्रों कायम ठेविली नंतर बाजीराव साहेब याणीं बाहेरचे सरदार यांजकडे पत्रें पाठवून त्यांची फौज तयार करावी असी तजवीज केली व आपले राज्यांत बंडे उभी करून बंडाचे कुमकेकरितां आपली फौज तयार करून कंपीणी सरकारासीं लढाइ पडावी आणि नुकसान व्हावें अशी तजवीज करूं लागले. त्याजवरून बखेडा मोडावा याजकरितां कंपीणी सरकारची फौज तयार होऊन पुण्यास आली आणि बाजीराव साहेब यांसीं शहराभोंवती तंबी केली त्याजवेळेस बाजीराव साहेब हातीं सापडले होते मुलुकाचा बंदोबस्त करावयाजोगी कंपीणी सरकारची फौज बहुत तयार होती परंतु तहनामा जालीयापासून हरवख्त बाजीराव साहेब यांचे बोलणें पडत होते जें आह्मास राज्य प्राप्त जालें व आह्मी ऐषआराम करितों हें देणें सर्व कंपीणी सरकारचे आहे आमचा गुजरा कंपणि सरकारचे भरवंशावर होत आहे असें बहुत तऱ्हेनें बोलत होते याजकरिसां गादी कायम ठेऊन पुढें त्याचे हातून फिसाद न व्हावा याजकरितां वसईचा तहनामा कायम ठेऊन नवा तहनामा जाला पांच हजार स्वार व तीन हजार पायदल मदतीस देत जावें असा बाजीराव साहेब यांचा पहिलाच करार होता ती फौज कंपीणी सरकारांतून ठेवावी असें होऊन फौजेचे खर्चास मुळूक लाऊन दिल्हा तव्हांपासून दोस्ती पहिलेप्रों चालली नंतर पेंडारी चहोंकडे रयतीस दरसाल उपद्रव करतात त्यांत बाजीराव साहेब यांचे मुलुकास बहुतच उपद्रव होतो या करितां पेंडारी यांचा बंदोबस्त व्हावा ऐसी कंपीणी सरकारांतून तजवीज जाली तेव्हां बाजीराव साहेब यांचें बोलणें पडलें जें पेंडारी यांचा बंदोबस्त जाल्यानें आमची बहुत किफायत आहे आह्मी ही फौज सामील देतों असें खातरजमेनें बोलून त्या बहाण्यानें कंपीणी सरकारचे आश्रयावर जो खजिना जमा केला होता तो ऐवज बाहेरील सरदारांस पाठवून

त्यांसी बिघाडविलें आपली फौज तयार केली कंपीणी सरकाराची फौज जवल होती ती दूर जावी याजकरितां दोन हजार स्वार कंपीणी सरकारचे फौजेबराबर देऊन फौज दूर गेली असी संधि पाहून येकायेकीं कांहीं कारण व जाब सालाची तकरार नसतां फौज तयार करून चालून येऊन कंपीणी सरकारचे फौजेसी लढाई केली व कोणतेही मुलुकात चाल नाही तसी चाल करून इंग्रजी वकीलांचे बंगले व छावणीची जागा लुटून जाळली व कंपनी सरकारची रयत व वाटसरू सल्याचा भरवंसा धरून येत होते त्यांस धरून कैद केले व कितेक लुटले दोन इंग्रजी सरदार मुंबईकडून येत होते ते तळेगांवाजवळ चोरांचेही पारपत्य करीत नाहींत त्या तऱ्हेनें मारिले ते मारणार अद्यापी चाकरीवर आहेत याजवरून बाजीराव साहेब यांचे हुकुमासिवाय मारिले नाहीत असा निश्चय होतो व ज्या त्रिंबकजीनें गंगाधरशास्त्री यांस मारिलें त्यास जवळ आणोन कारभारांत वागऊ लागले यावरून बाजीराव साहेब यांचे हुकुमासिवाय त्रिंबकजीनें शास्त्री यांस मारिलें नाही असे लोक पहिल्यापासून बोलतात तो मुद्दा शाबूद करून घेतला व पेंडारी बलावून मुल्रूक लुटवावा असी तजवीज करूं लागले या तऱ्हेचे दौलतदारीचे सांप्रदाय सोडून वर्तणूक करून कंपीणी सरकार यांसी बुडवावें असें केले त्याजवरून कंपीणी सरकारांतून निश्चय जाला जे बाजीराव साहेब राज्याचे उपयोगी नाहींत त्याजकरिता त्यास बिलकूल राज्यातून काहाडून कंपीणी सरकारातून मुल्रूक व किले काबीज करून अमल करावयाची तजवीज होऊन एक सडी फौज बाजीराव साहेब यांचें मागें रवाना करून येक फौज किले घ्यावयाकरितां जात आहेत दुसरी फौज अमदानगराजवळ येऊन पोंहचली आहे व येक मोठी फौज खांदेशांत आली आहे व जरनेल मंडरोल साहेब कर्नाटकाचा बंदोबस्त करीत आहेत व मुंबईकडून फौज येऊन कोकणचे किले घेऊन त्या प्रांताचा बंदोबस्त होत आहे आतां थोडे दिवसांत बाजीराव साहेब यांचा ठिकाण नाहीं असें होऊन माहाराज छत्रपती सातारकर बाजीराव साहेब यांचे कैदेंत आहेत त्यांस सोडवून घेऊन मोकळें करून त्यांचे व त्यांचे मंडलीचे शानशोकतीकरितां कांहीं राज्य त्याजकडे चालेल अशी तजवीज कंपीणी सरकारची होऊन सातारे किल्यावर माहाराजांचा झेंडा कायम करून त्यांचे तरफेचे लोक होते त्यांची खातरी केली आहे त्यांस जो मुल्रूक माहाराजाकडे होईल त्यांत न्याय इनसाफ हुकमत व अमल ते करतील कंपीणी सरकारांत मुल्रूक राहील तेथे कंपीणी सरकारचा अमल होईल परंतु कोणाचे

वतनास व इनामास व वर्षासनास व देवस्थानचे खर्चास व खैरातीस व कोणाचे ज्ञातीचे धर्मास खलेल न होता वाजबी असेल तें सुरळीत चालेल व बाजीराव साहेब मक्तेदारास मामलती देत होते ते महकूब होऊन कमाविसदार याजकडे मामलती सांगून जो वाजवी अैवज असेल त्याची उगवणी होईल कोणावर जुलूम जाजती काही होणार नाही येविसी कोणीहि आंदेशा घेऊ नये बाजीराव साहेब यांजकडे जे चाकरीस आसतील त्याणी चाकरी सोडून आजपासून दोन महिन्यांत आपले घरी यावें जे कोणी न येतील त्याचे वतन जप्त होऊन खराबी जाहाल्या-सिवाय राहाणार नाही जमीदार याणी आपले परगण्यातील कोणी बाजीराव साहेब याजकडे चाकरीस आसतील त्याची नावनिसीवार याद तूर्त समजावावी चाकरी सोडून जसे घरास येतील ते वेळेस समजवीत जावे बाजीराव साहेब यांची कुमक करू नये त्यांजकडे वसूल येकंदर देऊ नये दिल्ह्यास साल मजकुरी मुलकास उप-द्रव लागला आहे त्याची फिर्यादीची दर्यात्फी होऊन सूट मिलेल बाजीराव साहेब यांजकडे वसूल दिल्ह्यास तो अैवज मजुरा न देता दरोबस्त अैवज घेतला जाईल व जे जमीदार कुमक करतील व अैवज देतील त्याची वतने व जमिनी त्यांजकडे चालणार नाही तेरीख छ ११ माहे फेब्रुवारी सन १८१८ इसवी मुा छ ५ रबिलाखर.

